मम रूपं सहस्राब्जे लिंगं स्थितं पश्चिमे शिखायां जंगमः शून्यः वि-
श्वानुग्रहको जंगमः जंगमस्य पादांबुना शिवलिंगस्य स्नपनं तत्प्र-
सादं च भोजयेत् ॥१२९॥ अथर्वणे ॥ ॐ जंगमस्य सिक्तपादांभः लिं-
गस्य तनुमीरयेत् तत्प्रसादो भोग्यपदं पादांबुजसलिलं आसेवितं भुं-
जीयादन्यं नोपासीत शिवलिंगकारिं पायात् ॥१३०॥ यजुर्वेदे ॥ ॐ
नमः परमात्मने ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय शरीरं परिमार्जयेत् गुरुं वंदनं
कृत्वास्य मठे आगत्य जंगमपादयोर्नमः जंगमं स्वगृहं प्रवेश्य तत्रादौ
प्रोक्षयित्वास्य परमेश्वरस्य आशा नास्ति परमेश्वरो भगवान् स्यात
स्थावरं जंगमं चैव त्रैलोक्यं जंगममध्यात् जंगम ईश्वररूपः जंगम-
पादोदकं सकलतीर्थानां श्रेष्ठं यदा लिंगस्य समर्पितं तत्तीर्थं पाषाणं
लिंगं भवेत् तस्य सेवितभक्तास्ते भक्ताः परमेश्वररूपाः ये जंगमरू-

---

ह्मटलें आहे कीं, दोन्ही भिवयांच्या मध्यभागीं म्हणजे आज्ञाचक्रांत महालिंग नांवाचें माझें रूप आहे, व ब्रह्मरंध्रांत असलेल्या हजार दळांच्या कमलांत निष्कललिंग नांवाचें माझें रूप आहे, व तीन दळांच्या शिखाचक्रामध्यें शून्यलिंग आहे, व शिखाग्राच्या पश्चिम भागांत सर्व चैतन्यस्वरूप जंगमलिंग आहे, सर्व जगावर अनुग्रह करणारा जो जंगम आहे, तो पश्चिम भागांत राहत आहे त्या जंगमलिंगाच्या पादोदकानें इष्टलिंगाला अभिषेक घालावा, व त्या जंगमाचा प्रसाद इष्टलिंगाला समर्पण करावयास ठेवावा. (१३०) अथर्वणवेदांत ह्मटलें आहे कीं, प्रणवस्वरूपी जंगमाचे चरण प्रक्षालन करून (अभिषेक घालून) तें पाणी (पादोदक) लिंगाच्या (इष्टलिंगाच्या) मस्तकावर घालावें, व त्या जंगमाचा प्रसाद शिवलिंगास (इष्टलिंगास) समर्पण करावा; शिवलिंगास अर्पण केलेला तो प्रसाद व तें पादोदक आपण घ्यावें, दुसरें स्थावरलिंग वगैरेंचे पादोदक व प्रसाद कधींही घेऊं नये. (१३१) यजुर्वेदांत ह्मटलें आहे कीं, सूर्योदयापूर्वी चार घटका रात्र असतांना उठून "ॐ नमः परमात्मने" या मंत्राचा उच्चार करून (स्मरण करून) आपल्या शरीरावर अनुलोम विलोम क्रमानें मार्जन करावें, नंतर श्रीगुरूच्या चरणांस नमस्कार करावा, मग या जंगममूर्तीच्या मठांत येऊन त्या जंगमदेवाच्या दोन्ही पायांला नमस्कार करून आपल्या घरीं त्या जंगमाला आणून आपल्या घरांत त्या जंगमाचे पाय धुवून त्याला आसन देऊन बसवावें. या शिवस्वरूप जंगमदेवाला आशा कोणतीही नाहीं, व हा जंगम केवळ षड्गुणैश्वर्यसंपन्न असा साक्षात् शिवच होय. स्थावरजंगमरूप त्रैलोक्य हें या जंगमदेवाच्या मध्यभागीं आहे, व जंगम हा केवळ शिवस्वरूप आहे, व या जंगमाचें पादोदक भागीरथी वगैरे सर्व तीर्थांपेक्षां श्रेष्ठ आहे, व तें जंगमपादोदक जेव्हां इष्टलिं-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पिणः प्रणवस्वरूपाः यथा तद्रूपः परमेश्वर एकमूर्तिस्त्रयोभागाः स्यु-गुरुः स्याद्धवेल्लिंगरूपं च तयोर्जंगमाधिकं भवेत् त्रिविधमेकभेदं च एकभेदं त्रिभागं च त्रिविधस्वरूपमेकं भवेत् वेदा वदन्ति सर्वे मुनयो भाषितं सत्यं सत्यं पुराणागमोपपुराणप्रसिद्धं स्मरेत् सर्वदेवानां ब्रह्मविष्णुरुद्राणां च त्रिमूर्तीनां चैतन्यं जंगमं चैव जंगममुखेन परमेश्वरस्तृप्तः रुद्रस्तस्य प्राणायामत्रयं कृत्वा समाम्रातमूले तत्र स्थितो ब्रह्ममध्ये मातृगणाः स्मृताः कुक्षौ च सागरास्सर्वेऽपि द्वीपाः वसुंधरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोह्यथर्वणः अंगैश्च सहितास्सर्वे मार्जयेत् वेदा वदन्ति भाषितं सा प्रतिष्ठा त्रैलोक्ये च यजुर्वेदादिसमश्रुतिपंचदशाध्याये प्रोक्तम् ॥१३१॥ जाबालोपनिषदि ॥ चरमियं वै देवता ह-

---

गाला समर्पण केलें जाईल तेव्हां तें लिंग पाषाणलिंग असें न ठरून शिवलिंग असें प्रसिद्धीस येतें. आणि तें जंगमपादोदक सेवन करणारे भक्तलोक ( पान करणारे भक्तलोक ) जे असतील ते भक्तलोक शिवस्वरूप आहेत, व प्रणवस्वरूप (ॐकारस्वरूप) आहेत, जसें जंगमरूपी परमेश्वर ( शिव ) एकमूर्ति असून त्याचे तीन भाग ( तीन मूर्ति ) होतात, आणि तोच गुरुरूप होतो, व तोच लिंगरूप होतो, या गुरुलिंगांमध्यें जंगमलिंगच श्रेष्ठ होय. हे तीन्ही भाग ( गुरु, लिंग, जंगम ) मिळून एकच रूप होय, आणि याचेच तीन भाग होतात, याप्रमाणें वेद सांगतात. व पुरातन असे सर्व ऋषि याचविषयीं खरें खरें बोलतात, आणि हें पुराण आगम उपपुराण यांमध्यें प्रसिद्ध आहे. आणि सर्व देवांना व ब्रह्मविष्णुशिव या त्रिमूर्तीना हें जंगमलिंग चैतन्यस्वरूप होऊन राहिलें आहे, अशा जंगमलिंगाचें स्मरण करावें. जंगमाच्या मुखानें परमेश्वर तृप्त होतो, व हा शिव चांगल्या आम्राताच्या (अंवटीच्या) झाडाच्या मुळीपाशीं बसून तीन प्राणायाम करून त्या जंगमाचें स्मरण करितो. त्या ब्रह्मामध्यें, व त्या ब्रह्मर्षींच्या मध्यभागीं सप्तमात्रारूप शक्तिदेवतांचे गण ( समूह ) राहतात. भूमि यांतच राहते त्या जंगमाच्या कुक्षींत सात समुद्र राहतात. सर्व द्वीपें यांतच राहतात. व जंगमाच्या पुढच्या प्रदेशावर भूमि राहते, व याचप्रमाणें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद यांशिवाय जे अनंतवेद शिक्षा, व्याकरण, निरुक्त वगैरे अंगांसहित वर्णन करतात, सर्व शास्त्रांचें ह्मणणें असेंच आहे, वेदाचें ह्मणणें असेंच आहे, व यजुर्वेदादि श्रुतींच्या वरोवरीच्या श्रुतींमध्यें, व पांच संख्येचे विष्णुपुराणांमध्यें, व दहा संख्येच्या शिवपुराणांमध्यें (यांतल्या प्रत्येक अध्यायामध्यें) असेंच सांगितलें आहे. या तऱ्हेची श्रुत्यर्थांची प्रतिष्ठा तीन्ही लोकांमध्यें रूढीनें मानिली जात आहे. (१३२) जावालोपनिषदांत सांगितलें आहे कीं, ही परशिव देवता

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्यते शेषो भुंजते परब्रह्मः स्यात्तच्छेषं तृप्तिर्न संशयः ॥१३२॥ ब्रह्मगीतायाम् ॥ जंगमानां च पादांबु तत्प्रसादस्य सेवनम् ॥ सेविनां मोक्षसिद्ध्यर्थं सत्यमीश्वरभाषितम् ॥१३३॥ अस्मिन्नर्थे परमरहस्ये ॥ चरस्य पादतीर्थेन लिंगमज्जनमुत्तमम् ॥ तत्प्रसादो महादेवि नैवेद्यं शुभदं भवेत् ॥१३४॥ स्कान्दे ॥ तस्य जंगमलिंगस्य प्रसादं लिंगसेवितम् ॥ मया प्रोक्तं तु कर्तव्यं पज्जलं शिखिवाहन ॥१३५॥ वीरागमे ॥ चरपादोदकाल्लिंगं स्नाप्य प्रसादमर्पयेत् ॥ एतन्मार्गप्रचारी यः स भक्त इति कथ्यते ॥१३६॥ स्कन्दपुराणे ॥ लिंगभक्ताश्रयं वत्स शृणुष्वैकमनाऽधुना ॥ चरपादोदकाल्लिंगं स्नाप्य प्रसादमर्पयेत् ॥१३७॥ निरंजनस्य शुद्धस्य निस्स्थलस्य चरस्यच ॥ पादांबुना लिंगमूर्तेः स्नानं कुर्वीत भाजनम्॥तत्प्रसादेन तं पश्चाच्छिष्यःप्राणे विनिक्षिपेत् ॥१३८॥ पा-

---

चरवस्तूच्या रूपानें दिसते, त्या चरस्वरूपी परशिवयोग्याचा भुक्तशेष (प्रसाद) परब्रह्मस्वरूप आहे. ह्मणूनच त्या प्रसादाचें सेवन करावें. त्या प्रसादान्न भोजनानें तृप्ति होते, यांत संशय नाहीं. (१३३) ब्रह्मगीतेंत ह्मटलें आहे कीं, जंगमाचें पादोदक आणि जंगमाचा प्रसाद सेवन करावा. जंगमाचें पादोदक आणि प्रसाद जे सेवन करितात त्यांस मोक्षाची प्राप्ति होते हें परमेश्वराचें बोलणें अगदीं खरें आहे. (१३४) ह्याचसंबंधानें परमरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या पादतीर्थानें शिवलिंगास अभिषेक करणें फार चांगलें आहे, शिव ह्मणतात पार्वती, त्याचा (जंगमाचा) प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून दाखविणें कल्याणकारक आहे. (१३५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–हे मयूरवाहना, कार्तिकेया, मी तुला असें सांगतों कीं, जंगमलिंगाचा प्रसाद इष्टलिंगास समर्पण करावा आणि जंगमलिंगाच्या पादतीर्थांनें इष्टलिंगास अभिषेक करावा. (१३६) वीरागमांत असें ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या पादोदकानें इष्टलिंगास स्नान घालावें आणि जंगमाचा प्रसाद इष्टलिंगास समर्पण करावा. ह्यारीतीनें जो मनुष्य नियमानें चालतो त्यास भक्त असें ह्मणावें. (१३७) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–मुला कार्तिकेया, मी तुला शिवलिंगभक्तांचा धर्म कसा आहे तें सांगतों, तूं नीट लक्ष्य लावून ऐकून घे. जंगमाच्या पादोदकानें इष्टलिंगास अभिषेक करून जंगमास अर्पण केलेल्या अन्नाचा इष्टलिंगास प्रसाद समर्पण करावा. (१३८) जंगमलिंग हा निरंजन असून निर्दोष आहे, त्यास स्थल नाहीं, त्याचें पादोदक घेऊन त्यानें इष्टलिंगास स्नान घालावें हें योग्य आहे. व त्या जंगमाचा प्रसाद शिष्यानें इष्टलिंगाच्या ठिकाणीं समर्पण करावा. (१३९) पादोदक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दोदकं प्रसादान्नं विशेषमधुनोच्यते ॥ मत्प्राणो जंगमो नित्यं मल्लिंगं जंगमस्तथा ॥१३९॥ वीरागमे ॥ पादाभिषेकसलिलं भुक्तशेषान्नमुत्तमम् ॥ अभिषेकं च नैवेद्यप्रसादं शिवलिंगके ॥१४०॥ तत्रैव ॥ पादतोयं च निर्माल्यं प्रसादं च चरस्य च॥ योऽपि लिंगार्पितं भुंक्ते स रुद्रोनात्र संशयः ॥१४१॥ शिवरहस्ये ॥ पादाब्जतोयनिर्माल्यप्रसादंतु चरस्य च॥ यस्तु लिंगार्पितं भुंक्ते स रुद्रो नात्र संशयः ॥१४२॥ स्कांदे॥ तस्माल्लिंगे प्रसादंच निर्माल्यांघ्रिजलं तथा ॥ अर्पयेच्चरलिंगस्य शृणु षण्मुख सर्वदा ॥१४३॥ वीरागमे ॥ जंगमस्य प्रसादं तं नैवेद्यार्थं प्रकल्पयेत् ॥ पादोदकजलस्नानं विशेषो हि ममोच्यते ॥१४४॥ शिवरहस्ये ॥ पादतीर्थप्रसादाभ्यां कुर्याल्लिंगार्चनं सदा ॥ यः सेवेत स भक्तानां ममरूपं तु पार्वति ॥१४५॥ पारमेश्वरागमे ॥ पादाभिषेकसलिलं लिंगमज्जनमुत्तमम् ॥ त-

---

आणि प्रसादान्न ह्यांमध्यें असलेला विशेष आतां सांगतों. जंगम हा माझा प्राण आहे आणि जंगम हाच माझें लिंग आहे. (१४०) वीरागमांत ह्मटलें आहे, जंगमाच्या पादोदकानें शिवलिंगास अभिषेक करावा, आणि जंगमाच्या प्रसादान्नाचा इष्टलिंगास नैवेद्य समर्पण करावा. जंगमाचें पादोदक आणि प्रसाद श्रेष्ठ आहेत. (१४१) तेथेंच आणखी असेंही सांगितलें आहे कीं, जंगमाचें पादोदक, जंगमाचें निर्माल्य आणि जंगमाचा प्रसाद जो कोणी मनुष्य अगोदर शिवलिंगास समर्पण करून मग आपण भक्षण करितो तो प्रत्यक्ष शंकर आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. (१४२) शिवरहस्यांत ह्मटलें आहे, जंगमाच्या चरणकमलांचें तीर्थ जंगमांचें निर्माल्य आणि जंगमांचा प्रसाद जो कोणी मनुष्य इष्टलिंगास समर्पण करून मग आपण भक्षण करितो तो प्रत्यक्ष शंकरच आहे ह्यांत संशय नाहीं. (१४३) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–मुला, कार्तिकेया, ऐक. जंगमलिंगाचें पादोदक, जंगमलिंगाचें निर्माल्य आणि जंगमलिंगाचा प्रसाद नेहमीं शिवलिंगास समर्पण करावा. (१४४) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–पार्वती, जंगमलिंगाचा प्रसाद मला नैवेद्याकरितां समर्पण करावा आणि जंगमलिंगाच्या पादोदकानें मला ( शिवलिंगाला ) अभिषेक करणें जास्त श्रेयस्कर आहे. (१४५) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात, पार्वती, जो कोणी मनुष्य जंगमाच्या पादोदकानें मला ( शिवलिंगाला ) अभिषेक करील व जंगमाच्या प्रसादान्नाचा शिवलिंगास नैवेद्य दाखवील आणि शिवभक्तांची चांगली शुश्रूषा करील तो प्रत्यक्ष माझें स्वरूप समजावा. (१४६) पारमेश्वरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या पादोदकानें शिवलिंगाला अभिषेक करणें कल्याणकारक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्प्रसादं च नैवेद्यं तथा मुक्तिफलं ध्रुवम् ॥ १४६ ॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ जंगमानांच चरणसलिलं पापनाशनम् ॥ प्रसादं मोक्षसिद्ध्यर्थं सत्यमीश्वरभाषितम् ॥१४७॥ जंगमस्य पादतीर्थं लिंगमज्जनमुत्तमम् ॥ तत्प्रसादं महादेवि नैवेद्यं शुभमंगलम् ॥१४८॥ ईश्वर उवाच ॥ तस्माजंगमलिंगस्य प्रसादेन ममार्पयेत् ॥ अभिषेकजलस्नानं विशेषं मम कथ्यते ॥१४९॥ चरपादोदकं लिंगे स्नानं प्रसादमर्पयेत् ॥ प्रचारानुभवश्चेति सोऽपि भक्तश्च कथ्यते ॥१५०॥ जंगमो ज्ञानरूपश्च क्रियारूपं च लिंगकम् ॥ तदंघ्रिजलस्नानं च शेषं समर्पणं भवेत् ॥१५१॥ तस्माज्जंगमलिंगस्य प्रसादः सेवितो मया ॥ पज्जलेनैव स्नानं हि कर्तव्यं शिखिवाहन ॥१५२॥ लिंगभक्ताश्रयं वत्स शृणुष्वैकमनास्सदा ॥ चरपादोदकं लिंगे स्नाप्य प्रसादमर्पयेत् ॥१५३॥ नंदिकेश्वर उवाच॥ पादोदकं प्रसा-

---

आहे, आणि जंगमाचा प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून समर्पण करणें हें खरोखर मोक्षप्राप्ति करून देणारें आहे. (१४७) ब्रम्हाण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगमाचें पादोदक सर्व प्रकारच्या पातक्यांचा नाश करितें, आणि जंगमाचा प्रसाद मोक्षप्राप्ति करून देतो हें परमेश्वराचें ह्मणणें अगदीं खरें आहे. (१४८) शिव ह्मणतात–पार्वती जंगमाच्या पादोदकानें शिवलिंगास अभिषेक करणें चांगलें, आणि जंगमाचा प्रसाद शिवलिंगाला नैवेद्य ह्मणून समर्पण करणें कल्याणकारक आणि मंगलकारक आहे. (१४९) शिव ह्मणतात–ह्यासाठीं जंगमलिंगाचा प्रसाद मला ( शिवलिंगाला ) समर्पण करावा आणि जंगमाच्या पादोदकानें मला अभिषेक करावा हें जास्त श्रेयस्कर आहे. (१५०) जो मनुष्य जंगमाचें पादोदक घेऊन इष्टलिंगास अभिषेक करितो, जंगमाचा प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून समर्पण करितो व वीरशैवमताची ज्याला माहिती व अनुभव आहे त्याला भक्त ह्मणावें. (१५१) जंगम हा ज्ञानस्वरूप आहे, इष्टलिंग हें क्रियास्वरूप आहे; त्याचे पादोदकानें इष्टलिंगास अभिषेक करावा आणि त्याच्या प्रसादाचा इष्टलिंगास नैवेद्य समर्पण करावा. (१५२) शिव ह्मणतात–मुला षडानना, ह्यासाठींच मी जंगमलिंगाचा प्रसाद आपणास नैवेद्य ह्मणून मानलेला आहे. जंगमाच्या पादोदकानें मला अभिषेक करावा. (१५३) शिव ह्मणतात–मुला कार्तिकेया, लिंगभक्तांचा वर्तनक्रम कसा असतो तो मी तुला सांगतों. तूं नीट लक्ष्य देऊन ऐक. जंगमलिंगाच्या पादोदकानें शिवभक्तानें नेहमीं शिवलिंगास अभिषेक करावा आणि जंगमलिंगाचा प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून समर्पण करावा. (१५४) नंदिकेश्वर म्हणतो, हे गणश्रेष्ठा, जे कोणी मनुष्य जंगमांचें पादोदक ग्रहण करितात

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दान्नं नित्यमासेविनां नृणाम् ॥ दशपापविनाशस्तु कथ्यते गणपुंगः ॥१५४॥ मत्प्राणो जंगमो देवि मल्लिंगं जंगमस्तथा॥ आवयोस्तत्प्रसादस्तु भोग्यः स्यादिति निश्चिनु ॥१५५॥ वीरागमे ॥ स्वयं प्रसादरूपोऽयं सच्चिज्जंगम उच्यते ॥ सौख्यं शतगुणाधिक्यं प्रसादात्प्राप्यते नृणाम् ॥१५६॥ शाकटायने ॥ शिष्यप्राणो गुरुर्देवि गुरुप्राणस्तु जंगमः ॥ जंगमस्य प्रसादः स्यात्सर्वशास्त्रेषु गीयते ॥१५७॥

इति श्रीवीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण्य श्रीसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे जंगममाहात्म्यस्थलं नाम षोडशप्रकरणं समाप्तम् ॥

---

आणि जंगमांचें प्रसादान्न नेहमीं भक्षण करितात, त्यांच्या दहा जन्मांतील पातकांचा नाश होतो असें ह्मणतात. (१५५) शिव ह्मणतात–पार्वती, जंगम हा माझा प्राण आहे आणि जंगम हेंच माझें इष्टलिंग आहे, जंगमाचा व माझा प्रसाद शिवभक्तांनीं अवश्य भक्षण करावा हें पक्कें समज. (१५६) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगम हा स्वतः प्रसादस्वरूपी आहे, त्यालाच सत् आणि चित् असें ह्मणतात. त्याच्या प्रसादानें मनुष्याला शंभरपटीनें जास्त सुख लागतें. (१५७) शाकटायनांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–पार्वती, गुरु हा शिष्याचा प्राण आहे आणि जंगम हा गुरूचा प्राण आहे, ह्यासाठींच जंगमाचा प्रसाद सर्वांनीं घेतला पाहिजे असें शास्त्रांत सांगितलें आहे.

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वराचार्यांत श्रेष्ठ ह्मणविणाऱ्या, वीरशैवांच्या षट्स्थलमार्गांची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या श्रीसिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील जंगममाहात्म्यस्थलनांवाचें सोळावें प्रकरण संपलें.

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

## ॥ अथ प्रसादमाहात्म्यस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ सप्तदशप्रकरणम् ॥

अथ एवं सर्वांगेषु परमानंदवद्भक्ताः स्वस्वीकृतपरिणामप्रसादमाहात्म्यं कथमित्याकांक्षायामनंतरं प्रसादमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ मैत्रेयोपनिषदि॥अथ य एष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परंज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यत ॥ एष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति ॥१॥ आदित्यपुराणे ॥ शिवप्रसादमाहात्म्यं सिद्धकिन्नरगुह्यकाः ॥ विष्णुप्रमुखदेवाश्च ते न जानन्ति किं नराः ॥२॥ वीरागमे ॥ प्रसादं गिरिजादेवि सिद्धकिन्नरगुह्यकाः ॥ विष्णुप्रमुखदेवानामग्रगण्यमगोचरम्॥३॥बृहदागमे॥उपवाससहस्राणि प्राजापत्याऽयुतानि च॥शिवप्रसादसिक्थस्य कोट्यंशेनाऽपि नो समाः ॥४॥आदित्यपुराणे ॥ एक एवेति यो रुद्रः सर्ववेदेषु गीयते ॥ तस्य प्रसादलेशेन मुक्तिर्भवति शांकरि ॥५॥ यजुर्वेदे॥ रुद्रेणान्नममृतं देवा वै भोक्तुकामा वेदाश्च कामयन्ते

---

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. मग ह्याप्रमाणें सर्वांगांत परमानंद झाल्यानंतर, भक्ताच्या मनांत, आपण स्वीकार केलेल्या परिणामप्रसादाचें माहात्म्य कसें आहे, अशी शंका आल्यानंतर, पुढें प्रसादमाहात्म्यस्थल सांगतात. (१) मैत्रेयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, आतां हा श्रेष्ठ प्रसाद आमच्या शरीरापासून निघून परंज्योतिस्वरूप होऊन आपल्या रूपानेंच आपण प्रकट होतो. हा आत्मा होय असें ह्मणतात, हें अमृत आहे, हें संसाररूपी भयाच्या पलीकडचें आहे. (२) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवप्रसादाचा महिमा सिद्ध, किन्नर, गुह्यक आणि विष्णु, ब्रह्मदेव वगैरे मुख्य मुख्य देवांसही समजत नाहीं, मग मनुष्यांस काय समजणार? मुळींच समजणार नाहीं. (३) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शिवप्रसादाचें माहात्म्य पार्वतीला, सिद्धाला, किन्नरांला, गुह्यकांला आणि विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांस देखील समजत नाहीं; व तो शिवप्रसाद फारच श्रेष्ठ आहे. (४) बृहदागमांत ह्मटलें आहे कीं, प्राजापत्य, चांद्रायण वगैरे हजारो उपवास केले तरी शिवप्रसादाच्या एका शिताच्या एक कोटि हिश्या इतकी त्यांची योग्यता नाहीं. (५) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–पार्वती, जो रुद्र ह्मणून देव आहे तो एकच आहे, त्याचा महिमा सर्व वेदांत वर्णिलेला आहे, त्या शिवाचा थोडा जरी प्रसाद मिळाला तरी त्यामुळें मोक्षप्राप्ति होते. (६) यजुर्वेदांत ह्मटलें आहे कीं, रुद्रानें भक्षण केलेलें ( रुद्रास नैवेद्य

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥६॥ बृहदारण्यकोपनिषदि॥ यदन्नं पुरुषोऽश्नुते तदन्नं तस्य देवता॥७
सूतसंहितायाम् ॥ प्रसादे सति कीटो वा पतंगो वा नरोऽथ वा॥ दे
वा दानवो वापि लभते ज्ञानमुत्तमम् ॥८॥ वातुले ॥ रोगार्थमौष
सेव्यं दोषार्थं चात्मनस्तथा॥ सेव्यः शिवप्रसादोऽयं इति शैवी प
स्थितिः ॥९॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ आधिव्याधिविनाशाय लिंगोच्छिष्टं
सेवयेत्॥ भवरोगहरार्थं च चरोच्छिष्टं तु सेवयेत् ॥१०॥ लिंगपुराणे
चरलिंगप्रसादान्नं श्रद्धया यस्तु सेवयेत्॥ क्षीयंते सर्व पापानि स
मुक्तो नात्र संशयः ॥११॥ मार्कण्डेयपुराणे॥ अश्वमेधसहस्राणि वाज
पेयशतानि च॥ चरोच्छिष्टाणुमात्रेण नो समानानि तानि वै॥१२॥ जं
गमानां प्रसादान्नं यो भुंक्ते श्रद्धयान्वितः॥ तदीयोच्छिष्टमासाद्य स
यांति परां गतिम् ॥१३॥ जंगमस्य प्रसादं तु मत्स्यकूर्मादिजंतवः

---

ह्मणून समर्पण केलेलें) अन्न अमृतासारखें पवित्र आहे; तें अन्न आपणांस भक्ष करण्यास मिळावें अशी सर्व देव आणि चारही वेद इच्छा करितात. (७) बृहदा रण्यकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जें अन्न पुरुष भक्षण करितो तेंच अन्न त्या पु षाची देवता आहे. (८) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, प्रसाद भक्षण केला असत तो भक्षण करणारा किडा असो, पक्षी असो, मनुष्य असो, देव असो, किंवा दै असो, त्यास उत्तम प्रकारचें ज्ञान होतें. (९) वातुलतन्त्रांत असें ह्मटलें आहे कीं, रो दूर होण्यासाठीं मनुष्यानें जसें औषध घेतलें पाहिजे; तसा आत्म्याचा त्रिमर (आणव, माया, कार्मिक) दूर होण्यासाठीं हा शिवप्रसाद घेतला पाहिजे. अशी शि वशास्त्राची आज्ञा आहे. (१०) ब्रम्हाण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनोव्यथा आणि शरीररोग दूर व्हावयासाठीं इष्टलिंगाचा प्रसाद भक्षण करावा; आणि संसाररूपरो दूर व्हावयासाठीं जंगमाचें उच्छिष्टान्न (प्रसाद) भक्षण करावें. (११) लिंगपुराणां ह्मटलें आहे, जंगमलिंगाचा प्रसाद जो भक्तिभावानें सेवन करितो, त्याचीं सर्व पात नाश पावतात आणि तो मोक्षास जातो; ह्यांत कांहीं संशय नाहीं. (१२) मार्कण्डेय पुराणांत ह्मटलें आहे, एक हजार अश्वमेध यज्ञ केले, किंवा शंभर वाजपेय य केले; तरी जंगमाच्या उष्ट्या अन्नाच्या एका शिताची देखील बरोबरी होत नाहीं. इतका जंगमप्रसादाचा महिमा अलौकिक आहे. (१३) जंगमांचें प्रसादान्न जो मनुष्य भक्तिभावानें भक्षण करितो, त्या मनुष्याचें उच्छिष्ट अन्न भक्षण केलें तर बाकी दुसरे सर्व लोक उत्तमगतीस जातात. (१४) जंगमाचें प्रसादान्न मासे, कांसव वगै जलचरप्राणी भक्षण करतील, तर ते सर्वजण देखील रुद्रलोकास जाऊन मिळ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भुंजीयुर्यदि ते सर्वे रुद्रलोकमवाप्नुयुः ॥१४॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ भक्षयेद्यो नरो भक्त्या पवित्रमतिशुद्धिदम् ॥ शुद्धात्मा ब्राह्मणस्तस्य पापं क्षिप्रं विनश्यति ॥१५॥ वसिष्ठोऽपि गरिष्ठोऽभूत्प्रसादस्य प्रभावतः ॥ प्रसादसेवनाज्जातो विश्वामित्रो महामुनिः ॥१६॥ पाणिनिश्च कणादश्च कपिलो गौतमादयः ॥ प्रसादसेवनाद्ध्यानादर्चनाद्धारणादपि ॥१७॥ जाता दर्शनकर्तारः श्रावयन्ति जगत्त्रयम् ॥ नानापुराणवेदेषु रहस्यं परिभाषितम् ॥ इमं प्रसादं भुंजानो विरिंचिः किलजैमिने ॥१८॥ ब्रह्मगीतायाम् ॥ प्रसादरूपमाख्यातं माधवाद्यस्य दुर्लभम् ॥ रुद्रादिदेवतागोप्यं कथ्यते मुनिपुंगव ॥१९॥ प्रसादस्य स्वरूपं तु मया नारायणेन च ॥ रुद्रेणापि सुरावक्तुमशक्यं कल्पकोटिभिः ॥२०॥ सूतसंहितायाम् ॥ ब्रह्मोवाच ॥ प्रसादेन विना विष्णुर्न जानाति महेश्वर ॥ त्वामहं च न जानामि देवताः सकला अपि ॥२१॥ वीरागमे ॥ वेदादिसर्वशास्त्रेषु

---

तील. (१५) ब्रम्हाण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य अतिशय पवित्र आणि अतिशय निर्दोष करणारें जंगमाचें प्रसादान्न भक्तिपूर्वक भक्षण करितो, तो निष्पाप स्वभावाचा ब्राह्मण समजावा; त्याचें पाप तात्काळ नाश पावतें. (१६) जंगमाचा प्रसाद भक्षण केल्यामुळें वसिष्ठ ऋषि जास्त मोठेपणा पावले, आणि जंगमाचा प्रसाद भक्षण केल्यामुळें विश्वामित्र ऋषि मोठा ऋषीश्वर झाला. (१७) पाणिनि, कणाद, कपिल, गौतम वगैरे मोठमोठे ऋषीश्वर अनुक्रमानें प्रसाद सेवनामुळें, शिवध्यानामुळें, शिवपूजनामुळें आणि शिवनाम स्मरण करण्यामुळें (१८) मोठमोठे शास्त्रकर्ते झाले; व ते आपलें शास्त्र जगांतील सर्व लोकांस ऐकवूं लागले. असें अनेक प्रकारचीं पुराणें आणि अनेक प्रकारचे वेद ह्यांत वर्णन केलें आहे. जैमिने, तुला फार काय सांगूं? हा जंगमाचा प्रसाद प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें देखील भक्षण केला. (१९) ब्रह्मगीतेंत सांगितलें आहे कीं, प्रसादाचें स्वरूप हें प्रख्यात आहे, हें श्रीविष्णु सारख्या मुख्य मुख्य देवांस देखील कळण्यास फार कठिण पडतें; रुद्रादिक देव ह्यास फार महत्वाचें मानतात; तरी पण मुनीश्वरा, मी हें तुला सांगतों. (२०) हे परमेश्वरा, जंगमलिंगाच्या प्रसादाचें माहात्म्य यथार्थ रीतीनें वर्णन करण्यास मला (ब्रह्मदेवाला), श्रीविष्णूला, रुद्राला आणि इतर तेहतीस कोटि देवांला एक कोटि कल्पवर्षें देखील पुरणार नाहींत. (२१) सूतसंहितेंत ब्रह्मदेवानें ह्मटलें आहे, हे महेश्वरा, प्रसाद झाल्यावांचून (जंगमाचा प्रसाद भक्षण केल्यावांचून) तुझें यथार्थस्वरूप श्रीविष्णूला समजत नाहीं, मला (ब्रह्मदेवाला) समजत नाहीं आणि सर्व देवादिकांसही समजत नाहीं. (२२) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, वेद आणि सर्व शास्त्रें ह्यांत मुख्य-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कथ्यते सविशेषतः ॥ सर्वकर्ता परानंदः प्रसादो निजभावनः ॥२२॥ शिवाद्वैते ॥ शिवाचार्यातिथीनां च प्रसादाच्छिवतां गताः ॥ रुद्राश्च प्रमथाश्चैव देवतानां तु किं पुनः ॥२३॥ प्रसादोऽयमनाद्यन्तो विकल्पाखण्डसंस्थितः ॥ विशुद्धःशेष इत्यैव प्रसादोऽपि महांस्तथा ॥२४॥ वीरागमे ॥ शून्यनिःशून्ययोर्मध्ये परंज्योतिः प्रकाशते ॥ तत्प्रकाशः प्रसादः स्यात्प्रसादः शून्यरूपकः ॥२५॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ परंज्योतिः परं तत्वं परात्परतरं तथा ॥ परवस्तु प्रसादः स्यादप्रमाणं प्रसादकः ॥२६॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ यः पुमान् मामकोच्छिष्टं भुंक्ते प्रत्यहमादरात् ॥ सोऽपि मत्सदृशः प्रोक्तश्चरुभुक्तो यथा तथा ॥२७॥ ईशानसंहितायाम् ॥ किं दीक्षया किं तपसा किं ध्यानेन जपेन किं ॥ शृणु

---

त्वेंकरून असें सांगितलें आहे कीं, प्रसाद हा सर्वकांहीं करणारा आहे, तो परमानंदस्वरूप आहे, त्याचा आपण मनापासून स्वीकार करावा. (२३) शिवाद्वैतांत असें सांगितलें आहे कीं, श्रीशंकर, आचार्य आणि अतिथि ह्यांच्या प्रसादानें रुद्र वगैरे मुख्य मुख्य प्रमथगण शिवस्वरूप झाले ( त्यांचें कल्याण झालें ); मग इतर देवांचें कल्याण झालें असेल ह्यांत काय आश्चर्य आहे? (२४) प्रसाद हा अनादिकालापासून असून त्याचा कधींही नाश होत नाहीं, त्यास कोणताही विकल्प नसून तो परिपूर्णपणानें राहतो, तो निष्पाप असून त्याला शेष असेंही नांव आहे, त्याचें सामर्थ्य अलौकिक आहे. (२५) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शून्य आणि निःशून्य ह्यांच्यामध्यें जें श्रेष्ठतेज प्रकाशित होतें, त्या तेजाचाच प्रसाद हा प्रकाश आहे, प्रसाद हा शून्यस्वरूप आहे. (२६) सिद्धान्तशिखामणींत ह्मटलें आहे कीं, प्रसाद हा श्रेष्ठ तेज आहे, श्रेष्ठ तत्व आहे, आणि तसाच श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, प्रसाद ही श्रेष्ठवस्तु असून त्याचें प्रमाण ( मर्यादा ) करितां येत नाहीं. तो प्रसाद करणाराही श्रेष्ठ आहे. (२७) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे, जो पुरुष माझें उच्छिष्ट अन्न ( प्रसाद ) दररोज आवडीनें भक्षण करितो, तो पुरुष देखील माझ्यासारखाच धन्य समजावा; हविष्यान्न भक्षण करणारा मनुष्य जसा धन्य आहे, तसाच जंगमाचें उष्टें अन्न ( प्रसाद ) भक्षण करणाराही धन्य आहे. (२८) ईशानसंहितेंत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात, पार्वती, मी तुला एक महत्वाची गोष्ट सांगतों, तूं लक्ष्य देऊन ऐक. जो कोणी मनुष्य माझें उच्छिष्टान्न ( प्रसाद ) भक्षण करीत असेल, त्याला दीक्षा घेऊन तरी काय करावयाचें आहे? तपश्चर्या करून तरी काय करावयाचें आहे ? ध्यान करून तरी काय करावयाचें आहे ? किंवा जप करून तरी काय करावयाचें आहे ? प्रसादा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देवि वरारोहे मद्भुक्तं यदि भुज्यते ॥२८॥ ईश्वर उवाच॥ अशौचं नैव विद्येत जातकं मृतकं तथा ॥ तेषां प्रसादजा शुद्धिः प्राशनं ये प्रकुर्वते ॥२९॥ कालिकाखण्डे ॥ गुरुप्रसादो मुक्त्यर्थं भुंक्त्ये लिंगप्रसादकम् ॥ गुरुकारुण्यतो लभ्यमखंडितमिदं द्वयम् ॥३०॥ स्कन्दपुराणे ॥ महापातकयुक्तो वा युक्तो वा सर्वपातकैः ॥ गुरुच्छिष्टेन शुद्धःस्यात्प्रायश्चित्तादिकं विना ॥३१॥ हरिवंशे ॥ साक्षात् प्रसादभोगेन भक्तो यल्लभते फलं ॥ यद्वक्तुं न हि मे शक्तिर्न गिरो न हि गीष्पतेः ॥३२॥ सूतसंहितायाम् ॥ प्रसाद नाम रुद्रस्य शाम्यते कर्म देहिनाम् ॥ देशिकालोकनाज्जातो विशिष्टोऽतिशयः स्मृतः ॥३३॥ शैवसंहितायाम् ॥ व्यासजैमिनिसंवादे ॥ व्यास उवाच ॥ देवदेवस्य वचसे विषयोऽयं हि जैमिने ॥ ये वीरभद्रशापिताः शिवभक्तिपराङ्मुखाः ॥३४॥ शंभोर-

---

त्यानें भक्षण केलें ह्मणजे सर्वकांहीं केल्यासारखें आहे. (२९) परमेश्वर ह्मणतात कीं, जे कोणी मनुष्य प्रसादान्नाचें भक्षण करितात, त्यांस जन्माच्या वेळचा सोयर नाहीं, आणि मरणाच्या वेळचें सुतकही नाहीं. त्यांनीं प्रसादान्न भक्षण केलें असल्यामुळें, त्यांच्या अंगीं सहजरीतीनें शुद्धता आलेलीच असते. (३०) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे, गुरूचा प्रसाद भक्षण केला असतां मोक्षाची प्राप्ति होते; आणि लिंगाचा प्रसाद भक्षण केला असतां ह्या लोकांत सर्व प्रकारचीं सुखें मिळतात. सद्गुरूची आपणावर पूर्ण कृपा असेल तरच गुरूचा प्रसाद आणि शिवलिंगाचा प्रसाद आपणास मिळतो, एरव्हीं मिळत नाहीं. (३१) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, कोणी एखादा मनुष्य महापातकी असो, किंवा त्याच्या हातून सर्व प्रकारचीं पापें घडलेलीं असोत, तो जर गुरूचें प्रसादान्न भक्षण करील, तर शुद्ध होईल; त्यास मग कोणतींही प्रायश्चित्तें घ्यावयास नकोत. (३२) हरिवंशांत ह्मटलें आहे कीं, प्रत्यक्ष प्रसादाचा उपभोग घेतला असतां भक्ताला जें फळ मिळतें, त्याचें वर्णन करण्याची माझी शक्ति नाहीं, सरस्वतीची शक्ति नाहीं, आणि वृहस्पतीचीही शक्ति नाहीं. (३३) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, प्रसाद असें रुद्राचें नांव आहे; तो प्रसाद प्राणिमात्रांच्या कर्मांचा नाश करितो. तो प्रसाद गुरूच्या कृपादृष्टीनें होतो आणि तो प्रसाद अलौकिक असून त्याचें महत्व जास्त आहे. (३४) शैवसंहितेंत व्यास आणि जैमिनी ह्यांच्या संभाषणांत व्यासांनीं ह्मटलें आहे कीं, हे जैमिने, देवाधिदेवाच्या सांगण्यांतील हा महत्वाचा विषय (मुद्दा) आहे; ज्यास वीरभद्रानें शाप दिला आहे, जे कधींही शिवाची भक्ति करीत नाहींत; (३५) शंकराखेरीज इतर देवांची जे उपासना करितात,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न्यत्र देवेषु ये भक्ता ये न दीक्षिताः॥अशुद्धकर्मणःशंभोरन्यत्र समबुद्धय
॥३५॥ तेषामनर्हमीशस्य तत्प्रसादचतुष्टयम् ॥ देवस्वं देवताद्रव्यं नै
वेद्यं च निवेदितम् ॥३६॥ चंडद्रव्यं बहिः क्षिप्तं निर्माल्यं षड्वि
तथा ॥ देवस्वं ग्रामभूम्यादि दासीदासचतुष्टयम् ॥३७॥ हेमरूप्यं च र
त्नादि देवद्रव्यमिति स्मृतम् ॥ यत्संकल्प्य तु देवाय पत्रपुष्प
फलं जलम् ॥३८॥ अन्नपानादि तत्सर्वं नैवेद्यमिति कीर्तितम् ॥ शि
वोपभुक्तस्रग्गंधमन्नपानादिकं तथा ॥३९॥ निवेदितमिति प्रोक्तं सर्व
पापहरं परम् ॥ बहिः क्षिप्तमनर्हं हि अन्यद्रव्यत्वकारणात् ॥४०
पिशाचानांच सर्वेषामधिकारो हि सर्वदा ॥ एतत्त्रिविधनिर्माल्यम
नर्हमिति कथ्यते ॥४१॥ प्रमादाद्भोजनं कुर्याद्भूमेरप्येकमंगुलम्
किंचिद्द्रव्यापहारेण रौरवं नरकं व्रजेत् ॥४२॥ अपिच ॥ भगवानुवाच
मदीयभुक्तनिर्माल्यं पादांबुकुसुमं दलम् ॥ धर्ममर्थं च कामं च मो

ज्यांनीं शिवदीक्षा मुळींच घेतलेली नाहीं, जे अतिशय नीचपणाचें वर्तन करिता शिवाखेरीज इतर देवांविषयीं ज्यांची शिवासारखीच पूज्यबुद्धि आहे, (३६) अ लोकांस परमेश्वराचा चार प्रकारचा प्रसाद देणें योग्य नाहीं. ते चार प्रकार ह्मण देवस्व, देवताद्रव्य, नैवेद्य आणि समर्पण केलेली वस्तु, हे होत. (३७) बाहेर जें कलेलें असतें त्यास चण्डद्रव्य असें ह्मणतात; तें आणि निर्माल्य असे एकंदर प्रकार झाले. देवाचें द्रव्य, गांव, जमीन, दासदासी वगैरे हीं चार, (३८) सोनें, र रत्न वगैरे ज्यांस देवद्रव्य असें ह्मणतात त्या वस्तु, देवाला ( महादेवाला ) प फूल, फळ, पाणी वगैरे जे कांहीं पदार्थ समर्पण करावयाचा विचार केला अ ते, (३९) आणि अन्नपाणी वगैरे ज्या सर्वांस नैवेद्य असें ह्मणतात ते, व शिव अर्पण केलेले पदार्थ माळा, गन्ध, अन्न, पाणी वगैरे ज्यांस (४०) निवेदित ह्मणतात ते, हे सर्व फार उपयोगी असून पाप दूर करणारे आहेत. जें द्रव्य आपलें सून दुसऱ्याचें आहे व ह्मणून जें घेण्यास योग्य नाहीं त्याला बहिःक्षिप्त असें ह्मण (४१) ह्या सर्व द्रव्यावर नेहमीं पिशाचांचा अधिकार असतो; हें चण्डद्रव्य, बहिः आणि निर्माल्य हीं पूजेच्या कामीं लावण्यासारखीं नाहींत असें सांगितलें आहे. ( जो कोणी मनुष्य सहज चुकून विस्मृतीनें देवाच्या जमिनी ( शेत ) घेईल कोणत्याही द्रव्याची चोरी करील, तो त्यामुळें रौरवनरकास जाईल. (४३) आण परमेश्वरानें असें ह्मटलें आहे कीं, मीं उपभोग घेतलेलें निर्माल्य, पादोदक, आणि पान ह्यांची योग्यता इतकी मोठी आहे कीं, हे पदार्थ भक्ताला अनुक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

च दधते क्रमात् ॥४३॥ मल्लिंगधारिणो लोके देशिका मत्परायणाः मदेकशरणास्तेषु योग्यं नैवान्यजंतुषु ॥४४॥ लैंग्ये ॥ वसुरुद्रार्करूपेभ्यो मध्यपिण्डस्तु पुत्रदः ॥ वेदोक्तं रुद्रनिर्माल्यं किं पुनर्बहुभाषणैः ॥४५॥ सूतसंहितायाम् ॥ त्वादत्तेभिरुद्रसंतमेभिः शतं हिम असीय भेषजेभिः ॥ व्यस्तद्वेषो वितरं व्यं होव्य विनाशयत साविषूचिः ॥४६॥ कूर्मपुराणे ॥ यः श्राद्धकाले हरभुक्तशेषं ददाति काले पितृदेवतानाम्॥ तेनैव पिंडैश्च तिलैर्विमिश्रैराकल्पकोट्या पितरः सुतृप्ताः ॥४७॥ शैवपुराणे ॥ प्राणाग्निहोत्रं यः कुर्याच्छिवशैवप्रसादतः॥ अश्वमेधायुतं पुण्यं सिक्थे सिक्थे लभेन्नरः ॥४८॥ जावालशाखायाम् ॥ रुद्रेणात्तमश्नंति रुद्रेण पीतं पिबंति रुद्रेणाघ्रातं जिघ्रंति तस्माद्ब्राह्मणाः प्रशांतमनसो विद्वांसो निर्माल्यमेव भक्षयन्ति निर्माल्यमेव निषेवेत निर्माल्यमेवा-

---

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्यांची प्राप्ति करून देतात. (४४) ज्या लोकांनीं माझें इष्टलिंग धारण केलें आहे, जे देशिक (गुरु) आहेत आणि मलाच शरण येतात त्यांसच पादोदक, निर्माल्य, प्रसाद वगैरे द्यावा, इतरांस देऊं नये. (४५) लिंगपुराणांत ह्मटलें आहे, वसु, रुद्र आणि आदित्य नांवाचे जे तीन पिण्ड आहेत, त्यांत मधला पिण्ड हा पुत्रप्राप्ति करून देणारा आहे; रुद्रनिर्माल्य हें वेदोक्त (वेदांत सांगितलेलें) आहे, फार सांगण्यांत काय अर्थ आहे ? (४६) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, हे रुद्रा (शिवा), तूं भोजन करून दिलेल्या अर्थात्, अनंत सुख देणाऱ्या व संसाररोगाला औषधाप्रमाणें असणाऱ्या त्रिविध प्रसादांचा स्वीकार करणारा जो परमशैव लिंगभक्त असेल त्याच्यावरोवर शंभर वर्षेपर्यंत तुं वास कर. असा तो भक्त अहंकार ममकार सोडलेला असतो, व पापरहित असतो, भक्तियुक्त असतो, व शिवज्ञानानें युक्त असतो. असें सांगणारी श्रुति ऋग्वेदांत व यजुर्वेदांत आहे. (४७) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य श्राद्धाच्यावेळीं श्रीशिवास नैवेद्य समर्पण करून, त्यांतील उरलेलें अन्न पितृस्थानीं बसलेल्या ब्राह्मणांस (देवांस) अर्पण करितो, त्या अन्नानें व तीळ मिसळलेल्या पिंडांनीं त्याचे पितर एक कल्पकोटिवर्षेपर्यंत तृप्त होतात. (४८) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य शिवाच्या आणि शैवाच्या प्रसादानें प्राणाग्निहोत्र करील, त्यास प्रत्येक शिताशितांत दहालक्ष अश्वमेधयज्ञ केल्याचें पुण्य लागेल. (४९) जावालशाखेमध्यें ह्मटलें आहे कीं, विद्वान् लोक शंकरांनीं भक्षण केलेली वस्तु भक्षण करितात, शंकरांनीं प्राशन केलेली वस्तु प्राशन करितात, शंकरांनीं हुंगलेली वस्तु हुंगतात; ह्यासाठीं ब्राह्मण आणि शांतस्वभावाचे विद्वान् लोक निर्माल्यच भक्षण करितात, निर्माल्यच सेवन करितात, आणि निर्माल्यच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्नीयात् ॥ अस्मिन्नर्थे स्कांदे ॥ शिष्टाः श्रान्ताश्च रुद्रेण मुक्तमेव हि भुंजते घ्रातमेव हि जिघ्रंति पीतमेव पिबंति च ॥४९॥ शैवसंहितायाम् ॥ शंभोर्नैर्माल्यकं शुद्धं भुंजीयात्सर्वतो द्विजः ॥ अन्यदेवस्य निर्माल्यं भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥५०॥ स्कन्दपुराणे सूतसंहितायां यज्ञवैभवखण्डे ॥ सूत उवाच ॥ वृत्तम् ॥ शिवप्रसादेन विना न भुक्तिः शिवप्रसादेन विना न मुक्तिः ॥ शिवप्रसादेन समो न विद्यते शिवप्रसादादधिको न विद्यते ॥५१॥ शिवप्रसादेन शिवस्य सन्निधिः शिवप्रसादेन विशुद्धिरात्मनः ॥ शिवप्रसादेन युतस्य सुव्रताः न जन्मनाशं भवतः सदैव तु ॥५२॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ प्रसादानुभवः शैवमाहात्म्यप्रतिपादितम् ॥ इदं पवित्रं परममखिलागमबोधितम् ॥५३॥ वृत्तम् यद्ब्राह्मणस्त्वमसि नाकसदां निकायस्तुभ्यं निवेदितमभोज्यमिति स्मृतिर्न ॥ उच्छिष्टमीश्वरविशिष्टमिदं द्विजानां भूमौ न खेयमथवांभसि मज्जनीयम् ॥५४॥ पद्मपुराणे ॥ निर्विकल्पधिया शंभुभुक्तोच्छिष्टान्न

---

खातात. ह्याविषयीं स्कन्दपुराणांत ही सांगितलें आहे कीं, विद्वान् लोक आणि शांतस्वभावाचें लोक शंकरांनीं भक्षण केलेली वस्तुच भक्षण करितात, शंकरांनीं हुंगलेली वस्तु हुंगतात आणि शंकरांनीं प्राशन केलेली वस्तुच प्राशन करितात. (५०) शैवसंहितेंत ह्मटलें आहे कीं, शंकराचें निर्माल्य फार पवित्र आहे, ब्राह्मणहो, तें सर्वतोपरी भक्षण करण्यास योग्य आहे, अन्य देवांचें निर्माल्य भक्षण केलें तर चांद्रायणव्रत आचरण करावें. (५१) स्कन्दपुराणांत सूतसंहितेंत यज्ञवैभवखण्डांत सूतांनीं ह्मटलें आहे कीं, शिवप्रसादावांचून ह्या जगांत सुख लागत नाहीं, शिवप्रसादावांचून मोक्षाची प्राप्ति होत नाहीं, शिवप्रसादाच्या योग्यतेचा दुसरा पदार्थ ह्या जगांत नाहीं, आणि शिवप्रसादापेक्षां श्रेष्ठ अशी ही वस्तु ह्या जगांत नाहीं. (५२) शिवाच्या प्रसादानें मनुष्यास शिवाचें सान्निध्य ( जवळ राहण्याची जागा ) मिळते. शिवप्रसादानें आत्म्याची शुद्धि होते, हे सदाचारी ब्राह्मणहो, ज्या मनुष्याला शिवप्रसाद झाला आहे, त्याला पुनः जन्ममरणाचें भय राहत नाहीं. (५३) ब्रह्माण्डपुराणांत सांगितलें आहे कीं, प्रसादाचा अनुभव हा सर्व शिवागमांत वर्णन केलेला आहे, हा पवित्र असून श्रेष्ठ आहे. (५४) ज्या अर्थी तूं ब्राम्हण आहेस, आणि सर्व स्वर्गवासी देवतांचा आश्रयभूत आहेस; त्या अर्थी तुला अर्पण केलेली वस्तु अपवित्र ( खाण्यास अयोग्य ) होते अशी गोष्टच ( स्मृति ) नाहीं. ह्यासाठीं ईश्वराचा उरलेला प्रसाद ब्राह्मणांनीं जमिनींत पुरूं नये, आकाशांत फेंकून देऊं नये, किंवा पाण्यांतहीं पण बुडवूं नये. (५५) पद्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य मनांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri ४

पानकम् ॥ यो भुंक्ते स गणाधीशो यावज्जीवं प्रतिज्ञया ॥५५॥ मुण्डकोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ तेन सह भुंजीतेति शीवानुभूतमखिलं निर्माल्यं भोज्यं धार्यमिति द्विधा षड्विधं कैश्चिदिष्यते ॥५६॥ श्रुतिः ॥तन्निवेदितं प्रसादं भोज्यं धार्यमिति वासोविभूषणादीनामुपलक्षणम् ॥५७॥ ईशानसंहितायाम् ॥ शिवोपभुक्तनिर्माल्यं पवित्रं पापनाशनम् ॥ तस्माद्भुक्त्वा च पीत्वा च शिवेन सह मोदते ॥५८॥ निर्माल्यं परमानंदं निर्माल्यं शुद्धशैवदम् ॥ निर्माल्यं परमज्ञानं निर्माल्यं परमामृतम् ॥५९॥ शिरसा धारयेद्भक्त्या यो निर्माल्यमलोभतः ॥ अहमेव धृतस्तेन सोमः सोमकलाधरः ॥६०॥ शिरसा शिवनिर्माल्यं भक्त्या यो धारयेद्यदि ॥ अशुचिर्भिन्नमर्यादः सर्वावस्थां गतोऽपि वा ॥६१॥ सर्वदेवाप्रयुक्तात्मा नियमैश्च बहिः कृतः ॥ तस्य पापानि घोराणि ना-

---

कोणत्याही प्रकारची शंका न घेतां, शिवांनीं भक्षण केलेल्या अन्नांतील उरलेलें अन्न भक्षण करितो, किंवा शिवांनीं प्राशन केलेल्या उदकांतील उरलेलें पाणी पितो, तो आमरण शिवगणांचा अधिपति होतो; हा निश्चय आहे. (५६) मुण्डकोपनिषदांत झटलें आहे कीं, वेद असें सांगतो कीं, त्याचेबरोबर जेवावें, आणि शिवांनीं उपभोगिलेलें निर्माल्य आपण उपभोगावें, आणि धारण करावें, असे दोन प्रकार आहेत; कोणी कोणी सहा प्रकार मानतात. (५७) वेद असें सांगतो कीं, शिवास अर्पण केलेली वस्तु ( प्रसाद ) भक्षण करावी आणि धारण करावी. हाच नियम वस्त्र अलंकार वगैरेंसही लागू आहे. (५८) ईशानसंहितेंत झटलें आहे कीं, शिवांनीं उपभोगिलेलें निर्माल्य पवित्र असून पातकांचा नाश करणारें आहे. ह्यासाठीं तें निर्माल्यान्न भक्षण करणारा आणि निर्माल्योदक प्राशन करणारा मनुष्य शिवाबरोबर सुखानें राहतो. (५९) निर्माल्य हें परमानंदस्वरूप आहे, निर्माल्य हें शुद्ध शिवपदाची प्राप्ति करून देणारें आहे, निर्माल्य हें उत्तम ज्ञान आहे, आणि निर्माल्य हा उत्तम मोक्ष आहे. (६०) जो मनुष्य निर्लोभ मनानें शिव निर्माल्य आपल्या मस्तकावर धारण करितो, त्यानें प्रत्यक्ष माझे कपाळावर चंद्र असून मी पार्वतीसहित वसलों असतां, मलाच धारण केल्यासारखें आहे. (६१) जो कोणी मनुष्य भक्तिभावानें शिवनिर्माल्य आपल्या मस्तकावर धारण करितो, तो कितीही पातकी असो, त्यानें आपली चालरीति सोडलेली असो, किंवा तो कोणत्याही स्थितींत असो, (६२) व सर्व देवांचा देव अशा शिवाच्या ठिकाणीं मन ठेवणारा नसो, किंवा तो कोणतेही नियम न पाळो, अथवा त्याचीं पापें कितीही अनिवार ( भयंकर ) असलीं, तरी त्या पातकांचा श्रीशंकर नाश

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शयत्येव शंकरः ॥६२॥ लौकिकानि तथान्येषामपि मुक्तिर्न विद्यते। पाषंडिनोऽपि मुच्यन्ते गुरोश्चैव प्रसादतः ॥६३॥ लिंगद्वयप्रसादं यो भुंक्ते श्रद्धयान्वितः ॥ तदीयोच्छिष्टमासाद्य सर्वे यांति परां गतिं ॥६४॥ चराचरप्रसादान्नं भुक्तं तच्छेषधारिणाम् ॥ चराचराणां भूतानामपि मुक्तिर्भवेत्प्रिये ॥६५॥ मुंडकोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ जिव्हायां गुरुमशोपोर्पयेत् चरं प्राश्नाति मम इवार्पितं भवति चरं पिबति अमृतमिव पिबति ममैवार्पितं भवति येऽश्नंति साक्षाच्चरोच्छिष्टमेवमेतद्भयं क्षयति निर्माल्य निरहं निर्वाणं च स्यात् प्रसादमपि धन्यमामनंति ॥६६॥ कामिकागमे ॥ ईश्वर उवाच ॥ नैवेद्यं मम तूच्छिष्टं भुंक्ते प्रत्यहमादरात् ॥ सोऽपि मत्सदृशः प्रोक्तश्चरुभुक् च तथा भवेत्॥६७ सूतसंहितायाम् ॥ प्रसादे सति विज्ञातुं शक्यते परमेश्वरः ॥ प्रसादेन विना नैव शक्यते सर्वजंतुभिः ॥६८॥ उपायेन शिवो भाति भाति कि

---

करितो. (६३) ह्या जगांत आपल्या हातून घडणारीं दुसरींही पातकें नाश पावतात ह्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही उपायानें मोक्षप्राप्ति होत नाहीं. गुरूचा प्रसाद झाल असतां, पाखंडी मनुष्य असले, तरी ते देखील मुक्त होतात. (६४) जंगमलिंगाच आणि इष्टलिंगाचा प्रसाद जो कोणी भक्तिभावानें भक्षण करितो, त्याचें उच्छिष्टा भक्षण करून सर्व प्राणिमात्र उत्तमगतीस जातात. (६५) जंगमलिंग आणि स्थावर लिंग ह्यांनीं भक्षण केलेल्या अन्नापैकीं वाकीं उरलेलें अन्न शेषान्न ह्या बुद्धीनें ज सर्व स्थावरजंगम प्राणी भक्षण करतील, तर पार्वती, ते सर्वजण खात्रीनें उद्धरू जातील. (६६) मुंडकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, गुरूच्या जिभेवर अन्न व उद समर्पण करावें. चरवस्तु जें भक्षण करील, तें मलाच अर्पण केल्याप्रमाणें आहे. जे कोणी शिवभक्त प्रत्यक्षरीतीनें चरमूर्तीचें उच्छिष्ट ( प्रसादान्न ) भोजन करतील, त भक्तांची संसारवन्धाची भीति क्षय पावते. जे लोक ( भक्त ) चरमूर्तींचा प्रसाद प वित्र मानतील, त्यांचे अहंकार, ममकार वगैरे, निर्माल्य अथवा प्रसादांनींच नाहीं होतात, व त्यांना मोक्षप्राप्ति होते. (६७) कामिकागमांत शिवांनीं ह्मटलें आहे कीं माझा उच्छिष्ट प्रसाद जो कोणी मनुष्य दररोज भक्तिपूर्वक भक्षण करितो, तो मनुष्य माझ्या योग्यतेचा होतो. तसाच हविष्यान्न ( चरु ) भक्षण करणारा मनुष्यही धन्य होतो. (६८) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, आपणावर गुरूचा प्रसाद झाला, तर आपणास परमेश्वराचें यथार्थरूप ओळखतां येतें. गुरूचा प्रसाद झाला नसेल तर सर्व प्राणिमात्रांला परमेश्वराचें स्वरूप मुळींच समजत नाहीं. (६९) भक्तिमार्गानें वर्तन केलें असतां शिवाची प्राप्ति होते; किंवा गुरूचा प्रसाद आपल्यावर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तु प्रसादतः ॥ स एवाहं स्वप्रकाशो भामि विश्वप्रकाशकः ॥६९॥ दे-विकालोत्तरे ॥ ब्रह्मा विष्णुस्तथा रुद्रो इंद्रो वायुः प्रजापतिः ॥ बृहस्प-तिरथादित्याः शुक्रः स्कन्दो भृगुस्तथा ॥७०॥ एते चान्ये च बहवो मुनयः शंसितव्रताः ॥ एते चान्ये ग्रहगणास्सर्वे प्रसादसंभवाः ॥७१॥ मारुतानलशक्राद्या ये मंत्राः परिकीर्तिताः ॥ प्रसादोच्छिष्टसंभूताः सर्वे चामोघशक्तयः ॥७२॥ देवदानवगन्धर्वरक्षोयक्षोरगेश्वराः ॥ किन्नरा-प्सरसः सिद्धाः सर्वे प्रसादसंभवाः ॥७३॥ ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तं जग-देतच्चराचरम् ॥ भूतं भव्यं भविष्यच्च प्रसादादेव जायते ॥७४॥ श्रुतिः ॥ नवभूमिः समुद्रा उच्छिष्टचरप्रसादशेष अधिश्रिता दिवः ॥ ७५॥ आ-र्यभट्टारके ॥ प्र शब्देन शिवो ज्ञेयः साशब्दाच्छक्तिरुच्यते ॥ तयोर्योगस्तु दः शब्दस्त्रिवर्णमभिधीयते ॥७६॥ प्रसादोऽयं प्रकारः स्यात्साकारो भ-क्तिरुच्यते ॥ प्रसादपूर्विका भक्तिर्मुक्तिदेति दकारकः ॥७७॥ शिवरहस्ये॥

---

झाला असल्यास, गुरूची प्राप्ति होते; एऱ्हवीं होत नाहीं. जो शिव स्वयंप्रकाश आणि सर्व त्रैलोक्यास प्रकाशित करतो, तो शिव मीच आहें. (७०) देविकालोत्तरांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव, विष्णु, रुद्र, इंद्र, वायु, प्रजापति, बृहस्पति, आदित्य, शुक्र, स्कन्द, गुरु, (७१) हे, आणखी दुसरे असेच शेकडों सदाचारी मुनीश्वर, आणखी सर्व ग्रहांचे समुदाय, प्रसादापासून उत्पन्न झाले आहेत. (७२) वायु, अग्नि, इंद्र वगैरे जे मंत्र सांगितलेले आहेत, ते सर्व उच्छिष्ट प्रसादापासून उत्पन्न झाले आहेत; ते सर्व प्रयत्न सफळ करणारे आहेत. त्यांची शक्ति कधींही फुकट जात नाहीं. (७३) देव, दानव, गन्धर्व, राक्षस, यक्ष, मोठमोठे सर्प, किन्नर, अप्सरा, सिद्ध, हे सर्व प्रसादापासून उत्पन्न झाले आहेत. (७४) ब्रह्मदेवापासून तों तहत एका गवताच्या काडीपर्यंत जें कांहीं स्थावरजंगम जग आहे, पूर्वी झालें होतें, आतां आहे, आणि पुढें होणार आहे, तें सर्व प्रसादापासूनच उत्पन्न होतें. (७५) वेद असें ह्मणतो कीं, नवखण्ड भूमि, सप्तसमुद्र व तेजोमय लोक हे सर्व जंगमाच्या उच्छिष्ट प्रसादाच्या आश्रयानें राहतात. (७६) आर्यभट्टारकांत ह्मटलें आहे कीं, 'प्र' ह्या शब्दाचा अर्थ शिव असा समजावा, 'सा' ह्या शब्दाचा अर्थ शक्ति असा होतो, आणि 'द' हें अक्षर त्या शिवशक्तींचा समागम अशा अर्थाचें आहे. सारांश, "प्रसाद" हीं तीन अक्षरें शिव, शक्ति आणि शिवशक्तींचा समागम अशा अर्थाचीं आहेत. (७७) प्र-साद ह्या शब्दांतील 'प्र' ह्या अक्षराचा अर्थ प्रसाद असा करावा, 'सा' ह्या अक्ष-राचा अर्थ भक्ति असा करावा आणि 'द' ह्याचा अर्थ मुक्ति देणारा असा करावा. (७८) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, 'प्र' हें अक्षर परमज्ञान आहे, 'सा' हें अक्षर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रशद्वः परमं ज्ञानं सा शद्वो मुक्तिसाधनः ॥ दशद्वो धर्मरूपश्च प्रसादश्चाभिधीयते ॥७८॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ प्रसाद आद्यन्तविवर्जितः स्वयं स्याद्वन्द्यरूपः परिशेषलक्षणम् ॥ विकल्पहीनः परिशुद्धवस्त्वति प्रभाव एषोऽस्य निजस्वभावः ॥७९॥ शिवधर्मशास्त्रे ॥ आद्यन्तरहितो नित्यः परिपूर्णस्वरूपकः ॥ भोगमोक्षप्रदाता च निर्मलोऽनुपमानतः ॥८०॥ मानातीतः प्रसादोऽयमवाङ्मानसगोचरः ॥ पवित्रः परमानंदः प्रसाद इति गीयते ॥८१॥ अतिथेः प्रसादोऽदोषोऽज्ञानमार्गकालुष्यवर्जितः पवित्रः परमानंदप्रसाद इति गीयते योग्यः स्वीकर्त्तुम् ॥ मन्नाथ गुरूपात्तप्रसादान्नास्ति परः तस्मात्तस्य प्रसादारोग्यकरःपूत इति गीयते स्वीकुर्यान्तं परिपूर्णे शिवे विशुद्धबुद्धिमान् ॥८२॥ कालिकाखण्डे ॥ प्रसादस्त्रिविधं प्रोक्तं शुद्धं सिद्धं प्रसिद्धकम् ॥ शुद्धं लिंगमु-

---

मुक्तीचें साधन आहे, 'द' हें अक्षर धर्मस्वरूप आहे, त्यावरून त्यास प्रसाद असें नांव पडलें. (७९) वातुलागमांत ह्मटलें आहे कीं, प्रसादाला जन्म नाहीं व मरणही नाहीं. तो स्वतः नमस्कार करण्यास योग्य आहे. परिशेष हें त्याचें लक्षण आहे, प्रसादाला विकल्प नाहीं. प्रसाद ही अतिशय निष्पाप वस्तु आहे; प्रसादाचा प्रभाव हा त्याचा स्वतःचा गुण आहे. (८०) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, प्रसादाला आदि नाहीं, व अंतही नाहीं. प्रसाद हा नित्य आहे, प्रसाद हा परिपूर्णस्वरूप आहे, प्रसाद हा ऐहिकसुख आणि मोक्षसुख ह्यांची प्राप्ति करून देतो; त्याची बरोबरी करूं शकेल असा या जगांत दुसरा कोणताही पदार्थ नाहीं. प्रसाद हा फार निष्पाप आहे. (८१) प्रसादाचें प्रमाण करितां येत नाहीं. त्याचें यथार्थस्वरूप वाणीस आणि मनास समजत नाहीं. तो फार पवित्र आणि आनंदस्वरूप आहे. (८२) अतिथीचा प्रसाद हा निर्दोष आहे, ज्ञानमार्गांतील अंधार तो नाहींसा करितो, तो पवित्र आहे, आणि अतिशय आनंद देणारा आहे, म्हणून त्यास प्रसाद असें ह्मणतात. तो प्रसाद स्वीकार करण्यासारखा आहे. माझा सर्वतोपरी नाथ ( स्वामी ) अशा गुरूपासून मिळालेल्या प्रसादापेक्षां मला कांहीं जास्त नाहीं. ह्यासाठीं त्या गुरूचा प्रसाद आरोग्यदायक आणि पवित्र आहे असें समजून, बुद्धिमान् मनुष्य त्या प्रसादाचा स्वीकार करितो. त्यामुळें त्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन, शिवावर त्याची दृढभक्ति बसते. (८३) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे कीं, प्रसादाचे तीन प्रकार मानलेले आहेत, ते १ शुद्ध २ सिद्ध आणि ३ प्रसिद्धक हे होत. शिवलिंगाच्या मुखापासून उरलेल्या प्रसादास शुद्धप्रसाद असें ह्मणतात; जंगमलिंगाच्या उरलेल्या प्रसादास सिद्धप्रसाद

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

खात्यक्तं सिद्धं चरविसर्जितम् ॥ प्रसिध्दं गुरुणा त्यक्तं इत्येत्तत्रिविधं स्मृतम् ॥८३॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ महता लिंगरूपेण महता जंगमे न च॥ द्विविधेन समुद्भूतप्रसादाय नमोनमः ॥८४॥ वातुले ॥ नमः प्रसाद-लिंगाय ईशान्याकाशरूपिणे ॥ रक्षालिप्तप्रकाशाय यकारमनुमूर्त्तये ॥८५॥ स्कांदे ॥ प्रसादस्य च माहात्म्यं शिवस्य परमात्मनः ॥ अपि देवा न जानन्ति श्रुतयश्च न संशयः ॥८६॥ आदित्यपुराणे ॥ पूजका बहवः सन्ति भक्ताः शतसहस्रशः ॥ तत्र प्रसादिपात्रं तु द्वित्रा वा नैव पंच षः ॥८७॥ सूतसंहितायाम् ॥ सत्यं सत्यं पुनः सत्यमुत्क्षिप्य भुजमुच्य-ते ॥ प्रसादादेव सर्वेषां सर्वसिद्धिर्महेशितुः ॥८८॥ आदित्यपुराणे ॥ तिलषोडशभागं च तृणाग्राम्बुकणोपमम् ॥ पादोदकं प्रसादान्नं सेवया मोक्षमाप्नुयात् ॥८९॥

---

असें म्हणतात; आणि गुरुलिंगाच्या प्रसादास प्रसिद्धप्रसाद असें ह्मणतात. असे हे प्रसादाचे तीन भेद आहेत. (८४) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, लिंगस्वरूपही श्रेष्ठ आहे, आणि जंगमलिंगही श्रेष्ठच आहे. शिवलिंगापासून आणि जंगमलिंगापा-सून प्रसाद उत्पन्न होतो; त्या प्रसादास नमस्कार असो. (८५) वातुलागमांत ह्मटलें आहे कीं, त्या प्रसादलिंगास नमस्कार असो, तें प्रसादलिंग ईशान्यस्वरूप आणि आकाशस्वरूप आहे, रक्षा (भस्म) अंगास लाविल्यामुळें त्या प्रसादलिंगाचा प्रसाद झांकला गेला आहे, व तें प्रसादलिंग यकारमंत्रस्वरूप आहे. (८६) स्कंदपुराणांत म्ह-टलें आहे कीं, प्रसादाचें माहात्म्य आणि परमात्मा श्रीशंकराचें माहात्म्य देवांस समजत नाहीं, आणि वेदांसही समजत नाहीं; ह्यांत कांहीं संशय नाहीं. (८७) आ-दित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, पूजा करणारे पुष्कळ आहेत, भक्तलोक शेकडों हजार आहेत, परंतु त्यांत प्रसादाला पात्र असे तीन किंवा फार झाले तर पांच सहा अ-सतील. ह्यापेक्षां जास्त नाहींत. (८८) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, मी, खरें, अ-गदीं खरें, पुनः हात वर उचलून असें खरें सांगतों कीं, महेश्वराच्या प्रसादामुळेंच सर्व प्राणिमात्रांस सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात; एऱ्हवीं होत नाहींत. (८९) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, तिळाच्या सोळाव्या भागाइतकें जरी उच्छिष्ट अन्न (प्रसादान्न) भक्षण केलें, किंवा गवताच्या काडीच्या शेवटावरील थेंबाइतकें जरी पादोदक प्राशन केलें, तरी तेवढ्यानेंच मोक्षप्राप्ति होते.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण श्रीसिध्दवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे प्रसादमाहात्म्यस्थलं नाम सप्तदशप्रकरणं समाप्तम् ॥

---

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वरांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या, वीरशैवांच्या षट्स्थलमार्गांची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या, सिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील प्रसादमाहात्म्यस्थल नांवाचें सतरावें प्रकरण संपलें



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

## ॥ पादोदकमाहात्म्यस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ अष्टादशप्रकरणम् ॥

एवं प्रसादमाहात्म्यं एकीभूतभक्तस्य मलत्रयनिरहरणार्थं पादोदकस्वरूपप्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं पादोदकमाहात्म्यमित्युच्यते ॥ बौधायनशाखायाम् ॥ अथातो महादेवस्य पादोदकविधिं व्याख्यास्यामः ॥१॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ कुरुक्षेत्रे नैमिषे च यानि तीर्थानि भूतले ॥ शर्वतीर्थोदकस्यांग कलां नार्हन्ति षोडशीम् ॥२॥ वृत्तम् ॥ गंगापुष्करनर्मदा च यमुना गोदावरीगोमती गंगाद्वारगया प्रयागबदरी वाराणसी सैंधवी ॥ कन्यासेतुसरस्वतीप्रभृतयो ब्रह्माण्डमध्येऽखिले तीर्थस्नानसहस्रकोटिफलदं श्रीशंभुपादोदकम् ॥३॥ काशीकांडे॥ हिमोदकं महातीर्थं गंगा च यमुनानदी ॥ नर्मदाशरयूसुप्रा तथा गोदावरीनदी ॥ सदा सन्निहितास्त्वेताः शंभोः स्नानोदके मुने ॥४॥ ईश्वर उवाच ॥ पृथिव्यां यानि तीर्थानि या नद्यः पुण्यदाः शुभाः ॥

---

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. ह्याप्रमाणें प्रसादमाहात्म्याच्या ठिकाणीं एकपणा पावलेल्या भक्ताला आणवमल, मायामल आणि कार्मिकमल ह्यांचा नाश करण्यासाठीं पादोदकाचें स्वरूप कसें आहे, हें समजून घेण्याची बुद्धि झाल्यावर, पादोदकमाहात्म्य सांगतों. (१) बौधायनशाखेंत म्हटलें आहे कीं, आतां अगोदर महादेवाच्या पादोदकाच्या रीतीस स्पष्ट रीतीनें सांगूं. (२) ब्रह्माण्डपुराणांत म्हटलें आहे कीं, हे सज्जना कुरुक्षेत्र, नैमिषारण्य किंवा अशींच पृथ्वीवर जितकीं कांहीं प्रसिद्ध तीर्थें आहेत, तीं सर्व तीर्थें शिवतीर्थाच्या सोळाव्या हिश्याची देखील बरोबरी करूं शकत नाहींत. (३) गंगानदी, पुष्करतीर्थ, नर्मदा, यमुना, गोदावरी, गोमती, गंगाद्वार, गया, प्रयाग, बदरी, वाराणसी, सैंधवी, कन्याकुमारी, सेतुबंध, सरस्वती वगैरे सर्व त्रैलोक्यांत जितकीं कांहीं पवित्र तीर्थें मानलीं आहेत, त्या सर्व तीर्थांपेक्षां शिवपादोदक हजारकोटपटीनें जास्त श्रेयस्कर आहे. शिवपादोदकानेंच स्नान करावें. (४) काशीखण्डांत म्हटलें आहे कीं, मुनीश्वरा, हिमोदक नांवाचें प्रसिद्ध तीर्थ, गंगानदी, यमुनानदी, नर्मदानदी, शरयूनदी, सुप्रानदी, आणि तशीच गोदावरीनदी, ह्या सर्व नद्या शिवाभिषेकजलाच्या अगदीं जवळ राहतात. एका शिवाभिषेकजलानें स्नान केलें म्हणजे सर्व तीर्थें असणाऱ्या नद्यांत स्नान केल्यासारखें होतें. (५) शिव म्हणतात— पृथ्वीवर जितकीं कांहीं तीर्थें आहेत, पुण्यकारक आणि कल्याणकारक जितक्या कांहीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मत्पादस्थापिता नित्यं तस्माद्धार्यं पदोदकम् ॥५॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ सप्तसागरपर्यन्तं तीर्थस्नानफलं यदि ॥ गुरोरंघ्रिजले बिंदुसहस्रांशं न पूरयेत् ॥६॥ वृत्तम् ॥ गंगा कृष्णा प्रयागः सरयुकयमुने तुंगभद्रा च भद्रा कावेरी सिन्धुकन्या कमलभुववधूर्गौतमी चन्द्रभागा ॥ तासां तीर्थोदकानां वृजिनहरमिदं जंगमानां च पादप्रक्षालस्रस्ततोयं त्रिभुवनविजयप्रापकं भक्तिमुक्ती ॥७॥ गंगादिसर्वतीर्थानि मालिन्यं घ्नंति बाह्यकम् ॥ जंगमस्य पदांभोजसलिलं पापनाशनम् ॥८॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ अकालमृत्युमथनं सर्वव्याधिविनाशनम् ॥ सर्वपापोपशमनं शंभोः पादोदकं शुभम् ॥९॥ सर्वमंगलमांगल्यं सर्वपावनपावनम् । सर्वतीर्थफलं सद्यः प्राप्यते मूर्ध्नि धारणात् ॥१०॥ सर्वोत्पातप्रशमनं सर्वरोगप्रभेदनम् ॥ दुष्टग्रहोपशमनमिष्टसिद्धिप्रदायकम् ॥११॥ अग

---

नद्या आहेत; त्या सर्व माझ्या पायाजवळ ठेवल्यासारख्या आहेत. ह्यासाठीं पादोदक अवश्य ग्रहण करावें. (६) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, सात समुद्रांपर्यंत पृथ्वीवर जागोजाग जितकीं कांहीं तीर्थें असतील, आणि त्या सर्व तीर्थांत जाऊन स्नान केलें तर जें कांहीं पुण्य लागतें; तें पुण्य गुरूच्या पादोदकांत स्नान करण्याच्या पुण्याच्या हजाराव्या हिश्याइतकें देखील होत नाहीं. इतकी पादोदकाची योग्यता आहे. (७) गंगा, कृष्णा, प्रयाग, शरयू, यमुना, ती कल्याणकारक तुंगभद्रा, कावेरी सिंधुकन्या, सरस्वती, गौतमी, चंद्रभागा वगैरे ज्या ज्या मोठमोठ्या नद्या आहेत, त्या नद्यांत जीं जीं प्रसिद्ध तीर्थें आहेत; त्या तीर्थांपेक्षां जंगमाचें पाय धुतलेलें पाणी जास्त पवित्र असून पाप नाश करणारें आहे. तें त्रैलोक्यांत कीर्ति ( जय ) मिळवून देतें, व ऐश्वर्य आणि मोक्षसुख ह्यांचीही प्राप्ति करून देतें. (८) गंगानदी वगैरे पवित्र क्षेत्रें आहेत त्यांतील पाण्यांत स्नानें केलीं तर, अंगावरील मळ मात्र नाहींसा होऊन शरीर स्वच्छ होतें, परंतु जंगमाचें पादोदक मनांतील पातकांचा नाश करितें. (९) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, शंकराचें पादोदक कल्याणकारक आहे, तें भलत्याचवेळीं येणाऱ्या अपमृत्यूचें भय चुकवितें, सर्व प्रकारचे रोग नाहींसें करितें आणि सर्व प्रकारच्या पातकांचा नाश करितें. (१०) तें शिवपादोदक सर्व मंगलकारक वस्तूंतील मुख्य मंगलकारक वस्तु आहे; भूमीवर जितक्या पवित्र वस्तु आहेत त्या सर्वांपेक्षां जास्त पवित्र आहे; तें शिवपादोदक मस्तकावर घेतलें तर तत्काळ सर्व तीर्थांत स्नान केल्याचें श्रेय मिळतें. (११) शिवपादोदक सर्व प्रकारचीं संकटें दूर करितें, सर्व प्रकारचे रोग दूर करितें, दुष्टग्रहांची बाधा दूर करितें, व आपल्याला ज्या ज्या वस्तु प्रिय असतील त्यांची प्राप्ति करून देतें. (१२) शिवपादोदक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्यागमनं चैव पापाचाराश्च येऽशुभाः ॥ तेऽपि पूता भवंत्याशु सद्यः पादांबुधारणात् ॥१२॥ पादोदकं पुरभिदः पाशजालहरं परम् ॥ पाणिशुक्तिभिरादाय पपुः कामं गणेश्वराः ॥१३॥ आदित्यपुराणे ॥ पादौ प्रक्षाल्य देवस्य कराभ्यां कमलेक्षण ॥ अभ्युक्षेदात्मनो मूर्धन्यातिथेश्च गुरोस्तथा ॥१४॥ रामायणे ॥ प्रमथप्रवरैः पीतं सुरमुख्यैः शिरोधृतम्॥ शुद्धं तत्वतयाधिष्ठं वल्मीकप्रभवेन च ॥१५॥ तत्र देवर्षिगन्धर्वा वसुधातलवासिनः ॥ भवांगपतितं तोयं पवित्रमिति पस्पृशुः ॥१६॥ वैद्यशास्त्रे ॥ निर्माल्यसलिलं प्राश्य देवदेवस्य शूलिनः ॥ क्षयकुष्ठज्वरश्वासैर्मुच्यते किल्बिषैरपि ॥१७॥ अभिषिक्तजलं प्रातः पिबेन्नित्यं दिने दिने ॥ शूलकुष्ठाद्यपस्मारज्वराणां भेषजं प्रिये ॥१८॥ दासमार्गप्रपन्ना

---

मस्तकावर धारण केलें असतां, ज्या वायकोचा संग करूं नये ह्मणून शास्त्रांत निषेध केला आहे तिजशीं संग केल्यामुळें किंवा अशाच प्रकारचीं दुसरीं जीं जीं अघोर पातकें घडलीं असतील, तीं तीं सर्व नाहींशी होऊन ते पातकी लोक तत्काळ पवित्र होतात. (१३) शिवाचें पादोदक पाशाच्या जालांतून पशूची मुक्तता करितें, तें फार श्रेष्ठ आहे, प्रमथगण आपल्या हस्तरूपी शिंपांनीं तें शिवपादोदक मनास वाटेल तितकें पितात. (१४) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं. हे कमलनेत्रा, आपल्या दोन्ही हातांनीं देवाचे दोन्ही पाय धुवावे, अतिथीचे दोन्ही पाय धुवावे आणि गुरूचे दोन्ही पाय धुवावे, आणि तें पाय धुतलेलें पाणी आपले मस्तकावर शिंपडून घ्यावें. (१५) रामायणांत ह्मटलें आहे, शिवाचें पादोदक प्रमथगणांतील मुख्य मुख्य प्रमथांनीं प्राशन केलें, इंद्रादिक मुख्य मुख्य देवांनीं मस्तकावर शिंपडून घेतलें, आणि वारुळापासून जन्मलेल्या वाल्मीकानें तें शिवपादोदक निष्पाप असल्यामुळें यथार्थरीतीनें ग्रहण केलें. (१६) तेथें पृथ्वीच्या पृष्ठभागावर राहणारे जितके देव, मुनीश्वर आणि गंधर्व होते, त्या सर्वांनीं शिवाच्या अंगावरून पडणारें गंगेचें पाणी फारच पवित्र आहे असें ह्मणून त्यास स्पर्श केला. (१७) वैद्यशास्त्रांत सांगितलें आहे कीं, शूल हातांत धारण करणाऱ्या देवाधिदेवाचें (शिवाचें) निर्माल्य सलिल (पादोदक) प्राशन केलें, तर तें प्राशन करणारे प्राणी क्षयरोग, कुष्टरोग (कोड), ताप, श्वास, वगैरे रोगांपासून मुक्त होतात; आणि त्यांचीं इतर पातकेंही नाश पावतात. (१८) शिव ह्मणतात पार्वती, जो कोणी मनुष्य शिवाभिषेकाचें तीर्थ दररोज सकाळच्या प्रहरीं पीत जाईल तो पोटशूल, मस्तकशूल, कोड, अपस्मार, ताप वगैरे रोगांवर रामबाण औषध मिळाल्यासारखें होऊन, लागलाच बरा होईल. (१९) जे कोणी लोक दासपणा (शिवभक्ति)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ये श्रौते पाशुपते स्थिताः ॥ तैरेव पेयं धार्यं च घ्रातव्यं च मुमुक्षुभि ॥१९॥ आदित्यपुराणे ॥ पादोदकं धरेद्यस्तु लिंगमूर्तेः शिवस्य तु प्रक्षालयति तत्तोयं ब्रह्महत्यादिपातकम् ॥२०॥ वीरतंत्रे ॥ लिंगोदकं पादांबु प्रसादांब्विति तत्त्रिधा ॥ नमः कार्यं हि शिरसा धार्यं पे शिवार्थिभिः ॥२१॥ वैद्यशास्त्रे ॥ लिंगाभिषेकं कुर्वीत तल्लिंगोदकमु च्यते ॥ तच्च स्नात्वा च पीत्वा च नाशयत्यखिलामयम् ॥२२॥ वीरतंत्रे सर्वव्याधिहरं पुण्यं शंभोर्वक्त्राद्विनिर्गतम् ॥ तत्प्रसादोदकं विद्या त्स्कंदाद्यैरपि सेवितम् ॥२३॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ शंभोः पादोदकं पीत्व पश्चादशुचिशंकया ॥ यस्त्वाचमति मोहेन तं विद्याद्ब्रह्मघातकम् ॥२४ पादोदकं परं ब्रह्म पवित्रमघनाशनम् ॥ अजडं जडमिश्रं तु स पापं ब्रह्मघातकः ॥२५॥ वीरागमे ॥ गुरुपादोदकं गंगा नात्र कार्या विचा

---

करूं लागले, जे कोणी वेदास मान्य असणाऱ्या पाशुपतव्रताचा स्वीकार करून त्य प्रमाणें आचार करूं लागले, त्याच मोक्षेच्छुलोकांनीं शिवपादोदक प्यावें, मस्तकाव घ्यावें आणि हुंगावें. (२०) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य लिं गस्वरूपी शंकराचें पादोदक मस्तकावर घेईल, त्या मनुष्याचीं ब्रह्महत्या वगैरे पा तें पादोदक नाश करून टाकील. (२१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, लिंगोदक पादोदक, आणि प्रसादोदक असें तीन भेद आहेत, ज्याला आपलें स्वतःचें कल्याण व्हावें असें वाटत असेल त्यानें त्या पादोदकास नमस्कार करावा, तें पादोदक मस्त कावर घ्यावें, आणि तें प्राशनही करावें. (२२) वैद्यशास्त्रांत ह्मटलें आहे कीं, शिव लिंगाला जलानें अभिषेक करितात, त्या अभिषेकाच्या पाण्याला लिंगोदक असें ह्मण तात; त्या पाण्यानें स्नान करावें, तें पाणी प्यावें, म्हणजे त्यामुळें सर्व रोगांचा नाश होतो. (२३) वीरतंत्रांत ह्मटलें आहे, शंकराच्या मुखापासून निघालेल्या ( शिवांनीं किंवा जंगमांनीं पिऊन उरलेल्या ) पाण्यास प्रसादोदक असें ह्मणावें; तें सर्व प्रकारच्या रोगांचा नाश करितें; तें फार पवित्र आहे असें समजावें; कार्तिकस्वामी वगैरे मुख्य मुख्य देव देखील तें प्रसादोदक घेतात. (२४) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य शंकराचें पादोदक प्राशन करून, मागाहून मी अपवित्र पाणी प्यालों असा मनांत संशय येऊन, पुन्हा अज्ञानपणानें दुसऱ्या शुद्ध पाण्यानें आचमन क रितो; तो ब्रह्मघातकी समजावा. (२५) पादोदक हें परब्रह्मस्वरूप आहे, तें अतिशय पवित्र असून पापनाशक आहे तें पादोदक वस्तुतः जड नसून त्याला जड असें जो समजतो तो ब्रह्मघातकी समजावा, व महापापी समजावा. (२६) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, गुरुपादोदक ही प्रत्यक्ष गंगानदी आहे, ह्यांत संशय घेण्याचें कारण नाहीं.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रणा ॥ अहमन्यद्रहस्यं ते कथयामि शृणुष्व तत् ॥२६॥ तत्प्रसादोदकस्पर्शात्पुण्यमन्यन्न विद्यते ॥ तत्प्रसादोदकं पीत्वा शुद्धिमाप्नोति तत्क्षणात् ॥२७॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ गृहे यस्मिन् प्रसूता स्त्री सूतकं नात्र विद्यते ॥ शिवपादांबुसंस्पर्शात्सर्वपापं प्रणश्यति ॥ दूषितश्चापि पादांबु बिभ्राणः शुद्धिमाप्नुयात् ॥२८॥ प्रायश्चित्तं यदि प्राप्तं कृच्छ्रं वाप्यघमर्षणम् ॥ स प्रसादोदकं पीत्वा शुद्धिमाप्नोति तत्क्षणात् ॥२९॥ स्कन्दपुराणे ॥ सर्वतीर्थाभिषेकाद्यच्छुद्धिर्मनसि जायते ॥ गुरोरंघ्रिस्पर्शजलात्तस्माच्छिरसि धारयेत् ॥३०॥ शिवरहस्ये परमेश्वर उवाच ॥ मत्प्रसादोदकं पुष्पं सदा धार्यं मदाश्रितैः ॥ त्र्यक्षा दशभुजास्सर्वे ममतुल्यपराक्रमाः ॥३१॥ स्कान्दे ॥ धृतलिंगस्य मर्त्यस्य पादप्रक्षालितं जलम् ॥ पापशुद्ध्यर्थमज्ञानां तत्तीर्थं शिखिवाहन ॥३२॥ प्राणलिंगांग-

---

मी आणखी एक महत्वाची गोष्ट तुला सांगतों लक्ष्य देऊन ऐक. (२७) त्या गुरूचा प्रसाद स्वीकार करणें त्या गुरूचें पादोदक आपले अंगावर शिंपडून घेणें ह्यासारखी पवित्र वस्तु दुसरी कोणतीही नाहीं; गुरूच्या प्रसादान्नाचें भक्षण केलें आणि गुरूच्या पादोदकाचें प्राशन केलें ह्मणजे मनुष्य तत्काळ शुद्ध होतो. (२८) ब्रम्हाण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, ज्या घरीं एखादी बाई बाळंत झालेली आहे, त्या घरीं सोयर (वृद्धि) देखील धरावयाचें कारण राहत नाहीं. कां तर शिवपादोदकाच्या स्पर्शामुळें सर्व पाप नाहींसें होतें. एखादा मनुष्य अतिशय दोषी असला तरी तो शिवपादोदक जर धारण करील तर निष्पाप होईल. (२९) कोणाच्या हातून एखादा असा महादोष घडलेला असला कीं प्रायश्चित्त घेतल्यावांचून, कृच्छ्रचांद्रायणव्रत केल्यावांचून किंवा अघमर्षण केल्यावांचून तो दोष दूर होण्यासारखा नसला, तरी, असा महादोष घडलेला महापातकी मनुष्य प्रसादोदक प्राशन करील तर तत्काळ शुद्ध होईल (३०) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, सर्व पृथ्वीवरील तीर्थोदकांत स्नान केलें असतां मनाला जी काय शुद्धता येते, तीच शुद्धता गुरूच्या पादोदकानें स्नान केलें असतां येते ह्यासाठीं तें गुरुपादोदक आपल्या मस्तकावर घ्यावें. (३१) शिवरहस्यांत शिवांनीं ह्मटलें आहे कीं, माझें प्रसादोदक आणि निर्माल्यपुष्प माझ्या भक्तांनीं नेहमीं धारण करावें, तें प्रसादोदक ग्रहण करणारे माझे सर्व भक्त तीन डोळे असणारे दहा हात असणारे आणि माझ्यासारखेच पराक्रमी असे होतील. (३२) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात हे षडानना, शिव (इष्ट) लिंग धारण करणाऱ्या मनुष्याचें पादोदक (पाय धुतलेलें पाणी) अज्ञान मनुष्याचें पातक नाश करण्यास कारण आहे. तें तीर्थोदकच आहे. (३३) प्राणलिंगाचा अंगाशीं संबंध झालेल्या मनुष्याचें पाय धु-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

संबंधिपादप्रक्षालितं जलम् ॥ लिंगांगसंगरहितः पिबेत्तत्तस्य पुण्य
दम् ॥३३॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ शिवात्मकपदद्वंद्वप्रक्षालनजलं नराः
ये पिबन्ति पुनः स्तन्यं न पिबन्ति कदाचन ॥३४॥ आदिजंगमपादा
ब्जक्षालितांबुकणास्तथा ॥ जनयन्ति सदा देवि ब्रह्मविष्णुसुरादिकाः
॥३५॥ स्कन्दपुराणे ॥ ज्ञानयोगधराणां तु पादप्रक्षालितं जलम् ।
प्राश्यं शुद्ध्यर्थमज्ञानात्तारकं मुनिपुंगवाः ॥३६॥ अथर्वणब्राह्मणे ॥
विश्वेदेवा अतिथिपादपाद्यायातं विश्वेदेवा आरममन्ते शृणुता महि
मा ब्रह्माद्वयमेवेदं ऋषि अतिथि चरन्तो आवर्तते भुवने स्वयमव्यः
प्रथमं बभूव अतिथिदेवपदमजायत प्रथमं पुरुषाकृतिः सा प्रकृतिर्भ
वति प्रकृतिरापो भवंति आपश्चातिथिपदे पाद्यरूपा भवंति पाद्यं दि
व्यामृतं तीर्थं भवति एतद्विश्वेदेवा अतिथेर्जाताम्भसामृतं प्राश
भवति अमृतं प्राश्नंति यद्विश्वेदेवा तदमृतं चरयोगीयं परात्परं प

तलेलें पाणी (पादोदक) इष्टलिंग अंगावर धारण न करणाऱ्या मनुष्यानें प्राशन के
तर त्यालाही पुण्य लागेल. (३४) ब्रह्मण्डपुराणांत झटलें आहे कीं, शिवस्वरूप म
ष्याचे (जंगमाचे) दोन्ही पाय धुतलेलें पाणी जे लोक भक्तीनें पितात; ते पुन्हा क
ही जन्मास येऊन आईचें दूध पीत नाहींत. (तें तत्काळ मुक्त होतात). (३५) हे पार्वत
आदिजंगमाचें चरणकमल धुतलेल्या पाण्याचे थेंब नेहमीं ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगै
उत्पन्न करितात. (३६) स्कंदपुराणांत झटलें आहे कीं, हे मुनीश्वरहो, जे ज्ञानयो
(विरक्त) आहेत त्यांचे पाय धुतलेलें पाणी (पादोदक) नेहमीं प्यावें. त्यामुळें म
नुष्य निष्पाप होतो; तें पादोदक अज्ञानापासून आपणास तारतें (रक्षण करितें.
(३७) अथर्वणवेदांत झटलें आहे कीं, विश्वेदेव नांवाचे देव, अतिथि स्वरूप च
मूर्तींच्या चरणाचें चरणतीर्थ (पादोदक) हें परब्रह्मस्वरूप आहे, असें मानतात. त
चरणतीर्थाचें माहात्म्य ऐका. अव्यक्तस्वरूप असें जें परब्रह्म आहे, आणि जें भे
शून्य परब्रह्म आहे, तें परब्रह्म अतिथि अशा चरमूर्तींच्या रूपानें जगांत चोहोंक
स्वतः फिरत आहे. जी परब्रह्म वस्तु आहे, ती प्रथम जंगम देवाच्या चरणाच्
रूपानें जगांत अस्तित्वांत आली, सृष्टीच्या पूर्वीं ती प्रसिद्ध माया आपल्या ठिका
प्रतिबिंबित झालेल्या ब्रह्मस्वरूपानें परमेश्वराच्या आकृतीप्रमाणें आकृतीची झाल
त्याच प्रकृतीपासून पुढें पाणी उत्पन्न झालें. तें पाणी चरमूर्तींच्या चरणकमला
पाद्याच्या रूपानें राहिलें. तें पादोदक दिव्यअमृतस्वरूप तीर्थ होऊन राहिलें, तें ती
विश्वेदेवांना अमृताप्रमाणें झालें. अर्थात तें अमृतच विश्वेदेव पान करतात. तें अमृत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मेवार्पितं भवति यदमृतमेवेदं ब्रह्मोत्थं सर्वमेतद्विभक्तं वदामि ॥३७॥ वैद्यशास्त्रे ॥ इतिहासपुराणेषु शिवस्याप्यतिथेर्गुरोः ॥ अतिथेः पादसलिलमहिमैव निरंतरम् ॥३८॥ स्कन्दपुराणे ॥ मार्गादित्रिकशैवानां तीर्थं च दर्शितं मया ॥ द्विभेदवीरशैवानामुत्तमं चरतीर्थकम् ॥३९॥ कामिकागमे ॥ स्वर्णोदकसहस्राणि रत्नोदकशतानि च ॥ चरलिंगस्य पादांबुकलां नार्हन्ति षोडशीम् ॥४०॥ स्कान्दे ॥ गुरोरंघ्रिस्पृशत्तोयं शिरसा धारयेत्सकृत् ॥ सर्वतीर्थाभिषेकस्य फलं प्राप्नोति मानवः ॥४१॥ शिवरहस्ये ॥ शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः ॥ गुरुपादोदकं चित्रं संसारद्रुमनाशनम् ॥४२॥ शिद्धान्तशेखरे ॥ अविद्यामूलनाशाय जन्मकर्मनिवृत्तये ॥ ज्ञानवैराग्यसिद्ध्यर्थं गुरुपादोदकं पिबेत् ॥४३॥ शिवरहस्ये ॥ पाकारः परमं ज्ञानं दोकारो दोषनाशनः ॥ दकारो द-

---

स्वरूप होऊन राहिलें. हें सर्व विशेषेंकरून शिवभक्तांनाच सांगतों, असें अथर्वण वेदाचें ह्मणणें आहे. (३८) वैद्यशास्त्रांत ह्मटलें आहे कीं, इतिहास, पुराण वगैरे ग्रंथांत शिवाच्या पादोदकाचा, अतिथीच्या पादोदकाचा आणि गुरूच्या पादोदकाचा महिमा फारच सांगितला आहे. तरी त्यांतलें त्यांत अतिथींच्या पादोदकाचा महिमा फार आहे. (३९) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, मार्गशैव मिश्रशैव वगैरे जे शैवांचे तीन भेद आहेत त्यांचें तीर्थ मीं दाखविलें. दोन प्रकार वीरशैवांत आहेत, त्यांत जंगमतीर्थ हें फार चांगलें आहे. (४०) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं, शुद्धसोन्याच्या हजार पात्रांत भरलेलें. शुद्ध पाणी, किंवा शंभर रत्नांच्या भांड्यांत भरलेलें शुद्धपाणी, ह्यापेक्षां जंगमाच्या पादोदकाची योग्यता फारच मोठी आहे. सोन्याच्या व रत्नांच्या भांड्यांतलें पाणी जंगमपादोदकाच्या सोळाव्या हिश्याची देखील बरोबरी करूं शकत नाहीं. (४१) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें एकवेळ जरी गुरुपादोदक आपल्या मस्तकावर घेतलें, तरी त्यास सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लागतें. (४२) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, गुरुपादोदक हें फार विचित्र प्रकारचें आहे, इतर पाण्या सारखें नव्हें. साधारण पाणी चिखल वाढवितें आणि वित्तव विझवितें परंतु गुरुपादोदक पातकरूपी चिखल वाळवून टाकितें आणि ज्ञानरूपी प्रदीपाचें तेज जास्त करितें आणि संसाररूपवृक्षाचाही नाश करितें. असा विचित्रधर्म गुरुपादोदकाच्या अंगीं आहे. (४३) शिद्धांतशेखरांत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें अविद्येचा समूल नाश व्हावयासाठीं जन्म आणि कर्म ह्यांची निवृत्ति व्हावयासाठीं, व ज्ञानाची व वैराग्याची प्राप्ति व्हावयासाठीं, गुरुपादोदक प्राशन करावें. (४४) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, पादोदक ह्या चार अक्षरांची योग्यता फार मोठी आहे,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्यते जन्म ककारः कर्मछेदनः ॥४४॥ पादोदकं च त्रिविधमारोग्यं च वधारितम् ॥ लिंगार्पितं प्रसादं च तथा लिंगोदकं भवेत् ॥४५॥ लिं स्य पुरतो ग्राह्यं लिंगमासिच्यतीर्थकम् ॥ लिंगोदकमिति प्रोक्तं तत्त यमवधारितम् ॥४६॥ लिंगार्पितप्रसादं च तदर्थे परिकल्प्यते ॥ लिं गोदकमिति प्रोक्तमुपभुक्तं तथोदकम् ॥४७॥ जंगमांघ्रिस्थतोयानां बि दुसंयुतमारुतम् ॥ बुभुजे भुजगस्तेन दष्टश्चोरो विमुक्तवान् ॥४८॥ शि वरहस्ये ॥ पादोदकादिमाहात्म्यं सततं यः पठेन्नरः ॥ कीर्तयेच्छ्राव येद्यस्तु मुच्यते सर्वकिल्बिषैः ॥ श्रुत्वा पापानि संत्यज्य प्राप्नुयाच्च म हत्फलम् ॥४९॥

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्र ण्यश्रीसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे पा दोदकमाहात्म्यस्थलं नामाष्टादशप्रकरणं समाप्तम् ॥

---

" पा " हें अक्षर परमज्ञान आहे, " दो " हें अक्षर दोषांचा नाश करितें, " द " अक्षर जन्ममरणास जाळून टाकितें, आणि " क " हें अक्षर कर्मांचा नाश क (४५) आरोग्य, अवधारित, लिंगार्पितप्रसाद याप्रमाणें पादोदकामध्यें तीन भेद हेत. त्यांत इष्टलिंगाला दाखवून जें पाणी मुखप्रक्षालनाच्या स्नानाच्या उपयो आणिलें जातें, त्याला लिंगोदक ह्मणावें. तसेंच त्याला आरोग्य असेंही ह्मणत (४६) इष्टलिंगाची पूजा करून इष्टलिंगाला अभिषेक घालून तें तीर्थ ध्यावें. त्या र्थालाच लिंगोदक आणि अवधारित असें म्हणतात. (४७) लिंगाला समर्पण क उरलेल्या ज्या शेषाचा उपयोग करितात. प्रसादाचा उपभोग करतात त्याला लिं गार्पित प्रसाद असें ह्मणतात; आणि लिंगास समर्पण केलेल्या जलाला लिंगोदक सेंच ह्मणतात. (४८) जंगमाच्या पादोदकाचे शिंतोडे ज्यांत आहेत असा वारा पानें प्राशन केला ( साप वारा पिऊन राहतात ); पुढें तो साप एका चोराला वला त्यामुळें तो साप मुक्त झाला, आणि तो चोरही मुक्त झाला (४९) शि रहस्यांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य पादोदकाचें माहात्म्य नेहमीं पठण करी कीर्तन करील, किंवा दुसऱ्यांस सांगेल, तो सर्व पापापासून मुक्त होईल. हें पादो माहात्म्य जो कोणी ऐकेल, त्याचीं सर्व पातकें नाश होऊन त्यास मोठें पुण्य लाभे

ह्या प्रमाणें वीरमाहेश्वराचार्यांत प्रमुख ह्मणविणाऱ्या, वीरशैवांच्या षट्स्थलमार्ग स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या, सिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केले अनादिवीरशैवसारसंग्रहांतील पादोदकमाहात्म्यस्थल नांवाचें अठरावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

## ॥ विभूतिमाहात्म्यस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ एकोनविंशतिप्रकरणम् ॥

एवं पादोदकमाहात्म्यदृढीकृतचित्तभक्तस्य परब्रह्माविनाभूतचित्प्रकाशस्वरूपभस्मधारणं कर्तव्यमिति नियम एव विभूतिमाहात्म्यस्थलमित्यग्रे कथ्यते ॥ स्कन्दपुराणे ॥ अनादिशाश्वतं नित्यं चैतन्यं चित्स्वरूपकम् ॥ चिदंगं वृषभाकारं चिद्भस्म लिंगधारणात् ॥१॥ प्रथमं गूढनिर्नाम द्वितीयं चित्स्वरूपकम् ॥ तृतीयं चिद्विलासं च चतुर्थं भस्मधारणम् ॥२॥ जाबालोपनिषदि ॥ सद्योजातात्पृथिवी तस्या निवृत्तिस्तस्याः कपिलवर्णा नंदा तस्याः गोमयेन विभूतिर्जाता ॥३॥ वामदेवादुदकं तस्मात्प्रतिष्ठा तस्याः कृष्णवर्णा भद्रा तस्याः गोमयेन भसितम् ॥४॥ अघोराद्वन्हिस्तस्माद्विद्या तस्या रक्तवर्णा सुरभिस्तस्याः गोमयेन भस्मजातम् ॥५॥ तत्पुरुषाद्वायुस्तस्माच्छांतिस्तस्याः श्वेतव-

---

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. ह्याप्रमाणें पादोदक माहात्म्यानें दृढान्तःकरण झालेल्या भक्तानें परब्रह्मस्वरूप आणि प्रत्यक्ष चित्प्रकाशस्वरूप असें भस्म धारण करावें ह्मणून नियमच आहे ह्यासाठीं विभूतिमाहात्म्यस्थल ह्यापुढें सांगतात. (१) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, चितेचें भस्म ( चिद्भस्म ) हें अनादि असून निरंतर राहणारें आहे, तें नित्य असून चैतन्य स्वरूप आहे, चित्स्वरूप आहे, तें चिदंग असून वृषभाच्या आकाराचें आहे, फार तर काय? परंतु हें भस्म परमेश्वरानें धारण केल्यामुळें श्रेष्ठ असें मानलें आहे. ( सर्वांनीं धारण करावें असें तात्पर्य आहे. ) (२) भस्माचीं चार नांवें आहेत तीं अशीं– १ गूढ ( निर्नाम ) २ चित्स्वरूपक ३ चिद्विलास ४ भस्मधारण हीं होत. (३) जाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, सद्योजातापासून पृथ्वी झाली, तिच्यापासून निवृत्ति झाली, तिच्यापासून काळ्या रंगाची नंदा नांवाची गाय झाली, तिच्या शेणापासून विभूति झाली. (४) वामदेवमुखापासून उदक झालें, उदकापासून प्रतिष्ठा झाली, त्या प्रतिष्ठेपासून काळ्या रंगाची भद्रा झाली. तिच्या शेणापासून भसित झालें. (५) अघोरमुखापासून अग्नि झाला, त्याच्यापासून विद्या झाली, आणि तिच्यापासून लाल रंगाची सुरभि झाली, तिच्या शेणापासून भस्म झालें. (६) तत्पुरुषमुखापासून वायु झाला, त्यापासून शांति झाली, त्या शांतीपासून पांढऱ्या रंगाची सुशीला नांवाची गाय झाली, तिच्या गोमयापासून क्षार

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

र्णा सुशीला तस्या गोमयेन क्षारं जातम् ॥६॥ ईशानादाकाशस्तस्मा-
च्छांत्यतीता तस्याश्चित्रवर्णा सुमनास्तस्याः गोमयेन रक्षा जाता ॥७॥
ऐश्वर्यकारणाद्भूतिर्भासनाद्भसितं सर्वाघभक्षणाद्भस्म आपदां क्षरणा-
त्क्षारं भूतप्रेतपिशाचब्रह्मराक्षसापस्मारभवभीतिभ्योऽभिरक्षणाद्रक्षेति
॥८॥ स्कन्दपुराणे ॥ भयेभ्यो रक्षणाद्रक्षा रोगेभ्यश्चापि रक्षणात् ॥ पा-
पानां भर्त्सनाद्भस्म भासनाद्भसितं मतम् ॥९॥ क्षारयत्यखिलान् दो-
षान् ततः क्षारमुदाहृतम् ॥ तस्माद्भस्मसमं श्रेयो न भूतं न भविष्यति
॥१०॥ गारुडपुराणे ॥ वृत्तम् ॥ भूतिर्भूतिकरी पवित्रजननी पापौघवि-
ध्वंसिनी सर्वोपद्रवनाशिनी शुभकरी शोकस्य विच्छेदिनी ॥ भूतप्रे-
तपिशाचराक्षसहरी चेष्टार्थसंपत्करी तेजोराज्यविशेषमोक्षकरिणी भू-
तिः सदा धार्यताम् ॥११॥ भस्मना दिग्धसर्वांगो भस्मदीप्तत्रिपुंड्रकः।

झालें. (७) ईशानमुखापासून आकाश झालें, त्यापासून शांत्यतीता झाली, तिच्या पासून चित्रविचित्र रंगाची सुमना नांवाची गाय झाली, तिच्या शेणापासून रक्षा झाली. (८) ऐश्वर्याची वृद्धि करितें ह्मणून त्या भस्मास भूति असें नांव पडलें, तें भस्म सुशोभित दिसतें म्हणून त्यास (भस्मास) भसित असें नांव पडलें. भस्म हें सर्व पातकांचा समूळ नाश करितें ह्मणून त्यास भस्म असें नांव पडलें. भस्म हें विपत्तींचा नाश करितें ह्मणून त्यास क्षार असें नांव पडलें. भूत, प्रेत, पिशाच, ब्रह्मराक्षस, अपस्मार आणि संसारभय ह्यांपासून भस्म रक्षण करितें ह्मणून भस्मास रक्षा असें नांव पडलें. (९) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, भस्म हें भयांपासून आणि रोगांपासून प्राणिमात्रांचें रक्षण करितें ह्मणून त्यास रक्षा असें नांव पडलें. भस्म हें पापांची विटंबना (निर्भत्सना) करितें ह्मणून त्यास भस्म असें नांव पडलें. भस्म हें फार सुशोभित आहे ह्मणून त्यास भसित असें नांव पडलें. (१०) भस्म हें सर्व दोषांचा नाश करितें ह्मणून त्यास क्षार असें ह्मणतात. ह्यामुळें भस्मासारखी दुसरी कल्याणकारक वस्तु ह्या जगांत मुळींच नाहीं, मागें नव्हती; आणि पुढेंही होणार नाहीं. (११) गारुडपुराणांत ह्मटलें आहे कीं, भूति (भस्म) ही कल्याण करणारी आहे, शुद्धतेची तर प्रत्यक्ष माताच आहे, ती पापसमुद्रांचा नाश करिते, सर्व प्रकारच्या पीडा दूर करिते, ती प्राणिमात्रांचें कल्याण करिते, आणि शोक दूर करिते. भूत, प्रेत, पिशाच आणि राक्षस ह्यांच्यापासून त्रास होऊं देत नाहीं, आपले इच्छिलेले मनोरथ परिपूर्ण करिते, पराक्रम, राज्य, लौकिक, आणि मोक्ष हीं मिळवून देते. ह्यासाठीं ही विभूति मनुष्यांनीं नेहमीं धारण करावी. (१२) ज्या मनुष्यानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भस्मशायी च पुरुषो भस्मनिष्ठ इति स्मृतः ॥१२॥ कूर्मपुराणे ॥ वृत्तम् ॥ एतानि तानि शिवमंत्रपवित्रितानि भस्मानि कामदहनांगविभूषितानि ॥ त्रैपुंड्रकानि रचितानि ललाटपट्टे लुंपंति दैवलिखितानि दुरक्षराणि ॥१३॥ श्रुतिः ॥ आललाटादाचक्षुषो भ्रूमध्यतो या चास्य प्रथमरेखा साऽहवनीया अकारो रजो भूर्लोकश्चात्मा क्रियाशक्तिः ऋग्वेदः प्रातःसवनं रुद्रो देवता ॥१४॥ या चास्य द्वितीया रेखा सा गार्हपत्या उकारस्सत्वमंतरिक्षमंतरात्मेच्छाशक्तिः यजुर्वेदो माध्यंदिनसवनं महेश्वरो देवता ॥१५॥ या चास्यास्तृतीयारेखा सा दक्षिणाग्निर्मकारस्तमो द्यौः परमात्मा ज्ञानशक्तिः सामवेदः सायं सवनं सदाशिवो देवतेति ॥१६॥ स्कान्दे ॥ त्रिपुण्ड्रस्त्रिगुणस्त्र्यात्मा त्रितत्वस्त्रितनुस्त्रिदृक् ॥ त्रिकालश्च त्रिमूर्तिश्च त्रिमात्रा च त्रिधा त्रिधा ॥१७॥

---

आपल्या सर्व अंगास भस्म सारविलें आहे, ज्यानें आपल्या कपाळावर शानदार भस्माचें त्रिपुण्ड्र केलें आहे, जो भस्मांत निजतो त्यालाच भस्मनिष्ठ पुरुष असें ह्मणतात. (१३) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, भस्में हीं शिवपंचाक्षरीमंत्रांमुळें अतिशय पवित्र झालेलीं आहेत. हीं भस्में मदनास जाळून टाकणाऱ्या महादेवाचे अलंकारच आहेत. या भस्माचीं तीन बोटें कपाळावर ओढलीं ह्मणजे प्राणिमात्रांच्या दैवांत जीं कांहीं अशुभ अक्षरें लिहिलेलीं असतील तीं पुसून टाकितात. (१४) भ्रुकुटीवरून कपाळापर्यंत आणि डोळ्यापर्यंत जी भस्मत्रिपुंड्राची पहिली रेषा असते तिला आहवनीय असें ह्मणतात. तिला अकार ह्मणतात, तिचा रजोगुण असतो, तिचा भूर्लोक आहे, आत्मा, क्रिया, शक्ति, ऋग्वेद, आणि प्रातःसवनही असून त्या रेषेची रुद्र ही देवता आहे. (१५) त्या त्रिपुंड्राची दुसरी जी रेघ आहे, तिला गार्हपत्या असें ह्मणतात, तिला उकार ह्मणतात, तिचा सत्वगुण आहे, अंतरिक्ष, अंतरात्मा, इच्छाशक्ति, यजुर्वेद, माध्यंदिन सवन आणि महेश्वर ही त्या रेषेची देवता आहे. (१६) त्या भस्मत्रिपुंड्राची जी तिसरी रेघ ती दक्षिणाग्नीची आहे. तिचा मकार वर्ण आहे, तिचा तमोगुण आहे, आकाश, परमात्मा, ज्ञानशक्ति, सामवेद सायंसवन, आणि सदाशिव हा तिचा देव आहे. (१७) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, भस्माचें त्रिपुंड्र हें सत्वरजस्तमोगुणात्मक आहे, तें ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर ह्या तीन मूर्तीचें स्वरूप आहे, तीन तत्वें मिळून त्रिपुंड्र होतें त्रिपुंड्र हें तीन शरीरें मिळून झालेलें आहे. त्रिपुंड्र हें तीन नेत्र असणारा प्रत्यक्ष शंकर आहे. त्रिपुंड्र हें भूत भविष्य आणि वर्तमान हें तीन काळ आहे, त्रिपुंड्र हें त्रिमूर्ति असून तीन मात्रास्वरूप आहे. सारांश त्रिपुंड्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ऊर्ध्वपुंड्रं भवेत्साम मध्यपुंड्रं यजूंषि च ॥ अधःपुण्ड्रमृचःसाक्षात्
स्मात्पुण्ड्रं त्रियायुषम् ॥१८॥ त्रियायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्रियायु
अगस्त्यस्य त्रियायुषं यद्देवानां त्रियायुषं तन्मे अस्तु त्रियायुषम् ॥१९
भूतिः पराऽनुभूतिर्हि स्नानं तत्रावगाहनम् ॥ त्रिपुंड्रं त्रिगुणाभावो
लिंगं लिंगमेव तत् ॥२०॥ स्कान्दे ॥ पुनाति यज्जगत्सर्वं त्रिपुण्ड्रात्म
सदाशिवः ॥ ऐश्वर्यप्राप्तिबीजाय तस्मै श्रीभस्मने नमः ॥२१॥ अथर्व
शिरसि ॥ अग्निरिति भस्म वायुरिति भस्म जलमिति भस्म स्थलमि
भस्म व्योमेति भस्म आत्मेति भस्म सर्वं ह्यवा इदं भस्म मन एतानि
चक्षूंषि भस्मानि ॥२२॥ मानवपुराणे ॥ भस्मज्योतिर्भवत्येव शिवाख्
न हि संशयः ॥ जाबालोपनिषत्सर्वं प्राहेदं परया मुदा ॥२३॥ कृत्वे
जलमिश्रं तु समुध्दृत्य षडक्षरीम् ॥ धारयेत्तत्त्रिपुण्ड्रं तु मंत्रेणाने
मंत्रितम् ॥२४॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ मानस्तोकेति मंत्रेण मंत्रितं भस

---

हें तीन तीन प्रकारचें आहे. (१८) भस्मत्रिपुंड्रांतील वरची रेषा ही सामवेदस्वरू
आहे, मधली रेषा ही यजुर्वेदस्वरूप आहे आणि खालची रेषा (रेघ) ही ऋग्वे
स्वरूप आहे सारांश, भस्मत्रिपुंड्र हें तीन वेदांचें मूर्तिमन्त स्वरूप आहे. (१९)
मदग्नीचें जें त्रियायुष (तीनवेळ आयुष्य देणारें) आहे, अगस्त्याचें जें त्रियायु
आहे, आणि देवांचें जें त्रियायुष आहे तें त्रियायुष मला असो. (२०) भूति
एक फारच मोठें ऐश्वर्य आहे. त्या भस्मांत अवगाहन करणें हें भस्मस्नान आ
त्रिपुंड्र ह्मणजे सत्व, रजस्तमोगुणांचा अभाव करणें आहे. अलिंग हें लिंग आ
(२१) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जें भस्म त्रिपुण्ड्रात्मक सदाशिव रूप होऊन
जगाला पवित्र करितें, तें भस्म ऐश्वर्यप्राप्तीचें मूलबीज आहे त्या श्रीभस्माला नमस्का
असो. (२२) अथर्वणवेदांत ह्मटलें आहे कीं, अग्नि हें भस्म आहे, वायु हें भस
आहे, जल हें भस्म आहे, स्थल हें भस्म आहे, व्योम (आकाश) हें भस्म आहे
आत्मा हें भस्म आहे, सर्व जें हें कांहीं दिसत आहे तें भस्मच आहे, मन, नेत्र व
इंद्रियें हीं भस्मच आहेत. (२३) मानवपुराणांत ह्मटलें आहे कीं, जाबालोपनिषत
मोठ्या आनंदानें सर्वांस असें सांगतें कीं, भस्म हें शिव नांवाचें प्रत्यक्ष तेज आ
ह्यांत संशय नाहीं. (२४) तें भस्म पाण्यांत कालवून षडक्षरीमंत्राचा जप क
मंत्रानें पवित्र झालेलें भस्म कपाळास तीन बोटांनीं आडवें लावावें त्यास त्रिपु
म्हणतात. (२५) श्वेताश्वतरोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, मानस्तोक ह्या मंत्रानें अ
मंत्रण केलेलें भस्म लावावें. ह्या मंत्रांनीं वेगळे वेगळे ठिकाणीं क्रमाक्रमानें भस्म

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

धारयेत्॥इति मंत्रैः पृथक् क्रमात् ॥२५॥ त्रियायुषाणि कुरुते ललाटे च भुजद्वये ॥ नाभौ शिरसि हृत्पार्श्वे ब्राह्मणो वैदिकः सदा ॥२६॥ त्रिपुण्ड्रधारणं कुर्याद्भस्मना सजलेन च ॥ जलेन मिश्रिता भूतिरग्निष्टोमात्मिका शुभा ॥ शिवशक्तिमया धार्या त्रिपुण्ड्रेण त्रिधात्मना ॥२७॥ तलोगाक्षिकास्मृतौ ॥ मध्यमानामिकांगुष्ठैस्त्रिपुण्ड्रं भस्मना कृतम् ॥ तत्त्रिपुण्ड्रं भवेच्छस्तं महापातकनाशनम् ॥२८॥ सूतसंहितायाम् ॥ सर्वसंपत्करप्राप्तै हेतुभिर्भासितैः सितैः ॥ ललाटादौ क्रमेणैव कुर्यात्त्रैपुण्ड्रकं मुदा ॥२९॥ गारुडपुराणे॥ ललाटग्रीवकर्णे च चक्षुषी घ्राणकं तथा॥ आस्यबाहुभुजद्वंद्वस्तनमप्युदरं तथा ॥३०॥ मणिवंधौ च हृत्पार्श्वे नाभिमेढ्रौ च पृष्ठकम् ॥ ऊरूच जानुके चैव जंघे पायुस्तथैव च ॥ पादौ द्वात्रिंशकं चैव संधिष्वपि यथाक्रमम् ॥३१॥ यदा लिंगांगसंवंधी नरः स्याद्देशिकाज्ञया ॥ त्रिपुण्ड्रधारणं कुर्याद्भस्मना सजलेन वै ॥३२॥ जाबालोपनिषदि ॥ त्रिपुण्ड्रं भस्मना करोति यो विद्वान् ब्रह्मचारी गृह-

---

चावें (२६) वैदिक ब्राह्मण त्रियायुष (भस्माचें त्रिपुण्ड्र) कपाळावर, दोन्ही दंडावर, बेंबीवर, मस्तकावर, उरावर आणि बरगड्यांवर करितो. (२७) भस्माचें त्रिपुण्ड्र करणें झालें तर पाण्यांत भस्म भिजवून त्या भस्मानें करावें. तें भस्म पाण्यांत भिजविलें असतां त्याला भूति असें ह्मणतात. ती अग्निष्टोमस्वरूप असून कल्याणकारक आहे. ती शिवशक्तिस्वरूप आहे, ती त्रिपुण्ड्राच्या रूपानें तीन बोटें ओढून लावावी. (२८) लोगाक्षिकास्मृतींत ह्मटलें आहे कीं, मध्यमा, अनामिका, अंगुष्ठ ह्या तीन बोटांनीं भस्माचें त्रिपुण्ड्र करावें. तें भस्माचें त्रिपुण्ड्र कल्याणकारक आहे, तें भस्माचें त्रिपुण्ड्र कपाळास लावलें तर पातकांचा नाश होतो. (२९) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, पांढरी विभूति सर्व संपत्ति प्राप्त करून देणारी आहे, ती पांढरी शुभ्र असते, त्या विभूतीनें अगोदर कपाळावर त्रिपुण्ड्र करावें. (३०) गारुडपुराणांत ह्मटलें आहे कीं, कपाळ, मान, कान, डोळे, नाक आणि मान, तोंड, हात, दोन मनगटें, स्तन, आणि तसेंच पोट, (३१) कोंपर, हृदय, बरगड्या, बेंबी, शिश्न, पाठ, मांड्या, गुढघ्याच्या खालील भाग, घोटे, गुह्य आणि दोन पाय मिळून सांध्या सांध्यावर वत्तीस ठिकाणीं भस्माचें त्रिपुण्ड्र करावें. (३२) जेव्हां मनुष्य लिंगांगसंबंधी (इष्टलिंग शरीरावर धारण करणारा) होतो, तेव्हां तो आपल्या गुरूच्या आज्ञेप्रमाणें पाण्यांत भिजविलेल्या भस्माचें आपल्या कपाळावर आणि शरीराच्या भागांवर जागोजाग त्रिपुण्ड्र करितो. (३३) जाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी विद्वान् मनुष्य भस्माचें त्रिपुण्ड्र करितो, तो ब्रह्मचारी असो, गृहस्थाश्रमी असो,

LIBRARY
Jangamawadi Math, Varanasi
Acc. No. ......3555......
CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्थो वानप्रस्थो यतिर्वा समस्तपातकोपपातकेभ्यः पूतो भवति ॥३३
स्कान्दे ॥ वर्णी वा तापसो वापि शूद्रो वा यदि भूतिदः ॥ सा भू
सर्वदा ग्राह्या नोचेद्द्रोही ममैव सः ॥३४॥ अमंत्रेणापि यः कुर्यादज्ञात
महिमोन्नतिम् ॥ त्रिपुण्ड्रं फालफलके मुच्यते सर्वपातकैः ॥३५॥ य
वेदे ॥ भूत्यै न प्रमदितव्यम् ॥३६॥ वासिष्ठे ॥ यावन्तः पतिता भू
भस्मनः परमाणवः ॥ तावद्वर्षसहस्राणि नरो भवति किल्बिषी ॥३
भीमागमे ॥ न दीक्षा न तपो मंत्रा न यज्ञा देवता न च ॥ विद्यानै
गमज्ञानं न यस्य भस्मधारणम् ॥३८॥ बोधायनस्मृतौ ॥ वृथा वेदा
था यज्ञा वृथा दानं वृथा तपः ॥ वृथा व्रतोपवासौ तु त्रिपुण्ड्रं यो
धारयेत् ॥३९॥ लोगाक्षिकास्मृतौ ॥ यथा कृशानुरहितस्त्वध्वरो

---

वानप्रस्थाश्रमी असो, किंवा सन्यासी असो; तो सर्व प्रकारच्या महापातकांपा
आणि उपपातकांपासून मुक्त होऊन पवित्र होतो. (३४) स्कन्दपुराणांत ह्मटलें
कीं, आपणास भस्म देणारा ब्रह्मचारी असो, तपस्वी असो किंवा एखादा शूद्र अ
त्यानें भस्म दिलें तर तें बिनदिक्कत पाहिजे तेव्हां घ्यावें; असें न करील तर तो
नुष्य माझा ( शिवाचा ) द्रोही आहे असें समजावें. (३५) जर कोणी एखादा
नुष्य मंत्रविधि वगैरे कांहींएक न ह्मणतां न कळत अपार महिमा असणारें भस्म
पल्या कपाळास लावील तर तो देखील सर्व पातकांपासून मुक्त होईल. (३६) य
र्वेदांत ह्मटलें आहे कीं, भस्म लावण्याचे कामांत हयगय करूं नये. (३७) वा
ष्ठपुराणांत ह्मटलें आहे कीं, भस्माचे लहान लहान रजःकण जितके जमिनीवर
डले असतील, तितकीं हजार वर्षेपर्यंत तो भस्म भुईवर सांडणारा मनुष्य पात
होतो. आणि त्या पातकाचें फळ नरकवास वगैरे भोगीत असतो. (३८) भीमा
मांत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य भस्मधारण करीत नाहीं, त्याच्या दीक्षेचा उ
योग नाहीं, त्याच्या तपाचा उपयोग नाहीं, त्याच्या मंत्रांचा उपयोग नाहीं, त्याच
यज्ञांचा उपयोग नाहीं, त्याच्या देवतांचा उपयोग नाहीं, त्याच्या विद्येचा व त्या
शिवागमज्ञानाचा कांहींएक उपयोग नाहीं. (३९) बौधायनस्मृतींत ह्मटलें आहे 
जो मनुष्य भस्माचें त्रिपुण्ड्र लावीत नाहीं, त्याचें वेद पठन करणें व्यर्थ आं
त्याचे यज्ञ करणें व्यर्थ आहे, त्याचें दान देणें व्यर्थ आहे, त्याचें तप करणें व
आहे, त्याचें व्रत करणें आणि उपवास करणें ही व्यर्थ आहे. (४०) लोगाक्षिकास्
तींत ह्मटलें आहे कीं, यज्ञामध्यें सर्व प्रकारची सामुग्री असली, तरी अग्नि नसे
तर त्या यज्ञास जशी शोभा येत नाहीं; त्याप्रमाणें सर्व प्रकारचें सामानसुमान (पू

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विराजते ॥ अशेषसाधनोपेतं भस्महीनं शिवार्चनम् ॥४०॥ भीमागमे ॥ श्राद्धे यज्ञे जपे होमे वैश्वदेवे सुरार्चने ॥ धृतत्रिपुण्ड्रपूतात्मा मृत्युं जयति मानवः ॥४१॥ क्रियासारे ॥ चंदनं कुंकुमं चैव मृगनाभिमुखा-न् परान् ॥ गंधान् स्वल्पफलान् हित्वा भस्मधारपरो भवेत् ॥४२॥ भी-मागमे ॥ सर्वतीर्थेषु यत्पुण्यं सर्वयज्ञेषु यत्फलम् ॥ तत्फलं कोटिगु-णितं भस्मस्नानान्न संशयः ॥४३॥ शिवधर्मशास्त्रे ॥ भस्मस्नानं जलस्ना-नादसंख्येयगुणाधिकम् ॥ तस्माद्वारुणमुत्सृज्य स्नानमाग्नेयमाचरेत् ॥४४॥ शिवधर्मपुराणे ॥ भस्मस्नानं परं तीर्थं गंगास्नानाद्दिने दिने ॥ भस्मरूपः शिवस्साक्षाद्भस्म त्रैलोक्यसाधनम् ॥४५॥ कालोत्तरे ॥ ब्र-ह्मा च देवा ऋषयो गंधर्वा यक्षकिन्नराः ॥ मरुद्गणाः पितृगणाः सर्वे भूतगणा अपि ॥ नित्यं च सर्वयत्नेन भस्मस्नानं प्रकुर्वते ॥ ४६ ॥

---

द्रव्य ) घेऊन शिवाची पूजा केली तरी तो पूजा करणारा भस्म धारण न करील तर त्याचें तें शिवपूजन व्यर्थ आहे. (४१) भीमागमांत ह्मटलें आहे कीं, श्राद्धाच्यावेळीं, यज्ञाच्यावेळीं, जप करावयाच्या वेळीं, होम करावयाच्या वेळीं, वैश्वदेव करावयाच्या वेळीं, आणि देवपूजा करावयाच्या वेळीं, जो मनुष्य आपले शरीरास भस्माचें त्रिपुंड्र करितो, तो त्यामुळें निष्पाप होऊन मृत्यूस देखील जिंकतो. (४२) क्रियासारांत सां-गितलें आहे कीं, चंदनाचें गंध, कुंकुम किंवा दुसरे कस्तुरी वगैरे सुवासिक पदार्थ मनुष्यानें आपले कपाळास किंवा शरीरास लाविले, तर त्यापासून फारच थोडा उप-योग होतो; ह्यासाठीं मनुष्यानें ते पदार्थ सोडून देऊन भस्मलेपन मात्र शरीरास अ-वश्य करावें. (४३) भीमागमांत ह्मटलें आहे कीं, पृथ्वीच्या पाठीवर जितकीं कांहीं तीर्थें आहेत त्या सर्व तीर्थांत स्नान केलें तर जें कांहीं पुण्य आहे, किंवा सर्व प्रकारचे यज्ञ केले तर जें कांहीं फळ मिळतें त्या फळाच्या कोटिपटीनें जास्त फळ मनुष्यानें भस्मस्नान केलें असतां मिळतें. ह्यांत संशय नाहीं. (४४) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, भस्मस्नान करणें हें पाण्याचें स्नान करण्यापेक्षां असंख्यपटीनें जास्त आहे. ह्यासाठीं मनुष्यानें पाण्यानें स्नान न करितां भस्मस्नानच करीत जावें. (४५) शिव-धर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, दररोज गंगानदीचें स्नान करण्यांत जें कांहीं पुण्य आहे, त्यापेक्षां भस्मस्नान करण्यांत अधिक पुण्य आहे. कांतर प्रत्यक्ष श्रीशंकर हा भस्म-स्वरूप आहे. भस्म त्रैलोक्याचें राज्य मिळवून देण्यास कारण आहे. (४६) कालो-त्तरांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव, इतर तेहतीस कोटि देव, ऋषि, गंधर्व, यक्ष, किन्नर, मरुद्गण, पितृगण, आणि सर्वभूतगण देखील नेहमीं हरप्रयत्नानें भस्मस्नान करितात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यः स्नानमाचरेन्नित्यमाग्नेयं संयतेंद्रियः॥कुलैकविंशमुत्तार्य स गच्छेत्परं पदम् ॥४७॥ शैवरत्नाकरे ॥ भस्मस्नानविशुद्धात्मा जितक्रोधो जितेंद्रियः ॥ मत्समीपमुपागम्य न स भूयोऽभिजायते ॥४८॥ स्कान्दे ॥ शिवेन विष्णुना चैव ब्रह्मणा वज्रिणा तथा ॥ देवताभिर्धृतं भस्म त्रिपुण्ड्रोध्दूलनात्मना ॥४९॥ वासिष्ठरामायणे ॥ सर्वे तपस्विनः प्रोक्ताः सर्वे च यज्ञभागिनः ॥ रुद्रभक्ताः स्मृताः सर्वे त्रिपुण्ड्रांकितमस्तकाः ॥५०॥ शिवधर्मपुराणे ॥ प्रातः स्नात्वा च गच्छेत्स भस्मनैव शिवं पदम् ॥ पापकंचुकमुत्सृज्य स्नानमाग्नेयमाचरेत् ॥५१॥ शातातपस्मृतौ वृत्तम् ॥ सुरां पीत्वा गुरुदारांश्च गत्वा स्तेयं कृत्वा ब्रह्महत्यां च कृत्वा भस्मच्छन्नो भस्मशय्याशयानो रुद्राध्यायी मुच्यते सर्वपापैः ॥५२॥ गारुडपुराणे ॥ त्रिपुण्ड्रं ये विनिंदन्ति निंदन्ति शिवमेव ते ॥ धार्यं

---

(४७) ज्या मनुष्याचीं इंद्रियें त्याच्या तव्यांत असून, जो नेहमीं भस्मस्नान करितो, तो आपल्या एकवीस कुळांचा उद्धार करून उत्तमगतीला जातो. (४८) शैवरत्नाकरांत ह्मटलें आहे कीं, नेहमीं भस्मस्नान करीत असल्यामुळें ज्या मनुष्याचें म[न] निष्पाप झालें आहे, व ज्यानें राग जिंकला असून, सर्व इंद्रियें आपल्या ताब्यां[त] ठेविलीं आहेत; तो माझ्या (शिवाच्या) सामीप्यपदवीला येऊन पोहोंचतो. त्या[स] पुनः जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडावें लागत नाहीं. (४९) स्कन्दपुराणांत ह्मटलें आ[हे] कीं, शिवानें, विष्णूनें, ब्रह्मदेवानें, इंद्रानें आणि इतर देवांनीं भस्माचें त्रिपुण्ड्र कर[ून] आपले मस्तकास लाविलें आहे, व आपल्या अंगास भस्म लावून घेतलें आहे. (५०) वासिष्ठरामायणांत ह्मटलें आहे कीं, ज्यांच्या कपाळास भस्माचें त्रिपुण्ड्र अ[स]सेल, त्या सर्वांस तपस्वी असें ह्मणावें; त्यास यज्ञांत भाग घेण्याचा अधिकार आहे; त्या सर्वांस रुद्रभक्त असें म्हणावें. (५१) शिवधर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य नित्य पहाटेस उठून भस्मानेंच स्नान करील, तो आपल्या अंगावरील पातकांचा अंगरखा काढून टाकून (निष्पाप होऊन) कैलासपदास जाईल. ह्यासाठीं मनुष्यानें भस्मस्नान करावें. (५२) शातातपस्मृतींत ह्मटलें आहे कीं, मनुष्य दा[रू] पिवो, गुरूच्या बायकोकडे जावो, चोरी करो, ब्रम्हहत्या करो, तो जर आपल्या अंगास भस्माचा लेप करील, भस्मांतच जाऊन लोळेल, आणि रुद्राध्याय पठन क[र]रील, तर तो सर्व पापांपासून मुक्त होईल. (५३) गारुडपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे लोक भस्माच्या त्रिपुण्ड्राची निंदा करितात, ते शिवाची निंदा करितात; जे कोणी लोक भक्तीनें भस्माचें त्रिपुण्ड्र लावितात (धारण करितात), ते प्रत्यक्ष शिवाला

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

च ये भक्त्या धारयन्ति तमेव ते ॥५३॥ स्कन्दपुराणे ॥ धार्या चिल्लिंग मनसा सर्वैश्वर्यप्रदायिनी ॥ भवस्य नाशनी या स्यात्सा विभूतिरिहोच्यते ॥५४॥ एतस्मात्कारणाद्भस्म ध्रियते शंभुना सदा ॥ यद्यत्स मन्यते देवस्तत्तद्भक्तः समाचरेत् ॥५५॥ स्कान्दे ॥ यथा सर्वपुराणेषु पुरी वाराणसी शुभा ॥ तथा शुभ्रत्रिपुण्ड्रं च सर्वशास्त्रेषु कथ्यते ॥५६॥ वृत्तम् ॥ समस्ततीर्थौघमयी च काशी विश्वेश्वरः सर्वसुरात्मकोऽयम् ॥ समस्ततत्वैकरसा विभूतिस्तथैव पुण्ड्रौघमयं त्रिपुण्ड्रम् ॥५७॥ स्कान्दे ॥ यथा विश्वाधिको रुद्रः सर्ववेदेषु गीयते ॥ तथा सर्वपुराणेषु त्रिपुण्ड्रमपि गीयते ॥५८॥ सूतसंहितायाम् ॥ ब्रह्मणा विष्णुना वापि रुद्रेणापि मुनीश्वराः ॥ भस्मधारणमाहात्म्यमशक्यं परिभाषितुम् ॥५९॥ यथा राजा स्वचिन्हांकं स्वजनं मन्यते सदा ॥ तथा शिवस्त्रिपुण्ड्रांकधरं स्वमिव मन्यते ॥६०॥ पापाचारसमायुक्ताः सदा-

---

धारण करितात. (५४) स्कन्दपुराणांत झटलें आहे कीं, चित्स्वरूप लिंगाचें मनांत स्मरण करून विभूति (भस्म) धारण करावी; विभूति लावल्यानें सर्व प्रकारच्या ऐश्वर्याची प्राप्ति होते; विभूति संसारांतील दुःखाचा नाश करिते, ह्मणूनच तिला विभूति असें नांव पडलें आहे. (५५) ह्या कारणामुळेंच श्रीशंकर नेहमीं भस्म धारण करितो. तो देव जर आपणास मान्य आहे, तर तो देव जसें आचरण करितो तसें त्याच्या भक्तानें केलें पाहिजे. (५६) स्कन्दपुराणांत झटलें आहे कीं, जशी वाराणसी (काशी) नगरी पुण्यकारक आहे ह्मणून सर्व पुराणांत वर्णन आहे, तसें भस्माचें पांढरें शुभ्र त्रिपुण्ड्र करावें, असें सर्व शास्त्रांत सांगितलें आहे. (५७) काशीमध्यें जशीं सर्व तीर्थें आहेत, विश्वेश्वरामध्यें जसे सर्व देव आहेत, विभूतीमध्यें जशीं सर्व तत्वें एकत्र केलेलीं आहेत, तसेंच भस्मत्रिपुण्ड्र हें इतर सर्व त्रिपुण्ड्रांत श्रेष्ठ आहे. (एक भस्मत्रिपुण्ड्र लाविलें ह्मणजे इतर सर्व त्रिपुण्ड्रें केल्यासारखीं आहेत). (५८) स्कन्दपुराणांत झटलें आहे कीं, श्रीरुद्र हा सर्व त्रैलोक्यापेक्षां श्रेष्ठ आहे, असें सर्व वेदांत जसें सांगितलें आहे, तसेंच सर्व पुराणांत भस्मत्रिपुण्ड्राचा महिमा वर्णन केला आहे. (५९) सूतसंहितेंत झटलें आहे कीं, मुनीश्वरहो, ब्रह्मदेवाला, विष्णूला आणि रुद्रालाही भस्मधारणाचें महात्म्य यथार्थरीतीनें वर्णन करण्याची शक्ति नाहीं. (६०) जसा राजा आपली खूण अंगावर असणाऱ्या मनुष्यास हा मनुष्य माझा आहे असें ह्मणून ओळखतो, त्याप्रमाणें श्रीशंकरही भस्माचें त्रिपुण्ड कपाळावर असणाऱ्यास हा मनुष्य माझा आहे असें ओळखतो. (६१) जे कोणी लोक अतिशय वाईट चालीचे आहेत, व ज्यांस चांगली वागणूक मुळींच मा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चार विवर्जिताः ॥ भूतिशासनयुक्ता ये पूज्याः सर्वसुरासुरैः ॥६१ शिवधर्मे ॥ दुःशीलः शीलयुक्तो वा यो वा कोवाप्यलक्षणः ॥ भूति शासनसंयुक्तः स पूज्यो राजपुत्रवत् ॥६२॥ वृत्तम् ॥ यदा कदा च कुत्र संभवं भस्म धृतं स्यादिह येन केन वा ॥ न तेन तुल्यो भग वानजोऽपि श्रीभूतिधारी स शिवस्तथापि ॥६३॥ जावालोपनिषदि विभूतिधारणाद्ब्रह्मैकत्वं गच्छति स एष भस्मज्योतिर्विभूतिधारणात्कै वल्यमश्नुते स एष भस्मज्योतिर्विभूतिधारणादेव अमृतत्वं च गच्छ ति स एष भस्मज्योतिः स एष भस्मज्योतिः ॥६४॥ रुद्रनेत्रांबुजाता रुद्राक्षाणि नरोत्तमः ॥ यो धत्ते भस्म रुद्राक्षं स रुद्रो नात्र संशयः ॥६५

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्र ण्यश्रीसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे भ स्ममाहात्म्यस्थलं नाम एकोनविंशतिप्रकरणं समाप्तम्॥

---

हीत नाहीं; असे असूनही ते जर यथाविधीनें भस्म धारण करून शिवशास्त्र मा णारे असतील, तर ते देवदैत्यांसही वंद्य आहेत. (६२) शिवधर्मांत ह्मटलें आ कीं, मनुष्य वाईट स्वभावाचा असो किंवा चांगल्या स्वभावाचा असो, सुलक्ष असो किंवा दुर्लक्षणी असो, तो जर यथाविधीनें भस्माचें त्रिपुण्ड्र करणारा असेल तर तो राजाच्या मुलासारखा मान देण्यास योग्य आहे (६३) केव्हांही व कोठें जसें मिळालें तसें भस्म जरी पाहिजे त्या जातीच्या मनुष्यानें धारण केलें, तर त्या मनुष्याची बरोबरी प्रत्यक्ष श्रीविष्णूच्यानेंही करवणार नाहीं; कारण विभूति धा रण करणारा मनुष्य प्रत्यक्ष शंकर आहे, (भस्म कोणत्याही जागीं, कोणत्याही वेळीं कशाही तऱ्हेचें, कोणत्याही जातीच्या मनुष्यास मिळो; त्यानें तें धारण करावें ह्मणजे तो कृतार्थ होतो). (६४) जाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, विभूति धारण केलें तर तो मनुष्य ब्रह्मस्वरूप होतो, तोच स्वतः भस्मामुळें तेजःपुंज होऊन शोभूं ला गतो. विभूति धारण केल्यानें मनुष्य मोक्षपदास जातो, तोच स्वतः भस्मज्योति होतो. विभूति धारण केल्यानें मनुष्य जन्ममरणापासून मुक्त होतो; तोच स्वतः भ स्मज्योति होतो. तोच स्वतः भस्मज्योति होतो. (६५) जो चांगला मनुष्य शंक राच्या डोळ्यांतील पाण्यापासून उत्पन्न झालेल्या रुद्राक्षांस आपल्या अंगावर धारण करितो, आणि भस्माचे त्रिपुण्ड्र लावितो, तो प्रत्यक्ष श्रीशंकरच आहे; ह्यांत संशय नाहीं

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वराचार्यांत श्रेष्ठ ह्मणविणाऱ्या वीरशैवांच्या षट्स्थलमार्गाची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या सिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील भस्ममाहात्म्यस्थल नांवाचें एकोणिसावें प्रकरण संपलें.



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

## ॥ अथ रुद्राक्षमाहात्म्यस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ विंशतिप्रकरणम् ॥

**एवं महाज्ञानभस्मसत्क्रियामुखेन धृतस्य लिंगक्रियासम्पन्नस्य शिवज्ञानचक्षुःसंभूतरुद्राक्षमाहात्म्ये कृते सत्यनंतरं रुद्राक्षमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ स्कन्दपुराणे ॥ भगवन्देवदेवेश सर्वज्ञ परमेश्वर ॥ पृच्छामि त्वां महादेव कथयस्व प्रसादतः ॥१॥ दिव्यवर्षसहस्राणि चक्षुरुन्मीलितं मया ॥ पुटाभ्यां चारुपक्षाभ्यां पतिता जलबिंदवः ॥२॥ तत्राश्रुबिंदवो जाता महद्रुद्राक्षवृक्षकाः ॥ स्थावरत्वमनुप्राप्ता मर्त्यानुग्रहकारणात् ॥३॥ कात्यायनशाखायाम् ॥ ईश्वर उवाच ॥ पुरा त्रिपुरवधायोन्मीलिताक्षोऽहं तेभ्यो जलबिंदवो भूमौ पतितास्ते रुद्राक्षा जातास्सर्वानुग्रहार्थाय ॥४॥ स्कान्दे ॥बभूवुस्ते च रुद्राक्षा ह्यष्टत्रिंशत्प्रभेदतः ॥ सूर्यनेत्रसमुद्भूताः कपिला द्वादश स्मृताः ॥५॥ सोमनेत्रोत्थिताः श्वेतास्ते षोडशविधाः क्रमात् ॥ वन्हिनेत्रोत्थिताः कृष्णा दश-**

---

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. ह्याप्रमाणें शिवाद्वैतज्ञान, भस्म आणि सदाचार ह्यामुळें लिंगाचार पाळणाऱ्यास शिवाच्या ज्ञाननेत्रापासून उत्पन्न झालेल्या रुद्राक्षाचें माहात्म्य कसें आहे तें समजून घ्यावें अशी इच्छा उत्पन्न होतें तेव्हां आतां ह्यापुढें मी रुद्राक्षमाहात्म्यस्थल काय आहे तें सांगतों. (१) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, हे भगवन् देवाधिदेवा, सर्वज्ञा, परमेश्वरा, महादेवा, मी तुला रुद्राक्षाची उत्पत्ति कशी झाली? आणि रुद्राक्षाचें माहात्म्य काय आहे; तें विचारतों तर तूं तें मला कृपा करून सांग (२) शिवह्मणतात—ऐक. मी देवांचीं हजार वर्षें लोटून जाईपर्यंत डोळे उघडे ठेविले होते त्या डोळ्यांच्या सुंदर असणाऱ्या पापण्यापासून पाण्याचें थेंब खालीं पडले. (३) त्या डोळ्यांतील पाण्यापासून तात्काळ मोठमोठीं रुद्राक्षांचीं झाडें झालीं. हीं झाडें मनुष्य मात्रांवर उपकार करण्यासाठीं स्थावरत्व पावलीं. (४) कात्यायनशाखेंत स्वतः परमेश्वरांनीं ह्मटलें आहे कीं, पूर्वी त्रिपुरांस मारण्यासाठीं मी रागारागानें डोळे वटारून त्यावर चाललों, त्यावेळीं माझ्या डोळ्यांपासून पाण्याचे थेंब जमिनीवर पडले. ते पाण्याचे थेंबच सर्व प्राणिमात्रांवर उपकार करण्याकरितां रुद्राक्ष झाले. (५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, त्या रुद्राक्षाचे अडतीस भेद आहेत. शंकराच्या सूर्य नांवाच्या डोळ्यापासून बारा प्रकारचे रुद्राक्ष झाले ते सर्व कपिल रंगाचे झाले. (६) शंकराच्या चंद्र नांवाच्या डोळ्यापासून पांढऱ्या रंगाचे सोळाप्रकारचे रुद्राक्ष झाले, आणि शंक-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भेदा भवन्ति हि ॥६॥ रुद्राक्षाणां फलं वत्स त्रिषुलोकेषु विश्रुतम्। लिंगस्य दर्शने पुण्यं भवेद्रुद्राक्षदर्शनात् ॥७॥ कात्यायनशाखायाम्। तेषां नामोच्चारणेन दशशतगोदानफलं भवति दर्शनस्पर्शनाभ्यां द्विगुणत्रिगुणफलं भवति अतऊर्ध्वं वक्तुं न शक्यमिति कुमार ततो जपमंत्रकधारणविधिं कथयामि ॥८॥ स्नाने दाने जपे होमे वैश्वदेवे सुरार्चने ॥ प्रायश्चित्ते तथा श्राद्धे दीक्षाकाले विशेषतः ॥९॥ अरुद्राक्षधरो भूत्वा यत्किंचित्कर्म वैदिकम् ॥ कुर्याद्विप्रस्तु यो मोहान्नास वाप्नोति तत्फलम् ॥१०॥ स्कान्दे ॥ रुद्राक्षं धारयेद्विप्रः संध्यादिषु कर्मसु ॥ तत्सर्वं समवाप्नोति कोटिकोटिगुणं सदा ॥११॥ रुद्राक्षधारणाद्रुद्रो भवत्यत्र न संशयः ॥ हारं वा कटकं वापि तथान्यद्वाद्विजो त्तमाः ॥१२॥ मानवपुराणे ॥ हस्ते चोरसि कण्ठे वा मस्तके वापि धा

---

राच्या अग्नि नांवाच्या नेत्रापासून काळ्यारंगाचे दहा प्रकारचे रुद्राक्ष झाले, (७) शिव ह्मणतात—मुला कार्तिकेया, रुद्राक्षांचा उपयोग त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे. शिवलिंगाचें दर्शन घेतलें तर मनुष्यप्राण्यास जें कांहीं पुण्य लागतें, तेंच पुण्य त्या रुद्राक्षाचें दर्शन घेतलें असतां लागतें. (८) कात्यायनशाखेंत ह्मटलें आहे कीं, रुद्राक्षांचें नांव घेतल्याबरोबर एक हजार गाई दान केल्याचें पुण्य लागतें; रुद्राक्षांचें दर्शन घेतल्यानें दोन हजार गाई दान केल्याचें पुण्य लागत असून रुद्राक्षास स्पर्श केला असतां तीन हजार गाई दान केल्याचें पुण्य लागतें. ह्यापेक्षां पुढें आणखी कांहीं जास्त सांगतां येत नाहीं. मुला, ह्यानंतर त्यारुद्राक्षांचा जप आणि मंत्रपूर्वक रुद्राक्ष धारण करण्याचा प्रकार कसा आहे तो तुला सांगतों. (९) स्नान करावयाच्या वेळेस, दान करावयाच्या वेळेस, जप करावयाच्या वेळेस, होम करावयाच्या वेळेस, वैश्वदेव करावयाच्या वेळेस, देवांची पूजा करावयाच्या वेळेस, प्रायश्चित्त घ्यावयाच्या वेळेस, श्राद्ध करावयाच्या वेळेस आणि तसेंच दीक्षा घ्यावयाच्या वेळेस मनुष्यानें अवश्य रुद्राक्ष धारण केले पाहिजेत. (१०) जो कोणी ब्राह्मण रुद्राक्ष धारण केल्यावाचून कोणतेही वेदांत सांगितलेलें कर्म अज्ञानपणानें करील, त्याला त्या कृत्याचें फळ मुळींच मिळणार नाहीं. (११) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो ब्राह्मण संध्यावंदन वगैरे नित्य कर्म करावयाचे वेळीं नेहमीं रुद्राक्ष धारण करितो; त्याला त्या त्या कृत्याचें कोटिकोटिपट जास्त फळ मिळतें. (१२) मनुष्यानें रुद्राक्ष धारण केले, तर तो प्रत्यक्ष शंकरच होतो ह्यांत संशय नाहीं. ब्राह्मणश्रेष्ठहो रुद्राक्षांची माळा अथवा कडीं असोत, किंवा आणखी कांहीं दुसरा एखादा अलंकार असो, रुद्राक्ष आपल्या अंगावर घातले ह्मणजे झालें. (१३) मानवपुराणांत ह्मटलें आहे कीं, रुद्राक्ष हाताां

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

येत् ॥ मुच्यते सर्वपापेभ्यो रुद्राक्षस्य च धारणात् ॥१३॥ स्कान्दे ॥ शिखायां धारयेदेकं षट्त्रिंशन्मस्तके तथा ॥ द्वात्रिंशत्कण्ठदेशे च पंचाशन्मालिका हृदि ॥१४॥ षोडशं बाहुवलये द्वादशं मणिबन्धके ॥ कर्णयोरेकमेकं स्यादुपवीते शताष्टकम् ॥१५॥ शताष्टमक्षमालायां नित्यं धारयते नरः ॥ पदेपदेऽश्वमेधस्य फलं प्राप्नोत्यसंशयः ॥१६॥ सप्तविंशतिरुद्राक्षैः कुर्याद्रुद्राक्षमालिकाम् ॥ धारणं जपमालायामनंतं फलमुच्यते ॥१७॥ तत्रैव ॥ उरोमाला च पंचाशदष्टोत्तरशतं तथा ॥ शिरसा धार्यते कोटि कर्णाभ्यां शतकोटयः ॥१८॥ गले बद्धं शतं कोटि मूर्ध्नि कोटिसहस्रकम् ॥ अयुतं चोपवीते च लक्षकोटि भुजद्वये ॥१९॥ अप्रमेयफलं हस्ते रुद्राक्षं मोक्षसाधनम् ॥ लक्षकोटिसहस्राणि

---

किंवा उरावर किंवा गळ्यांत किंवा डोक्यावर पाहिजे तेथें धारण करावे. रुद्राक्ष धारण करण्यानें मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. (१४) स्कन्दपुराणांत झटलें आहे कीं, शेंडीला एक रुद्राक्ष बांधावा, मस्तकावर छत्तीस रुद्राक्ष धारण करावे गळ्यांत बत्तीस रुद्राक्ष बांधावे, आणि पन्नास रुद्राक्षांची माळ उरावर लोंवत ठेवावी. (१५) सोळा रुद्राक्ष कड्यातोड्यासारखे हातांत बांधावे, मनगटास बारा रुद्राक्ष बांधावे, एकेका कानांत एकेक रुद्राक्ष बांधावा, आणि एकशे आठ रुद्राक्षांचें यज्ञोपवीत करून तें गळ्यांत घालावें. (१६) एकशें आठ रुद्राक्षांची जपाची माळ करावी. इतके रुद्राक्ष मनुष्यानें नित्य आपल्या शरीरावर धारण करावे. असें करणारास पावलोपावलीं अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य लागतें; ह्यांत कांहीं संशय नाहीं. (१७) सत्तावीस रुद्राक्षांची एक जपाची माळ करावी. सत्तावीस रुद्राक्षांची केलेली जपमाळ हातांत घेतली तर जप करणारास अनंत पुण्य लागतें, असें झणतात. (१८) तेथेंच आणखी असेंही झटलें आहे कीं, उरापर्यंत लोंवणारी गळ्यांत रुद्राक्षांची घातलेली माळ पन्नास रुद्राक्षांची असावी किंवा एकशें आठ रुद्राक्षांची असावी. तीच माळ मस्तकावर घेतली तर एक कोटपटीनें पुण्य जास्त लागेल; व दोन्ही कानांत घातली तर शंभर कोटपटीनें जास्त पुण्य लागेल. (१९) ती रुद्राक्षांची माळ गळ्यांत बांधली तर शंभरकोटपटीनें पुण्य जास्त लागेल. मस्तकावर रुद्राक्ष धारण केले तर हजारकोटपट पुण्य जास्त लागतें. उपवीताच्या ठिकाणीं रुद्राक्ष बांधले तर लक्षपटीनें पुण्य जास्त लागतें. (२०) हातांत रुद्राक्ष बांधले तर किती फळ मिळतें ह्याची गणती करितां येत नाहीं. त्यामुळें मोक्षप्राप्ति होते. रुद्राक्षांची माळ हातांत घेऊन जप केला तर लक्षकोटिहजार आणि शेंकडों लक्ष-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लक्षकोटिशतानि च ॥२०॥ तज्जपाल्लभते पुण्यं नात्र कार्या विचारणा
अक्षमालाजपं कृत्वा सद्गतिस्तस्य का कथा ॥२१॥ जपक्रियाक्रमः
क्तो मरुन्मुनिगणादिभिः ॥२२॥ वृत्तम् ॥ रुद्राक्षस्मृतिधारणे क्षण
पैस्तत्तत्फलं प्राप्यते कोटि स्याद्दशकोटिरत्र शतकोटिः स्यादनंतं
तः ॥ एतेषां च फलस्य वक्तुमपरं तेषां न शक्यं सदा भोगींद्रांबुज
भेषण्मुखदशग्रीवादिकानामपि ॥२३॥ मानवपुराणे ॥ रुद्राक्षमूलं ब्र
च तन्नालं विष्णुरुच्यते ॥ मुखे सदाशिवः प्रोक्तो बिंदुस्सर्वत्र देवता
॥२४॥ स्कन्दपुराणे ॥ रुद्राक्षं मस्तके कृत्वा शिरःस्नानं करोति यः
गंगास्नानफलं तस्य जायते नात्र संशयः ॥२५॥ मानवपुराणे ॥
ण्मयं चापि रुद्राक्षं कृत्वा यत्नेन धारयेत् ॥ अपि दुष्कृतकर्माण
यांति परमां गतिम् ॥२६॥ रुद्राक्षाश्रितकण्ठोऽयं गृहे तिष्ठति यो नर

---

कोटि अधिक पुण्य लागतें. (२१) त्या मंत्राचा जप केला असतां अगणित पुण्य ला
ह्यांत संशय घेण्याचें कारण नाहीं. रुद्राक्षांची माळ हातांत घेऊन जो जप करितो,
उद्धरून जाईल ह्यांत काय नवल आहे? (२२) जप कसा करावा, आणि त्या
करण्याचा क्रम कसा आहे, हें देवांनीं व मुनीश्वरांच्या समुदायांनीं सांगितलें आ
(२३) रुद्राक्षांचें स्मरण केलें, रुद्राक्ष धारण केले, रुद्राक्ष स्वतः आपण डोळ्यां
पाहिले, आणि रुद्राक्षमाला हातांत घेऊन जप केला, तर अनुक्रमानें स्मरणामु
एक कोटि फळ, धारणामुळें दहा कोटि फळ, अवलोकन करण्यामुळें शंभर कोटि फ
आणि जप केल्यानें अनंतपट पुण्य लागतें. (इतकेपटीनें जास्त तें तें सत्कृत्य के
असें होतें) ह्या सत्कृत्यांचें फळ काय काय मिळतें तें यथार्थ रीतीनें सांगण्या
शेषाची, ब्रह्मदेवाची, कार्तिकस्वामीची, आणि रावणाचीही शक्ति नाहीं. (२४) मा
वपुराणांत ह्मटलें आहे कीं, रुद्राक्षाच्या मूळाच्या ठिकाणीं ब्रह्मदेव राहतो, त्याच
मध्यभागीं श्रीविष्णु राहतो, त्याचे तोंडांत सदाशिव राहतो, व बिंदु आणि इत
सर्व देवता त्या रुद्राक्षाच्या सर्व अवयवांत राहतात. (२५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आ
कीं, जो कोणी मनुष्य रुद्राक्ष आपल्या मस्तकावर घेऊन डोकीवरून स्नान करितो
त्याला प्रत्यक्ष गंगानदींत स्नान केल्याचें पुण्य लागतें. ह्यांत कांहीं संशय नाह
(२६) मानवपुराणांत ह्मटलें आहे कीं, रुद्राक्ष न मिळाले तर मातीचे रुद्राक्ष कर
देखील जे मनोभावानें धारण करितात; ते अतिशय पापकर्में करणारे असले, त
उत्तमगतीस जातात. (२७) जो मनुष्य रुद्राक्षांची माळ आपल्या गळ्यांत घाल
घरांत राहतो; तो आपल्या एकवीस कुळांचा उद्धार करून शिवलोकांत मोठेप

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कुलैकविंशमुत्तार्य शिवलोके महीयते ॥२७॥ स्कान्दे ॥ भक्त्या रात्रौ दिवा पापं दिवारात्रिकृतं हरेत् ॥ लक्षं तु दर्शनात्पुण्यं कोटिस्तु स्पर्शनाद्भवेत् ॥ तत्तु कोटिशतं पुण्यं लभते धारणान्नरः ॥२८॥ जाबालोपनिषदि ॥ पापं कुर्वन्नपि मानवो रुद्राक्षं धारयन् सर्वपाप्मानं तरति ॥२९॥ मानवपुराणे ॥ रुद्राक्षं धारयन् पापं कुर्वन्नपि च मानवः ॥ सर्वं तरति पाप्मानं जाबालश्रुतिराह हि ॥३०॥ स्कान्दे ॥ उच्छिष्टो वा विकर्मस्थो युक्तो वा सर्वपातकैः ॥ मुच्यते सर्वपापेभ्यो नरो रुद्राक्षधारणात् ॥३१॥ कण्ठे रुद्राक्षमाश्रित्य श्वापि वा म्रियते यदि ॥ सोऽन्ते रुद्रत्वमाप्नोति किं पुनर्मानुषादयः ॥३२॥ जगतिच्छंदे ॥ रुद्राक्षमालाभरणा अन्त्यजा अधमा अपि ॥ सदा सर्वत्र संपूज्याः सर्वैरपि न संशयः ॥३३॥ स्कान्दे ॥ केवलानपि रुद्राक्षान् यथा लब्धान् बिभर्ति

---

पावतो. (२८) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, भक्तिपूर्वक रात्रीं रुद्राक्ष धारण केले, तर मनुष्यानें दिवसास केलेल्या पातकांचा नाश होतो. दिवसा रुद्राक्ष धारण केले, तर रात्रीं आपल्या हातून जीं जीं पापें घडलीं असतील त्यांचा नाश होतो. रुद्राक्षाचें दर्शन घेतलें तर एक लक्ष जप केल्याचें श्रेय मिळतें, व रुद्राक्षास स्पर्श केला तर एक कोटि जप केल्याचें श्रेय मिळतें, आणि रुद्राक्ष आपल्या अंगावर धारण केले तर शंभर कोटि जप केल्याचें श्रेय मिळतें. (२९) जाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, मनुष्य अनेक तऱ्हेचीं अघोर पातकें करणारा असला तरी तो जर रुद्राक्ष धारण करील तर त्याच्या सर्व पातकांचा नाश होतो, व तो संसार दुःखांतून तरून जातो. (३०) मानवपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनुष्य अनेक प्रकारचीं अघोर पातकें करणारा असला तरी तो जर रुद्राक्ष धारण करील तर त्याच्या सर्व पातकांचा नाश होतो व तो तरून जातो. असें जाबालश्रुति सांगते, (३१) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनुष्य कितीही भ्रष्ट असो किंवा भलतीं भलतीं कामें करीत असो किंवा त्याच्या हातून सर्व पातकें घडलेलीं असोत; तो मनुष्य जर रुद्राक्ष धारण करील तर तो सर्व प्रकारच्या पातकांपासून मुक्त होईल. (३२) एखादा कुत्रा जरी त्याच्या गळ्यांत रुद्राक्ष बांधल्यानंतर (बांधलेला) मरण पावला, तर तो कुत्रा देखील शिवस्वरूप होतो. मग मनुष्य वगैरे दुसरे सज्ञान प्राणी, त्यांचे गळ्यांत रुद्राक्ष असतांना मरण पावतील, तर रुद्रपणा पावतील; ह्यांत काय आश्चर्य आहे? (३३) जगतिच्छंदांत ह्मटलें आहे कीं, रुद्राक्षांच्या माळा करून त्या आपल्या गळ्यांत घालणारे महार मांग असोत, किंवा किती ही नीचजातींत जन्मलेले असोत; ते सर्व ठिकाणीं सर्वांस नमस्कार करण्यास योग्य आहेत. ह्यांत कांहीं शंका नाहीं. (३४) स्कन्द-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यः ॥ तं न स्पृशन्ति पापानि तमांसीव विभावसुम् ॥३४॥ तत्रैव
अमंत्रको वा मंत्रेण सहितं भावशुद्धितः ॥ यो वा को वा नरो
धारयेल्लज्जया विना ॥ सर्वपापविनिर्मुक्तः समग्ज्ञानमवाप्नुयात् ॥३
बोधायनशाखायाम् ॥ एतानीह रुद्राक्षाणि त्रयो वेदा धारयंति
स्माद्देवा धारयंति यस्तानि धारयन् गच्छन् तिष्ठन् खादन् स्व
जाग्रन्नुन्मिषन्निमिषन्नपि सर्वाण्येनांसि तरति रुद्री भवति य एवं
द्वान् ब्रह्मचारी गृहस्थो वानप्रस्थो यतिर्वा धारयेत् पदेपदेऽश्वमे
फलं प्राप्नोति ॥३६॥ स्कान्दे ॥ सुराणामसुराणां च वंदनीयो य
शिवः ॥ रुद्राक्षधारको नित्यं वंदनीयो नरैरिह ॥३७॥ तत्रैव ॥ रु
रुद्राक्षदानेन भवतीति किमद्भुतम् ॥ तन्मालया तथा हस्ते रुद्राक्ष
मते क्षितौ ॥३८॥ तस्मात्सर्वैः सदा कार्यं रुद्राक्षाणां च धारणम्

---

पुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य फक्त रुद्राक्षच जसे मिळतील
धारण करील, तर सूर्यास जसा अधंकार शिवत नाहीं, तशींच त्यास पातकें
वत नाहींत, तो मुक्त होतो. (३५) तेथेंच आणखी असेंही सांगितलें आहे कीं,
मंत्रक असोत, किंवा समंत्रक असोत, निर्मलान्तःकरण करून जो कोणी मनु
लोकांची लाजलज्जा सोडून नेहमीं रुद्राक्ष धारण करील; तो सर्व प्रकारच्या पात
पासून मुक्त होऊन उत्तम तऱ्हेचा ज्ञानवान् होईल. (३६) बौधायन शाखेंत ह्म
आहे कीं, हे रुद्राक्ष तिन्ही वेद धारण करितात, ह्मणूनच सर्व देव धारण करिता
जो कोणी मनुष्य हे रुद्राक्ष धारण करितो, त्याच्या हातून जातांना, बसतांना,
तांना, विनोद करितांना, जागे असतांना किंवा पापण्यांची उघडझांक करीत अ
तांना, जीं कांहीं पातकें घडलीं असतील त्या सर्व पातकांपासून तो मुक्त हो
व तो स्वतः रुद्रासारखा होतो. ह्याप्रमाणें जो कोणी विद्वान् ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्र
किंवा सन्यासी, रुद्राक्ष धारण करील तर तो पावलोपावलीं अश्वमेध यज्ञ
त्याच्या पुण्याचा अधिकारी होईल. (३७) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, देव
सोत, किंवा दैत्य असोत, त्या सर्वांस महादेव जसा नमस्कार करण्यास योग्य आ
तसाच ह्या लोकीं रुद्राक्ष धारण करणारा मनुष्य, नेहमीं सर्व लोकांनीं नमस्कार
रण्यास योग्य आहे. (३८) तेथेंच आणखी असेंही ह्मटलें आहे कीं, रुद्राक्षांचें द
केलें तर रुद्राक्षदान करणारा मनुष्य प्रत्यक्ष रुद्रच होईल, ह्यांत काय आश्चर्य आ
कां तर प्रत्यक्ष श्रीशंकरच रुद्राक्षांची माळ आपल्या गळ्यांत घालून व रुद्राक्षांची
पमाला हातांत घेऊन पृथ्वीवर फिरतो. (३९) ह्यासाठीं सर्व मनुष्यांनीं नेहमीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भोगमोक्षप्रदं पुंसां मया चैव धृतं सदा ॥३९॥ रुद्राक्षाणि स्वयं रुद्रो भवेद्रुद्राक्षधारकः ॥ रुद्राक्षं धारयेत्तस्मादिह रुद्रः परत्र च ॥४०॥ जाबालोपनिषदि ॥ य इदं रुद्राक्षं धत्ते सर्वपुण्यतीर्थस्नातो भवति स सर्ववेदाध्यायी भवति स सर्वक्रतुकृद्भवति स सर्वदेवात्मको भवति स सत्यं परमः शिवः स सत्यं परमः शिवः ॥४१॥ स्कान्दे ॥ रुद्राक्षं मुक्तिमूलं च रुद्राक्षं ज्ञानमुच्यते ॥ रुद्राक्षं भक्तरूपं च रुद्राक्षं लिंगमुच्यते ॥४२॥ रुद्राक्षमूलमोंकारं मुखं पंचाक्षरं विदुः ॥ तन्नालं भक्तहृन्नालं तत्सूत्रं ज्ञानसूत्रवत् ॥४३॥

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण्यश्रीसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे रुद्राक्षमाहात्म्यस्थलं नाम विंशतिप्रकरणं समाप्तम् ॥

---

क्ष धारण करावे. शिव ह्मणतात लोकहो, रुद्राक्ष धारण केल्यानें मनुष्यांस ह्या लोकीं सुखोपभोगाची प्राप्ति होऊन, मरणानंतर मोक्ष मिळतो. फार काय सांगावें? मी देखील स्वतः रुद्राक्ष धारण करितों. (४०) रुद्राक्ष धारण करणारा मनुष्य स्वतः रुद्राक्ष धारण करण्यामुळें रुद्रच होतो. ह्यासाठीं रुद्राक्ष धारण करावे, रुद्राक्ष धारण केले ह्मणजे मनुष्य ह्या लोकीं आणि मरणानंतर परलोकींही शिवच होतो. (४१) जाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य हे रुद्राक्ष धारण करितो, त्यास सर्व पृथ्वीवरील पवित्र तीर्थांत स्नान केल्याचें फळ मिळतें. त्यानें सर्व वेदाध्ययन केल्यासारखें आहे. त्यानें सर्व यज्ञ केल्यासारखे आहेत, तो सर्व देवतास्वरूप आहे, तोच मूर्तिमंत खरेपणा आहे, तोच खरोखर शिव आहे, तोच खरोखर परशिव आहे. (४२) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, रुद्राक्ष हें मोक्षाचें मूल आहे, रुद्राक्ष हेंच ज्ञान आहे असें ह्मणतात, रुद्राक्ष हें भक्ताचें स्वरूप आहे, व रुद्राक्षमालाच शिवलिंग असें मानतात. (४३) ॐकार हा रुद्राक्षाचें मूल आहे, व पंचाक्षरमंत्र हा रुद्राक्षाचें मुख आहे; असें मानतात. भक्तांचें हृदय हा रुद्राक्षांचा देंठ आहे, त्याचें नाल आणि त्याचें सूत्र हीं ज्ञानसूत्रासारखीं आहेत.

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वराचार्यांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या, वीरशैवांच्या षट्स्थलमार्गांची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या सिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील रुद्राक्षमाहात्म्यस्थल नांवाचें विसावें प्रकरण संपलें.

---

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

## ॥ पंचाक्षरमाहात्म्यस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ एकविंशतितमं प्रकरणम् ॥

एवं लिंगांगिनो विभूतिरुद्राक्षधारकस्य नित्यलिंगार्चनारतलिंग संपन्नस्य प्रणवान्वितपंचाक्षरीमंत्रजपस्यावश्यकत्वेन अनंतरं पंचाक्षरीमाहात्म्यमित्युच्यते ॥ उत्तरवातुले ॥वृत्तम्॥ षट्स्थलब्रह्मरूपिणि षडक्षरि मंत्रदेवते जननि ॥ षट्स्थलभक्तिप्रसादपरमसुखैकप्रदे नमस्तुभ्यम् ॥१॥ इत्यनुज्ञां तया लब्ध्वा जपेत्पंचाक्षरीं शिवाम् ॥ सतार षट्स्थलब्रह्मरूपिणीं श्रीषडक्षरीम् ॥२॥ शिवरहस्ये ॥ देव्युवाच ॥ भगवन् देवदेवेश सर्वज्ञ परमेश्वर ॥ पंचाक्षरस्य माहात्म्यं श्रोतुमिच्छामि तत्वतः ॥३॥

ईश्वर उवाच—पंचाक्षरस्य माहात्म्यं वर्षकोटिशतैरपि ॥ न शक

---

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो, आतां ह्यापुढें पंचाक्षरमंत्राच्या माहात्म्याचे प्रकरणास आरंभ करितों. ह्याप्रमाणें इष्टलिंग आपले शरीरावर धारण करणारा मनुष्य, आपले शरीरास विभूति लावून, आपले सर्व अंगावर रुद्राक्ष धारण करून, नेहमीं लिंगपूजन करण्यांत निमग्न झाला; ह्मणजे त्यास ॐकारासहित शिवपंचाक्षरी मंत्राची जरूर लागते, ह्यासाठीं आतां पंचक्षरीमाहात्म्यस्थल ह्मणून एक स्थल आहे तें सांगतों. (१) उत्तरवातुलांत ह्मटलें आहे कीं, ॐकारसहित "नमः शिवाय" हा शिवपंचाक्षरी मंत्र षट्स्थलांचें ब्रह्मस्वरूप आहे, हा सर्व मंत्रांची मुख्य देवता आहे, हा मंत्र मनुष्यांची प्रत्यक्ष माता आहे, हा षट्स्थलांस भक्ति आणि प्रसाद ह्यांची प्राप्ति करून देणारा आहे. अशा या शिवपंचाक्षरीमंत्रा, तुला नमस्कार असो. (२) अशा तऱ्हेनें शिवपंचाक्षरीमंत्राची अगोदर प्रार्थना करून, त्याची आज्ञा घेऊन, मग कल्याणकारक अशा त्या शिवपंचाक्षरीमंत्राचा जप करावा. तो शिवपंचाक्षरीमंत्र ॐकारासहित असतो, षट्स्थलांस तो मंत्र परब्रह्मस्वरूप आहे. ॐकारासुद्धां तो मंत्र षडक्षरांचा होतो. (३) शिवरहस्यांत पार्वतीनें ह्मटलें आहे कीं, हे भगवन्, तुह्मी सर्व देवांचे मुख्य देव आहां, तुह्मी सर्वज्ञ आहां, तुह्मांला परमेश्वर असें म्हणतात; आपल्यापासून मी शिवपंचाक्षरी मंत्राचें माहात्म्य यथार्थ रीतीनें ऐकावयास इच्छितें, तर आपण कृपा करून तें मला सांगा.

शिव म्हणतात–(४) पार्वती, शिवपंचाक्षरी मंत्राचें माहात्म्य यथार्थ रीतीनें सविस्तर सांगूं ह्मटलें, तर शंभरकोटि वर्षें देखील पुरणार नाहींत; ह्यासाठीं मी तुला



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कथितुं देवि तस्मात्संक्षेपतः शृणु ॥४॥ मंत्रः सुखमुखोच्चार्यस्त्वशेषार्थप्रसाधकः ॥ तद्बीजं सर्वविद्यानामाद्यं मंत्रं षडक्षरम् ॥५॥ अतिसूक्ष्मं महार्थं च ज्ञेयं तद्वटबीजवत् ॥ ज्ञेयः स त्रिगुणातीतः सर्वगः सर्वतः प्रभुः ॥६॥ ओमित्येकाक्षरे मन्त्रे स्थितः सन्निहितः शिवः ॥ मंत्रे षडक्षरे सूक्ष्मे पंचाक्षरतनुः शिवः ॥७॥ वातुले ॥ शिवमेकं विजानीयान्मंत्रमूर्तिः परः शिवः ॥ नादः किरीटमित्युक्तं विंदुवक्त्रमुदाहृतम् ॥८॥ अकारदेहमित्युक्तं द्वयं शृंगौ भुजौ तथा ॥ वन्हिपादद्वयं विद्यान्मन्त्रमूर्तिरुदाहृतः ॥९॥ शिवरहस्ये ॥ वेदे शिवागमे चायमुभयत्र षडक्षरः ॥ मंत्रः स्थितः सदा मुख्यो लोके पंचाक्षरः स्मृतः ॥१०॥ गुह्याद्गुह्यतरं साक्षान्मोक्षज्ञानमनुत्तमम् ॥ प्रमाणं वेदवाक्यत्वात्परमा-

---

संक्षिप्तरीतीनें सांगतों तें तूं ऐकून घे. (५) हा शिवपंचाक्षरी मंत्र सहजरीतीनें आनंदानें तोंडानें ह्मणत जावा; हा मंत्र आपलें सर्व इच्छित परिपूर्ण करणारा आहे; हा मंत्र सर्व विद्यांचें मूलबीज आहे; ह्यामंत्रास षडक्षरीमंत्र असें ह्मणतात. (६) हा मंत्र अतिशय लहान दिसतो खरा, तरी त्याचा उपयोग फारच मोठा आहे; हा मंत्र वडाच्या वियासारखा समजावा वडाचें बीं लहान असतें, त्यापासून मोठें थोरलें वडाचें झाड उगवतें. अशीच ह्या मंत्राची स्थिति आहे. हा शिवपंचाक्षरीमंत्र सत्वगुण, रजोगुण, व तमोगुण ह्यांच्या पलीकडे आहे; ह्याची व्याप्ति सर्वत्र आहे, हा सर्व ठिकाणीं व्यापलेला असून समर्थ आहे. (७) त्या षडक्षरी शिवमंत्रांतील नुसतें पहिलेंच अक्षर ॐ असें उच्चारल्या बरोबर शिव अगदीं जवळ होतो (शिवाची प्राप्ति लागलीच होते); षडक्षरीमंत्र फार महत्वाचा आहे; शिव हा पंचाक्षरमंत्रस्वरूप आहे. (८) वातुलांत ह्मटलें आहे कीं, शिव हाच एक देव जाणून घ्यावयासारखा आहे, परशिव हा मंत्रस्वरूप आहे; नादास किरीट असें ह्मटलें असून बिंदूस मुख असें ह्मटलें आहे. (९) आकारास देह असें ह्मणतात, दोन हात हीं दोन शिंगें होत, वन्हि हा त्याचे दोन पाय आहेत; सारांश ह्या पंचाक्षरी मंत्रास मूर्तिमंत श्रीशंकर ह्मणण्यास हरकत नाहीं. (पंचाक्षरीमंत्र हा प्रत्यक्ष शंकर आहे.) (१०) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, वेदांत आणि शिवागमांत दोन्हीही जागीं हा षडक्षरमंत्र सांगितलेला आहे. लोकांत जितके कांहीं मंत्र असतील, त्या सर्वांत हा मंत्र मुख्य आहे. तसाच शिवपंचाक्षरी मंत्र ही प्रसिद्ध आहे. (११) षडक्षरीमंत्र हा सर्व महत्वाच्या वस्तूंत अति महत्वाची वस्तु असून, ही वस्तु जपून ठेवण्यासारखी आहे. या मंत्राचे साधनानें उत्तम प्रकारचा मोक्ष मिळतो, हा मंत्र वेदांत सांगितलेला अस-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

र्थप्रकाशकः ॥११॥ यजुर्वेदे ॥ ओमित्येकाक्षरं ब्रह्म नमःशिवायेत्य
यत ॥१२॥ शिवरहस्ये ॥ ॐकारपूर्वको मंत्रः पंचाक्षरमयः परः ॥ शि
वागमेषु वेदेषु षडक्षर इति स्मृतः ॥१३॥ ॐकारादि यकारान्तं
जप्यात्षडक्षरम् ॥ सदैव तं च षड्वर्णो षड्बीजं तत्वषड्युतम् ॥१
ऋग्वेदः स्यान्नकारश्च यजुर्वेदो मकारकः ॥ शिकारः सामवेदश्च
कारोथर्वणस्तथा ॥ यकार इतिहासश्च सर्वशास्त्रमयो भवेत् ॥१
नकारः पृथिवी ज्ञेयो मकारस्तोयमुच्यते ॥ शिकारोऽग्निरिति प्रो
वाकारो वायुरुच्यते ॥ यकारो गगनं प्रोक्तं पंचभूतात्मकं स्मृतम् ॥१
प्रणवेनैकवर्णेन परब्रह्मप्रकाशिते ॥ अद्वितीयं परानंदं शिवाख्यं नि
पंचकम् ॥१७॥ प्रणवेनैव मंत्रेण बोध्यते निष्कलः शिवः ॥ पंचाक्ष
मंत्रेण पंचब्रह्मतनुस्तथा ॥१८॥ निष्कलस्सन्निराकारस्सकलो विश्व

---

त्यामुळें महत्वाचा मानला गेला आहे, व ह्यामंत्राच्या साधनानें परमार्थाचें य
ज्ञान होतें. (१२) यजुर्वेदांत ह्मटलें आहे कीं, ॐ हें एक अक्षर आहे, तें पर
स्वरूप आहे; त्यापासूनच "नमःशिवाय" असा शिवपंचाक्षरी मंत्र झाला. (१
शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, ॐकार हें अक्षर प्रथमारंभीं असलेला, नमःशि
हा शिवपंचाक्षरी मंत्र फारच श्रेष्ठ आहे; शिवागमांत आणि सर्व वेदांत ह्या मंत्रा
षडक्षरी मंत्र असें ह्मणतात (१४) ॐकारापासून यकारापर्यंत ह्या मंत्राची
अक्षरें होतात. हा षडक्षरी मंत्र नेहमीं जपावा; तो मंत्र देवतास्वरूप आहे,
सहा अक्षरें आहेत, तशींच त्या मंत्रांत सहा बीजें आणि सहा तत्वें आहेत. (१
"नमःशिवाय" हा शिवपंचाक्षरी मंत्र आहे; ह्यांतील नकार हा ऋग्वेदस्वरूप आ
मकार हा यजुर्वेदस्वरूप आहे, आणि शिकार हा सामवेदस्वरूप आहे, वाकार
अथर्वणवेदस्वरूप आहे, आणि यकार हा इतिहास आणि सर्व शास्त्रस्वरूप आ
(१६) नकारास पृथ्वी असें ह्मणावें, मकारास पाणी असें ह्मणावें, शिकारास
ह्मणतात, वाकारास वायु असें ह्मणतात, आणि यकारास आकाश असें ह्मणता
सारांश, हा शिवपंचाक्षरी मंत्र पंचमहाभूतात्मक आहे. (१७) एका ॐकारानें
ब्रह्मस्वरूप कळविलें असें होतें, तें परब्रह्मस्वरूप जगांत श्रेष्ठ आहे, त्याची बरो
करील असा जगांत दुसरा पदार्थ नाहीं. तें अतिशय आनंदी आहे, त्यास शिव
नांव आहे, त्यास प्रपंच नाहीं, तें निष्प्रपंच आहे. (१८) फक्त एका ॐकार
त्राच्या सहायानेंच निष्प्रपंच अशा शिवाचें यथार्थ ज्ञान होतें. कां तर, पंचाक्ष
मन्त्र हा पंचब्रह्मस्वरूप आहे. ( पंचाक्षरीमन्त्रानें पंचब्रह्मस्वरूप असणाऱ्या शिवाचें
होतें. (१९) तो परमेश्वर श्रीशिव निष्कल ( निष्प्रपंच ) आहे, निराकार आहे,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

र्तिकः ॥ उभयात्मा शिवो मंत्रः षडक्षरमयः स्थितः ॥१९॥ वातुले ॥ वक्ष्येऽहं ते महासेन शिवमंत्रपरायण ॥ सप्तकोटिषु मंत्रेषु मुख्यं प्रणवपंचकम् ॥२०॥ कामिके ॥ सप्तकोटिमहामंत्रा उपमंत्रास्त्वनेकशः॥ पंचाक्षर्यां प्रलीयन्ते पुनस्तत्र विनिर्गताः ॥२१॥ अस्मिन् वेदाश्च शास्त्राणि शिवपंचाक्षरे स्थिताः ॥ एकोऽहं संस्थितो देवि द्वितीयो नास्ति कुत्रचित् ॥२२॥ यस्मात्पंचाक्षरी विद्या शतरुद्रीयमध्यगा ॥ पावनी सर्वभूतानां रुद्रैकादशिनी तथा ॥२३॥ विद्यासु श्रुतिरुत्कृष्टा तत्रैकादशिनी श्रुतौ ॥ तत्र पंचाक्षरी तस्यां शिव इत्यक्षरद्वयम् ॥२४॥ शिवज्ञानविद्यायाम् ॥ अनेन सदृशं जाप्यं नास्ति नास्ति श्रुतौ स्मृतौ ॥ एषा पंचाक्षरी विद्या सर्वश्रुतिशिरोगता ॥२५॥ शिवतत्वात्परं नास्ति यथा तत्वान्तरं महत् ॥ तथा पंचाक्षरीमंत्रान्नास्ति मन्त्रांतरं महत् ॥२६॥ ज्ञाते पञ्चाक्षरीमन्त्रे किं वा मन्त्रान्तरैः फलम् ॥ ज्ञाते शिवे जगन्मूले

---

सप्रपंच असून त्रैलोक्यस्वरूप आहे. असा हा शिव दोन्ही स्वरूपाचा आहे; तो षडक्षरमन्त्रस्वरूपही आहे. (२०) वातुलांत ह्मटलें आहे कीं, हे कार्तिकस्वामी, तूं शिवमन्त्राचा जप करण्यांत नेहमीं गुंतलेला असतोस; हा शिवपंचाक्षरीमन्त्र त्याचे आरंभीं ॐकाराचा उच्चार केल्यानें षडक्षरी होतो. निरनिराळ्या प्रकारचे सात कोटि महामन्त्र आहेत, त्या सर्वांत हा मन्त्र मुख्य आहे. (२१) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं, सात कोटि महामन्त्र आहेत, आणि उपमन्त्र तर असंख्य आहेत; ते सर्व पंचाक्षरीमन्त्रांत लय पावतात; आणि पुनः तेथूनच उत्पन्न होतात. (२२) ह्या शिवपंचाक्षरीमन्त्रांत सर्व वेद आणि सर्व शास्त्रें राहतात. शिव ह्मणतात—पार्वती, तुला फार काय सांगावें? ह्या सर्व जगाचा मी एक परमेश्वर आहें, दुसरा कोणी नाहीं; तो मी देखील त्या शिवपंचाक्षरीमन्त्रांतच राहतो, दुसरीकडे कोठें रहात नाहीं. (२३) ह्यामुळेंच शतरुद्रीयमन्त्रांत असणारी ही शिवपंचाक्षरीविद्या सर्व प्राणिमात्रांस पवित्र करणारी झाली आहे. रुद्राची एकादशिनीही तशीच लोकांस पवित्र करिते. (२४) सर्व विद्यांत श्रुति (वेद) श्रेष्ठ आहे, त्या श्रुतींत (वेदांत) रुद्रैकादशिनी श्रेष्ठ आहे. त्या रुद्रैकादशिनीपेक्षां शिवपंचाक्षरीमन्त्र श्रेष्ठ आहे. त्या शिवपंचाक्षरीमन्त्रापेक्षां 'शिव' हीं दोनच अक्षरें उच्चारलीं तरी तीं श्रेष्ठ आहेत. (२५) शिवज्ञानविद्येंत ह्मटलें आहे कीं, ह्या शिवपंचाक्षरी मन्त्रासारखा जपावयास उत्तम मन्त्र ह्या श्रुतींत (वेदांत) आणि स्मृतींत नाहींच नाहीं. ही शिवपंचाक्षरी विद्या सर्व वेदांत अग्रगण्य मानण्यासारखी आहे. (२६) शिवतत्वापेक्षां दुसरें कोणतेंही तत्व जसें श्रेष्ठ नाहीं, तसाच शिवपंचाक्षरी मन्त्रापेक्षां दुसरा कोणताही मन्त्र श्रेष्ठ नाहीं. (२७) शिवपंचाक्षरीमंत्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

किं फलं देवतान्तरैः ॥२७॥ सप्तकोटिषु मन्त्रेषु मन्त्रः पंचाक्षरो
हान् ॥ ब्रह्मविष्ण्वादिदेवेषु यथा शंभुर्महत्तरः ॥२८॥ सूक्ष्मागमे ॥
चाक्षरीप्रभावेन लोका देवा महर्षयः ॥ तिष्ठन्ति शाश्वता धर्मा
दास्सर्वमिदं जगत् ॥२९॥ कारणागमे ॥ मूलं विद्या शिवश्चैव
पञ्चाक्षरस्तथा ॥ एतानि नामधेयानि कीर्तितानि महामनोः ॥३०॥
तंगपारमेश्वरे ॥ अनेन मूलमंत्रेण शिवलिंगं प्रपूजयेत् ॥ नित्यं नि
मसंपन्नः प्रयतात्मा शिवात्मकः ॥३१॥ पंचाक्षरीं समुच्चार्य पुष्पं लि
विनिक्षिपेत् ॥ य स्तस्य वाजपेयानां सहस्रफलमिष्यते ॥३२॥ अग्निहो
त्रयो वेदा यज्ञाश्च बहुदक्षिणाः ॥ पंचाक्षरजपस्यैते कोट्यंशेनापि
समाः ॥३३॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ उपमन्युः पुरा योगी मंत्रेण ज्ञानसिद्धि

---

एक वेळ यथार्थ रीतीनें समजल्यावर, दुसरे आणखी मन्त्र समजून घेऊन काय
रावयाचें आहे? त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. शिव हा त्रैलोक्याचा मूलपुरुष अ
त्याचें यथार्थ ज्ञान झाल्यावर दुसरे देव घेऊन काय करावयाचें आहे? (२८)
ब्रह्मदेव, विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांत श्रीशंकर हा मुख्य देव आहे; तसाच स
कोटि मन्त्रांमध्यें शिवपंचाक्षरी मन्त्र हाच एक श्रेष्ठ मन्त्र आहे. त्याची बरो
करणारा जगांत दुसरा मन्त्र नाहीं. (२९) सूक्ष्मागमांत म्हटलें आहे कीं, पंचाक्ष
मन्त्राच्या सामर्थ्यानें हे सर्व लोक, हे सर्व देव, हे सर्व ऋषीश्वर, अनंतकाळपर्यंत
हतात; सर्व धर्म, सर्व वेद, फार काय परंतु, हें सर्व त्रैलोक्य देखील पंचाक्षरी
न्त्राच्या सामर्थ्यानें चालतें. (३०) कारणागमांत म्हटलें आहे कीं, विद्या, मूल, शि
पंचाक्षर, सूत्र, अशीं हीं शिवपंचाक्षरी महामन्त्राचीं नांवें होत. (३१) मतंगपार
श्वरांत म्हटलें आहे कीं, ह्या शिवपंचाक्षरी मूलमन्त्रानें शिवलिंगाची पूजा करा
शिवधर्मसम्पन्न, व इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवणारा, शिवस्वरूपी शिवभक्त, नेह
मूलमन्त्रानें शिवलिंगाची पूजा करितो. (३२) जो कोणी मनुष्य पंचाक्षरीमन्त्रा
उच्चार करून शिवलिंगावर पुष्प वहातो, त्या मनुष्याला एक हजार वाजपेय यज्ञ
त्याचें श्रेय मिळतें. (३३) अग्निहोत्र घेतलें, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद या तीनं
वेदांचें पठण केलें, आणि पुष्कळ दक्षिणा देऊन अनेक यज्ञ केले, तरी हे सर्व
कार शिवपंचाक्षरी मन्त्राच्या एक कोटि हिश्याची देखील बरोवरी करूं शकत न
हींत. इतकी शिवपंचाक्षरीमन्त्राची योग्यता आहे. (३४) ब्रम्हाण्डपुराणांत म्हटलें आ
कीं, पूर्वी उपमन्यु नांवाचा योगी शिवपंचाक्षरीमन्त्रामुळें शिवज्ञानाची सिद्धि पाव
(त्यास शिवज्ञान झालें); आणि परमेश्वराच्या कृपेमुळें त्याचे अंगीं शैवशास्त्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मान् ॥ लब्धवान् परमेशानाच्छैवशास्त्रप्रवक्तृताम् ॥३४॥ विष्णुपुराणे॥ वसिष्ठवामदेवाद्या मुनयो मुक्तकिल्बिषाः ॥ मंत्रेण ज्ञानसंसिद्धा महातेजस्विनोऽभवन् ॥३५॥ स्कन्दपुराणे ॥ पुरा सानंदयोगींद्रः शिवज्ञानपरायणः ॥ पंचाक्षरं समुच्चार्य नारकानुदतारयत् ॥३६॥ सिद्ध्या पंचाक्षरस्यास्य शतानंदः परो मुनिः ॥ नरकं स्वर्गमकरोदंगिरस्यापि पापिनः ॥३७॥ प्राहोंनमःशिवायेति मन्त्रराजं षडक्षरम् ॥ तथैव नरकः साक्षात्स्वर्गलोकेऽभवत्ततः ॥३८॥ स्कन्दपुराणे ॥ मम पंचाक्षरी मन्त्रः पाठमात्रेण सिद्धिदः ॥ सर्वलोकवशीकारः सौभाग्यज्ञानवर्द्धनः ॥३९॥ शिवधर्मशास्त्रे ॥ अंत्यजो वाऽधमो वापि मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥ जपेत्पंचाक्षरीं विद्यां जपतः प्राप्नुयाच्छिवम् ॥४०॥ लिंगपुराणोक्तशिवधर्मशास्त्रे ॥ अग्रजो वांत्यजो वापि मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥

---

गावयाची योग्यता आली. (३५) विष्णुपुराणांत ह्मटलें आहे कीं, वसिष्ठ, वामदेव, वगैरे मुख्य मुख्य ऋषि शिवपंचाक्षरीमंत्राच्या सामर्थ्यानें सर्व पातकांपासून मुक्त होऊन, शिवज्ञान यथार्थ रीतीनें त्यांस झाल्यामुळें, ते मोठे तेजस्वी झाले. (३६) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, पूर्वी सानंद नांवाचा एक शिवयोगीश्वर होऊन गेला. तो शिवज्ञानांत फार पारंगत होता; त्यानें पंचाक्षरीमंत्राचा उच्चार करून अनेक पापी जीवांचा उद्धार केला. (३७) शतानंद नांवाचा दुसरा एक मुनीश्वर होता; त्यास पंचाक्षरीमंत्राची सिद्धि झाली असल्यामुळें, त्यानें कृपाळुपणानें, अंगिर नांवाचा कोणी एक जण अतिशय पातकी मनुष्य नरकांत अनेक प्रकारचीं दुःखें भोगीत होता त्यास तेथले तेथेंच स्वर्गांत इतर देवांस जसें सुख भोगावयास मिळतें. तसें मिळेल असें केलें. (३८) तो शतानंद ऋषि त्या अंगिरास सुख लागावें ह्या हेतूनें नरकाजवळ जाऊन ॐनमः शिवाय असा षडक्षरांचा श्रेष्ठ मंत्र ह्मणूं लागला, त्या मंत्राच्या सामर्थ्यानें लागलाच तो नरक साक्षात् स्वर्गलोक झाला. (३९) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, माझा हा शिवपंचाक्षरीमंत्र तोंडानें उच्चारल्या बरोबर सिद्धीस जातो (पूर्ण होतो). तो मंत्र सर्व लोकांस अनुकूल करून देतो, व मंत्र सौभाग्याची आणि ज्ञानाचीं वृद्धि करितो. (४०) शिवधर्मशास्त्रांत ह्मटलें आहे कीं, अत्यंज (महार मांग वगैरे) असो, नीच असो, अतिशय अडाणी असो किंवा अतिशय शहाणा असो; तो जर शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करील, तर त्यास तत्काळ श्रीशिवाचें दर्शन होईल. (४१) लिंगपुराणांत सांगितलेल्या शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, मनुष्य ब्राह्मण जातीचा असो,किंवा महार मांग ह्या नीच जातींतील असो,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जपेत्पंचाक्षरीं नित्यं स रुद्रो नात्र संशयः ॥४१॥ धर्मसंहितायाम् ताडितोऽपि महातेजा न चचाल शिवं स्मरन् ॥ शिवं नमः शिवायेति प्राह गंभीरया गिरा ॥४२॥ पिशाचास्ते ततः श्रुत्वा मुनेः पंचाक्षरं तथा ॥ पैशाचं च तदा त्यक्त्वा वपुरास्थाय मानवम् ॥४३॥ प्रणम्य शिरसा जग्मुरुपमन्युं महाद्युतिम् ॥ प्रोचुर्नः पाहि पाहीति प्रणे मुनौं महामुने ॥४४॥ कूर्मपुराणे ॥ ब्रह्मादीनां च गोविंदो जगत्सृष्ट्यर्थं कारणम् ॥ मन्त्रस्य चैव माहात्म्यात्सामर्थ्यमुपजायते ॥४५॥ लैंगे वृत्तम् ॥ अगस्त्यरामादिभिरादृतत्वादमुष्य मन्त्रस्य च वैदिकत्वात् परस्य तत्वस्य च वाचकत्वान्नमःशिवायेति सदा जपध्वम् ॥४६॥ वातुले ॥ लक्षणं क्रमतो ज्ञेयं मनो मननलक्षणम् ॥ दृग्विलोकनचिन्हं स्याद्वाग्वचो मातृलक्षणम् ॥४७॥ ताल्वोष्ठरसनायोगलक्षणं वपुरुच्य

---

अडाणी असो, किंवा मोठा विद्वान् असो; तो जर निरंतर शिवपंचाक्षरी मंत्र जपणारा असेल, तर तो प्रत्यक्ष श्रीशंकरच आहे; ह्यांत संशय नाहीं. (४२) धर्मसंहितेंत ह्मटलें आहे कीं, तो महात्मा तेथें स्वस्थपणानें शिवपंचाक्षरीमंत्राचा जप करीत बसला होता त्यास पुष्कळ मारिलें तरी तो तेथून काडीमात्र हालला नाहीं; नमःशिवाय नमःशिवाय असा शिवपंचाक्षरीमंत्र मोठमोठ्यानें ह्मणूं लागला. (४३) त्या पिशाचांनीं त्या मुनीश्वरानें वारंवार वारंवार उच्चारलेला शिवपंचाक्षरीमंत्र ऐकिला; व आपलें पिशाचत्व टाकून देऊन त्यांनीं मनुष्याचें रूप घेतलें; (४४) व डोकी लववून त्यांनीं त्या अत्यंत तेजस्वी अशा उपमन्यु मुनीस नमस्कार केला, व ते त्यास शरण आले व वारंवार त्यास नमस्कार करून, आमचें रक्षण कर आमचें रक्षण कर, असें ह्मणूं लागले. (४५) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मादिक देवांस आणि प्रत्यक्ष श्रीविष्णूस देखील ह्या शिवपंचाक्षरीमंत्राच्या सामर्थ्यानें सृष्टि उत्पन्न करण्याचें ज्ञान प्राप्त होतें ( येतें ); एरव्हीं होत नाहीं. (४६) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, हा शिवपंचाक्षरी मंत्र अगस्त्यऋषि आणि दाशरथीराम मनापासून जपतात, हा मंत्र वेदांस अनुसरून असून श्रेष्ठतत्व आहे, तोंडानें सहज रीतीनें जपतां येण्यासारखा सोपा आहे. ह्यासाठीं "नमःशिवाय" हा मंत्र प्राणिमात्रहो, तुह्मी नेहमीं जपत जा. (४७) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, मनन करणें हें मनाचें लक्षण आहे, विलोकन करणें ( पहाणें ) हें दृष्टीचें लक्षण आहे; तोंडानें शब्दाचा उच्चार करणें हें वाचेचें लक्षण आहे. हीं इंद्रियें त्या त्या लक्षणांवरून ओळखावीं. हीं त्या इंद्रियांचीं मुख्य लक्षणें होत. (४८) ताळु, ओंठ, जीभ, ह्यांचा परस्पर संबंध असणें हें शरीराचें लक्षण आहे असें मानतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ते ॥ मानुषी चाक्षुषी जाप्या वाचिकी वपुषी परा ॥ पश्यंती मध्यमा चेति वैखरीत्युच्यते क्रमात् ॥४८॥ शिवरहस्ये ॥ एतन्नामावलंबेन मन्त्रः पंचाक्षरः स्मृतः ॥ यस्मादतः सदा जाप्यो मोक्षकांक्षिभिरादरात् ॥४९॥ नमः शब्दं वदेत्पूर्वं शिवायेति ततः परम् ॥ मन्त्रः पंचाक्षरो ह्येषः सर्वश्रुतिशिरोग्रगः ॥५०॥ यथाऽनादिर्महादेवः सिद्धः संसारमोचकः तथा पंचाक्षरो मन्त्रः संसारक्षयकारकः ॥५१॥ ब्रह्मोत्तरखण्डे ॥ भवपाशनिबद्धानां देहिनां हितकाम्यया ॥ प्राहोंनमः शिवायेति मन्त्रमाद्यं शिवः स्वयम् ॥५२॥ तत्रादौ जपयज्ञस्य मूलं स्वस्त्ययनं महत्॥ शैवं षडक्षरं दिव्यं मन्त्रमाहुर्महर्षयः ॥५३॥ सौरसंहितायाम् ॥ सर्वान् देवान् परित्यज्य यजेत्पंचास्यमीश्वरम् ॥ सर्वान्मन्त्रान् परित्यज्य जपेत्पंचाक्षरीं सदा ॥५४॥ मानवपुराणे ॥ ॐकारः सर्वमन्त्राणामुत्तमः प-

---

मानुषी, चाक्षुषी, जाप्या, वाचिकी, वपुषी, परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी असे क्रमाक्रमानें शक्तींचे भेद आहेत. (४९) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, ह्या वर सांगितलेल्या शक्तींच्या नांवांचा उच्चार (स्वीकार) केला ह्मणजे त्यास पंचाक्षरीजप असें ह्मणतात. ह्यासाठीं ज्या कोणांस आपणांस मोक्षप्राप्ति व्हावी असें वाटत असेल, त्यांनीं शिवपंचाक्षरीमंत्र आवश्य अवश्य पठन करावा. (५०) अगोदर "नमः" असा शब्द उच्चारावा, त्यानंतर "शिवाय" असा शब्द उच्चारावा. ह्यालाच शिवपंचाक्षरीमंत्र असें ह्मणतात. हा मंत्र सर्व वेदांत मुख्य मानलेला आहे. (५१) जसा श्रीमहादेव हा अनादिकालापासून आहे, तो स्वतःसिद्ध असून प्राणिमात्रांस संसारसमुद्रांतून तारणारा आहे तसाच शिवपंचाक्षरीमंत्रही संसारांतील दुःखांचा नाश करणारा आहे. (५२) ब्रह्मोत्तरखंडांत ह्मटलें आहे कीं, संसाररूप पाशांत अडकून पडलेल्या प्राणीमात्रांचें कल्याण करावयाच्या इच्छेनें स्वतः श्रीशंकरांनींच ॐ नमः शिवाय ह्या षडक्षरीमंत्राचें रूप घेतलें आहे; हा मंत्र पृथ्वीवरील सर्व मंत्रांत मुख्य मंत्र मानला आहे. (५३) मोठे मोठे ऋषीश्वर असें सांगतात कीं, शिवषडक्षरीमंत्र हा फारच पवित्र असून जप यज्ञाचें मूळ आहे, तें मोठें मंगलकृत्य आहे. षडक्षरीमंत्राची योग्यता फारच मोठी आहे. (५४) सौरसंहितेंत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें भजणेंच झालें तर इतर सर्व देव सोडून देऊन पांच मुखें असणाऱ्या श्रीशिवालाच भजावें तसेंच नेहमीं मंत्र जपणें झालें तर बाकीचे सर्व मंत्र सोडून देऊन एक शिवपंचाक्षरी मंत्रच जपावा. (५५) ॐकार (प्रणव) हा सर्व मंत्रांत उत्तम मंत्र आहे असें ह्मटलें आहे. नावेच्या साधनानें जसें समुद्रांस तरून जातां येतें, तसें ॐकाररूपी नावेच्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रिकीर्तितः ॥ ॐकारेण प्लवेनैव संसाराब्धिं तरिष्यति ॥५५॥ ब्रह्मोत्तरखण्डे ॥ महापातकविच्छित्यै शिव इत्यक्षरद्वयम् ॥ अलं नमस्क्रियया भूयो मुक्तये कल्पितो मनुः ॥५६॥ शिवधर्मशास्त्रे ॥ यः स्वपन् प्रातरुत्थो वा प्राणान्ते वापि संपठेत् ॥ भक्त्योंनमःशिवायेति सगच्छेत्परमां गतिम् ॥५७॥

ईश्वर उवाच—आश्रित्य परमां विद्यां हृद्यां पंचाक्षरीं मम ॥ भक्ताश्च परमात्मानो मुच्यंते कलिजा नराः ॥५८॥ जगतिच्छंदे ॥ वृत्तम् नमः शिवायेति पुनर्मुहुर्मुहुर्नमः शिवायेति पुनःपुनर्मुहुः ॥ नमः शिवायेति पुनः पुनर्मुहुर्गणेश्वरो मन्त्रमयो पठेच्च सः ॥५९॥ हर हर इति शब्दमादितो वै मुहुरभिधाय मुनींद्रवृंदवंद्यः ॥ अपठदखिलमेघघोषसाम्यं सकलहिताय नमःशिवाय मन्त्रम् ॥६०॥ मयैव कारितं सर्वं नरकानां विमोक्षणम् ॥ मम पंचाक्षरं श्रुत्वा मुक्ता यस्मान्महा

---

साधनानें संसारसमुद्रांतून तरतां येतें. (५६) ब्रह्मोत्तरखंडांत ह्मटलें आहे कीं, "शिव अशीं हीं दोन अक्षरें उच्चारलीं तरी तीं पातकांचा नाश करण्यास पुरे आहेत. पुन त्या शिवास नमस्कार करणें, शिवपंचाक्षरीमंत्राचा जप करणें हीं मोक्षप्राप्ति करून देण्यास समर्थ आहेत. (५७) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, जो कोणी मनुष्य निजलेला असतां सकाळीं उठला असतां किंवा त्याची अंतकाळाची ( मरणाची ) वेळ आली तरी देखील भक्तीनें " ॐनमः शिवाय " असा शिवषडक्षरीमंत्र जपत असेल तर तो उत्तम गतीस जाईल.

शिव ह्मणतातः–(५८) कलियुगांत जन्मलेले जे कोणी मनुष्य श्रेष्ठ आणि मला मनापासून आवडणारी अशा शिवपंचाक्षरी विद्येचा आश्रय करून तिचा जप करतील ते पातकापासून मुक्त होऊन उद्धरून जातील. ते माझे भक्त महात्मे समजावे. (५९) जगतिच्छंदांत ह्मटलें आहे कीं, वरचेवर वरचेवर नमः शिवाय, नमः शिवाय, नमः शिवाय असा शिवपंचाक्षरीमंत्राचा जप गणेश्वर असेल तो करीत असतो. (६०) जो कोणी शिवभक्त आहे तो सर्वं ऋषिश्वरांस देखील नमस्कार करण्यास योग्य आहे तो हर हर असा अगोदर शब्द करून मोठ्यानें मेघगर्जना झाल्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांचें कल्याण करावयाच्या इच्छेनें "नमः शिवाय" असा शिवपंचाक्षरीमन्त्राचा जप करीत असतो. (६१) मीच स्वतः नरकाचे दरवाजे उघडून त्यांतून सर्व प्राणिमात्रांची त्या दुःखांतून सुटका केली. कां तर माझ्या शिवपंचाक्षरीमन्त्राचा घोष त्या नरकांत पडलेल्या जीवांच्या कानीं पडल्यामुळें, त्यांची त्या भयंकर दुःखांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भयात् ॥६१॥ ब्रह्मोत्तरखण्डे ॥ सर्वज्ञः परिपूर्णश्च सच्चिदानंदलक्षणः ॥ स शिवो यत्र रमते मंत्रे पंचाक्षरे शुभे ॥६२॥ नमस्कारेण जीवत्वं शिवेति परमात्मनि ॥ आयेत्यैक्यं ततो मन्त्रः परब्रह्ममयो ह्यसौ ॥ स शिवो ह्यत्र रमते मंत्रे पंचाक्षरे शुभे ॥६३॥ शिवज्ञानविद्यायाम् ॥ वृत्तम् ॥ अंगं नमः पदमिदं शिव एष लिंगं संबन्धमायपदमेतदुदीरितं स्यात् ॥ लिंगांगसंगमपदत्रयबोधनार्थं मन्त्रोऽयमाह निगमागममंत्रराजः ॥६४॥ शिवरहस्ये ॥ मंत्रेण देवता स्थाप्या मंत्रेण यजनादयः ॥ स्नानं मंत्रेण कर्तव्यं मंत्रेण हुततर्पणम् ॥६५॥ स्कान्दे ॥ कर्षणादिक्रियाः सर्वा मंत्रेणैव प्रकीर्तिताः ॥ तस्मात्तस्य क्रियार्थत्त्वाद्विना

---

सुटका झाली. (६२) ब्रह्मोतरखंडांत असें ह्मटलें आहे कीं, शिव परमात्मा हा सर्वज्ञ आहे, परिपूर्ण आहे, सत्, चित्, आणि आनंद हें त्याचें लक्षण आहे, तो शिव नेहमीं जेथें सुखानें कालक्रमण करितो तेंच स्थान शिवपंचाक्षरमन्त्र हा आहे. (शिवपंचाक्षरीमन्त्रांत शिव नेहमीं राहतो. (६३) "नमः शिवाय" हा शिवपंचाक्षरीमन्त्र आहे, ह्यांत नमः, शिव आणि आय अशीं तीन वेगवेगळीं पदें केलीं; तर नमः ह्याचा अर्थ जीवपणा असा होतो, शिव ह्याचा अर्थ परमात्मा असा होतो, आणि आय ह्या शब्दाचा अर्थ जीवाचें परमात्म्याशीं ऐक्य असा होतो; त्यामुळें हा शिवपंचाक्षरीमन्त्र परब्रह्मस्वरूप आहे, हें उघड झालें. तो शिव जेथें सुखानें कालक्रमण करितो तेंच स्थळ शिवपंचाक्षरीमन्त्र हा होय; तो मन्त्र कल्याणकारक आहे. (६४) शिवज्ञानविद्येंत ह्मटलें आहे कीं, "नमः शिवाय" ह्या शिवपंचाक्षरी मन्त्रांतील नमः ह्या पदाचा (शब्दाचा) अर्थ अंग असा करावा, शिव शब्दाचा अर्थ लिंग असा करावा, आणि आय ह्या शब्दाचा अर्थ अंगाचा लिंगाशीं संबंध असा करावा, असें ह्मणतात. लिंग, अंग, आणि ह्या दोहोंचा परस्पर संबंध हीं तीन पदें सुचविण्या करितांच हा शिवपंचाक्षरीमन्त्र झाला आहे असें ह्मणतात. ह्या शिवपंचाक्षरीमन्त्रास वेदांत आणि शिवागमांत मन्त्रराज असें नांव पडलें आहे. (६५) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, मन्त्रानेंच देवतांचें स्थापन करावें लागतें, मन्त्रांनींच यज्ञयाग वगैरे कर्में करावीं लागतत, मन्त्रानेंच स्नान करावें लागतें, आणि मन्त्रानेंच होम हवन तर्पण वगैरे करावीं लागतात; मन्त्राच्या साह्यावांचून कांहीं होत नाहीं. (६६) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शेत पेरणें, नांगरणें, वगैरे शेतकीचीं सर्व कामें देखील मन्त्रांनींच करावींत असें सांगितलें आहे; ह्यासाठीं त्या मन्त्राची क्रिया होण्याच्या कामांत उपयोग असतोच, त्यामुळें मन्त्रावांचून क्रिया होत नाहीं हें उघड

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मन्त्रं क्रिया न च ॥६६॥ शिवरहस्ये ॥ प्रायश्चित्तं तु मंत्रेण दीक्षा
त्रेण चैव हि ॥ अणिमादीनि मंत्रेण सालोक्यादिफलं तथा ॥६७॥
त्रेण पातकादीनि मुच्यन्ते सर्वजन्मनाम् ॥ सर्वमंत्रक्रियां चैव
शृणु षडानन ॥६८॥ मननं सर्वपक्षेषु त्राणं संसारसागरात् ॥ म
नत्राणधर्मत्वान्मंत्रइत्यभिधीयते ॥६९॥ यथादरः स्वनाम्नातो
सन्निहितो भवेत् ॥ तथा मन्त्रप्रयोगेण तत्र सन्निहितः शिवः ॥७
तस्मान्मंत्रं महासेन रहस्यं न प्रकाशय ॥७१॥ शिवरहस्ये ॥ इहैव सं
ये मंत्रास्तत्र सिद्धिपदं पृथक् ॥ सर्वसिद्धिपदं स्वेकं शैवो मंत्रः प
क्षरः ॥७२॥ मूलं षडक्षरं चैव स्थूलं च नवमाक्षरं ॥ सूक्ष्मं पंचाक्ष

---

झालें. (६७) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, प्रायश्चित्त घेणें झालें तरी तें मन्त्रानेंच घ्
लागतें, दीक्षा घेणें झालें तरी ती दीक्षा मन्त्राच्या साधनानेंच घ्यावी लागते,
न्त्राच्या साधनानें मनुष्यास अणिमा महिमा वगैरे अष्टमहासिद्धींची प्राप्ति होते,
सालोक्यमुक्ति वगैरे फळेंही मिळतात. (६८) मन्त्राचा जप आपण केला, ह्म
आपल्या हातून अनेक जन्मांत जीं जीं पातकें घडलेलीं असतात, त्या सर्व पातकं
नाश होतो. शिव ह्मणतात, मुला षडानना, जो मन्त्र सर्व मन्त्रांत उत्तम ह्म
मानलेला आहे, व ज्या मन्त्राच्या साह्यानें सर्व क्रिया होतात तो मन्त्र मी तु
सांगतों. (६९) मन्त्र असें नांव त्यास पडण्याचें कारण असें कीं, म ह्या अक्षराचा
सर्व बाजूंचा विचार करणें असा होतो; आणि त्र ह्याचा अर्थ संसारसमुद्रां
दुःखापासून रक्षण करणें असा होतो. त्यामुळें सारासारगोष्टींचा विचार करण्
शक्ति आणि संसारदुःखांतून मुक्त होण्याची शक्ति दोन्हीं शब्दांचा अर्थ त्या
अक्षरांतून निघत असल्यानें त्यास मन्त्र असें नांव पडलें. (७०) आपल्या नां
चाच मनुष्य असला ह्मणजे त्याचे विषयीं जशी आदरबुद्धि होते, व त्याला म
आपल्या जवळ करितो; त्या प्रमाणें शिवपंचाक्षरी मन्त्राचा जप करणारा म
आपला आहे असें समजून शिव त्यास आपले जवळ घेतो; व त्यावर कृपा क
(७१) ह्यासाठीं कार्तिकेया, हा शिवपंचाक्षरीमन्त्र महामन्त्र आहे असें समज, ह्यां
रहस्य प्रकट करूं नकोस. गुप्त ठेव. (७२) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, ह्या
कींच जे जे मन्त्र आहेत त्या त्या मन्त्रांत सिद्धीची शक्ति वेगवेगळी आहे, शिव
षडक्षरी मन्त्र ह्मणून आहे त्या एका मन्त्रापासून मात्र सर्व प्रकारच्या सिद्धि
होतात. (७३) मूलमन्त्र हा षडक्षरी ( सहा अक्षरांचा ) आहे, स्थूलमन्त्र नऊ
रांचा आहे, सूक्ष्ममन्त्र पांच अक्षरांचा आहे व मायामन्त्र आठ अक्षरांचा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चैव मायाख्याष्टाक्षरं भवेत् ॥७३॥ प्रसादं दशबीजं च पंच पंचाक्षरं स्मृतम् ॥ मोक्षदश्चाभिवृद्धिश्च काम्यं शांतिश्च पौष्टिकम् ॥७४॥ मोक्षं पंचाक्षरं विद्यादभिवृद्धि षडक्षरम् ॥ काम्यमष्टाक्षरं विद्याच्छांतिकं तु नवाक्षरम् ॥ पौष्टिकं दश बीजं च मंत्राः पंचविधाः स्मृताः ॥७५॥ नकारः शान्तिकज्ञानं मकारः पुष्टिवर्द्धनः ॥ शिकारो मंगलं चैव वाकारश्चानुमोदनम् ॥ यकारो मोक्षसिध्यर्थं पंचसिद्धिफलप्रदम् ॥७६॥ लैंगे ॥ एकोऽहं संस्थितो देवि द्वितीयो नास्ति कुत्रचित् ॥ अस्मिन् वेदाश्च शास्त्राणि मंत्रे पंचाक्षरे स्थिताः ॥ तेनासन्नैव संप्राप्ताः मच्छक्त्या ह्यनुपालिताः ॥७७॥ ब्रह्मोत्तरखण्डे ॥ नास्य दीक्षा न होमश्च न संस्कारो न तर्पणम् ॥ न कालो नोपदेशश्च सदा शुचिरयं मनुः ॥७८॥

---

(७४) प्रसादांत दहा चांगले चांगले गुण आहेत, व पंचाक्षरांत पांच चांगले गुण आहेत. गुरुप्रसाद आणि शिवपंचाक्षरीमन्त्र हे प्राणिमात्रांस मोक्षाची प्राप्ति करून देतात, ह्या लोकीं ऐश्वर्याची अभिवृद्धि करितात, मनांतील सर्व इच्छा परिपूर्ण करितात, व शांति आणि पुष्टि देतात. (७५) पंचाक्षरी मन्त्र हा मोक्षाची प्राप्ति करून देणारा आहे असें समजावें; व षडक्षरीमन्त्र हा ऐश्वर्याची अभिवृद्धि करितो; अष्टाक्षर मन्त्र हा मनांतील इच्छा परिपूर्ण करितो; व नवाक्षरी मन्त्र शांति देणारा आहे असें समजावें तसाच तो पौष्टिक असून त्यांत दहा बीजें आहेत. हे मन्त्र पांच प्रकारचे आहेत असें म्हटलें आहे. (७६) "नमः शिवाय" ह्या मन्त्रांतील "न" ह्याचा अर्थ शांति देणारें ज्ञान असा होतो, "म" ह्याचा अर्थ पुष्टि वाढविणारा असा होतो, "शि" ह्याचा अर्थ मंगलकारक असा होतो, "वा" ह्याचा अर्थ अनुमोदन असा होतो, आणि "य" ह्याचा अर्थ मोक्ष प्राप्ति करून देणारा असा होतो. सारांश "नमः शिवाय" ह्या शिवपंचाक्षरी मन्त्राच्या साह्यानें पांच प्रकारच्या मोठमोठ्या सिद्धि प्राप्त होतात. (७७) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती मी स्वतः ह्या सर्व जगाचा परमेश्वर आहें, दुसरा कोणी नाहीं; तो मी स्वतः ह्या शिवपंचाक्षरी मन्त्रांत राहतों; तसेंच ह्या शिवपंचाक्षरी मन्त्रांत सर्व वेद आणि सर्व शास्त्रें देखील राहतात. त्यामुळें पंचाक्षरीमन्त्राचा जप करणारे माझे भक्त मला जास्त आवडत असून, माझ्या शक्तीमुळें त्यांचें रक्षण चांगल्या रीतीनें होतें. (७८) ब्रह्मोतरखंडांत ह्मटलें आहे कीं, ह्या मन्त्राचा जप करणारास दीक्षा घ्यावी लागत नाहीं, होम करावा लागत नाहीं, कांहीं एक विशेष प्रकारचा संस्कार करावा लागत नाहीं, किंवा तर्पण करावें लागत नाहीं; या मन्त्राला काळाची जरूर नाहीं, किंवा उपदे-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ईश्वर उवाच ॥ किं तस्य बहुभिर्मंत्रैः शास्त्रैर्वा बहुविस्तरैः ॥ यस्यों नमः शिवायेति मंत्रोऽयं संस्थितो त्हृदि ॥७९॥ ब्रह्मोत्तरखण्डे ॥ कैवल्यमार्गदीपोऽयमविद्याब्धेश्च वाडवः ॥ महापातकदावाग्निस्सोऽयं शैवषडक्षरः ॥८०॥ एष पंचाक्षरो मंत्रः केवलो मुक्तिदायकः ॥ सेव्यते मुनिश्रेष्ठैरशेषैः सिद्धिकांक्षिभिः ॥८१॥ शैवपुराणे ॥ उपमन्युरुवाच ॥ सर्वमंत्राधिकश्चायमोंकाराद्यः षडक्षरः॥ सर्वेषां शिवभक्तानामशेषार्थप्रदायकः ॥८२॥ अभिधानाभिधेयत्वान्मंत्रात्सिद्धः परशिवः ॥ एतावद्धि शिवज्ञानमेतावद्धि परं पदम् ॥८३॥ सांगानि वेदशास्त्राणि संस्थितानि षडक्षरे ॥ न तेन सदृशस्तस्मान्मंत्रोऽप्यस्त्यपरः क्वचित् ॥८४॥ वातुले ॥ परब्रह्मऋषिः शैवी गायत्री छंद उच्यते ॥ दे

---

शाची जरूर नाहीं. हा मन्त्र नेहमीं निर्दोष आहे. (७९) शिव ह्मणतात. ज्या मनुष्याच्या मनांत नेहमीं "ॐ नमः शिवाय" हा शिवषडक्षरीमन्त्र घोळत असे त्याला दुसरे अनेक प्रकारचे मन्त्र जपून तरी काय करावयाचें आहे? किंवा मोठमोठा विस्तार असलेलीं अनेक शास्त्रें वाचून तरी काय करावयाचें आहे? त्यास कशाचेंच कारण नाहीं. (८०) ब्रह्मोत्तरखंडांत ह्मटलें आहे कीं, हा शिवाचा षडक्षरी मन्त्र मोक्षरूप मार्गावर उजेडाकरितां लाविलेला खांबावरील दिवा आहे; अज्ञानरूप समुद्रांतील वडवाग्नि आहे, महापातकरूप वनांतील वणवा आहे. (षडक्षरी मंत्राने मोक्षप्राप्ति होते, अज्ञानाचा नाश होऊन पातकांचाही नाश होतो. (८१) हा शिवपंचाक्षरीमन्त्र खरोखर मोक्षप्राप्ति करून देणारा आहे. ज्यांस आपलें कल्याण व्हावें, व आपणास सिद्धि प्राप्त व्हावी असें वाटतें, असें सर्व ऋषीश्वर तो शिवपंचाक्षरीमन्त्र मनापासून जपतात. (८२) शैवपुराणांत उपमन्यूनें ह्मटलें आहे कीं, ॐकार अगोदर असलेला हा शिवपंचाक्षरीमन्त्र सर्व मन्त्रांपेक्षां श्रेष्ठ आहे; जितके शिवभक्त आहेत, त्या सर्वांचे हा पंचाक्षरीमन्त्र सर्व मनोरथ परिपूर्ण करणारा आहे. (८३) हा मन्त्र अभिधान ( सांगणारा ) असून शिव हा अभिधेय ( सांगावयास योग्य ) आहे असा हा अभिधानाभिधेयभाव संबंध असल्यामुळें या मन्त्रापासून या मन्त्राचा अर्थ पराशिव हा सिद्ध झाला. हें शिवज्ञान हेंच परपद आहे, असें समजावें. (८४) हा षडक्षर मन्त्रांत वेद आणि शास्त्रें आपापलीं अंगें आणि उपांगें यां सहित राहतात ह्यासाठीं ह्या शिवपंचाक्षरीमन्त्रासारखा मन्त्र दुसरा ह्या जगांत कोठें ही नाहीं. (८५) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, ह्या शिवपंचाक्षरी मन्त्राचा परब्रह्मऋषि असून शैवी गायत्री छंद आहे; ह्या मन्त्राची प्रत्यक्ष शिव देवता आहे; आणि माहेश्वरी शक्ति

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घताख्यः शिवस्साक्षाच्छंक्तिर्माहेश्वरी मता ॥८५॥ बीजं मायासविंदुक्तं हराग्निद्वयसंयुतम् ॥ कीलकं शिववन्हिभ्यां चतुर्दशकलान्वितम् ॥ सविंदूक्तं समाख्यातं विनियोगोऽथ कथ्यते ॥८६॥ ममाहं सति देहे तु षडूर्म्यादिनिवृत्तये ॥ षट्स्थलब्रह्मनिर्वाणसुखसंपदवाप्तये ॥ षडक्षरमनोर्जाप्यं करिष्ये शिवयाज्ञिकम् ॥८७॥ वायवीयसंहितायाम् ॥ नमस्कारादिसंयुक्तं शिवायेत्यक्षरत्रयम् ॥ जिव्हाग्रे वर्तते यस्य सफलं तस्य जीवितम् ॥८८॥ स्कन्दपुराणे सनत्कुमारसंहितायाम् ॥ नंदीश्वर उवाच ॥ पंचाक्षरसमो मन्त्रो नास्ति नास्ति महामुने ॥ महावेदसमो नास्ति यथा देवो जगत्त्रये ॥८९॥ शैवधर्मसंहितायाम् ॥ उपमन्युरुवाच॥ ज्ञातः प्रभावो युष्माभिः शिवमन्त्रस्य तस्य तु ॥ तस्मादयं सदा जप्यः सर्वकामार्थसिद्धये ॥९०॥ ईश्वर उवाच ॥ अशेषवेदोपनिषत्पुराण शास्त्रावतंसोयमघांतकारी ॥ पंचाक्षरोऽशेषमहाप्रभावो मया समासात्कथितो वरिष्ठः ॥९१॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ भूतिस्ते परमप्रकाश उत

---

आहे. (८६) माया ही विंदुसहित वीज आहे असें ह्मणतात; हर हीं दोन पवित्र अक्षरें दोन अग्निच आहेत, हें कीलक शिव आणि अग्नि ह्यामुळें चवदा कलांनीं युक्त असें आहे. त्याला विंदुसहित असें मानतात, व त्यालाच विनियोग असें ह्मणतात. (८७) माझ्या शरीरांतील षडूर्मींचा नाश होण्यासाठीं, व षट्स्थलब्रह्म आणि मोक्षसुख ह्यांची प्राप्ति व्हावयासाठीं, मी षडक्षरमन्त्राचा जप करितों; असा शिवयज्ञ करणारानें संकल्प करावा. (८८) वायवीयसंहितेंत ह्मटलें आहे कीं, " नम " ह्या दोन अक्षरांसहित " शिवाय " हीं तीन अक्षरें ( नमः शिवाय हा शिवपंचाक्षरीमन्त्र ) ज्याच्या जिभेवर ( तोंडांत ) नेहमीं वागतो ( राहतो ), त्यामनुष्याचें जन्माचें सार्थक्य झालें. (८९) स्कन्दपुराणांत सनत्कुमारसंहितेंत ह्मटलें आहे कीं, नंदीश्वर ह्मणतात— हे मुनिश्रेष्ठा, ह्या शिवपंचाक्षरीमन्त्रासारखा श्रेष्ठ मन्त्र ह्या जगांत दुसरा नाहींच नाहीं. तसाच ह्या जगांत महादेवासारखा दुसरा देव ही नाहीं. (९०) शैवधर्मसंहितेंत उपमन्यूनें ह्मटलें आहे कीं, मुनीश्वरहो, तुह्मीं सर्वांनीं त्या शिवपंचाक्षरीमन्त्राचा प्रभाव कसा आहे, तो ओळखलाच आहे; ह्यासाठीं ज्याला आपलें कल्याण व्हावें, आपणास धर्म आणि अर्थ ह्यांची प्राप्ति व्हावी, असें वाटत असेल; त्यांनीं हा शिवपंचाक्षरीमन्त्र नेहमीं जपावा. (९१) परमेश्वर ह्मणतात—पार्वती, हा शिवपंचाक्षरीमन्त्र सर्व वेद, उपनिषदें, पुराणें, आणि सर्व शास्त्रें ह्याहून श्रेष्ठ आहे; हा पंचाक्षरीमन्त्र पातकांचा नाश करितो; सर्व मन्त्रांपेक्षा हा पंचाक्षरीमन्त्र श्रेष्ठ असून मीं तुला ह्याची थोडक्यांत माहिती सांगितली. (९२) विभूति ही परमेश्वरा, तुझा परमप्रकाश आहे,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रुद्राक्षं त्वदीयं मुखं श्रीपंचाक्षरमन्त्र एव भवदीयं दिव्यनाम स्तम् ॥ लिंगं मूर्तिरुमापतिस्तवपरानंदामृतं पादुदं प्रासन्यं त्वदृत्प्रसाद इति भक्तिस्त्वां भजत्वस्तुमे ॥९२॥ ईश्वर उवाच ॥ गुरुर्लिंगं चरश्चैव प्रसादः पादवारि च ॥ भूतिरुद्राक्षमन्त्राश्च भक्तांगं चेति कथ्यते ॥९३॥

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रण्यश्रीद्धिसवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे पंचाक्षरीमाहात्म्यस्थलं नाम एकविंशतितमप्रकरणं समाप्तम् ॥

---

आणि रुद्राक्ष हें तुझें मुख आहे, श्रीपंचाक्षरमन्त्राचा जप हेंच तुझें दिव्य नामस्मरण केल्या सारखें आहें. लिंग ही स्वतः शिवाची मूर्ति आहे, तुझें पादोदक हें परमानंद आणि अमृतस्वरूप आहे, तुझी भक्ति केल्यामुळें माझ्या मनाला जो संतोष होतो तोच प्रसाद आहे, ह्याप्रमाणें तुझी भक्ति माझ्या हातून घडो हेंच तुला मागणें आहे. (९३) ईश्वर ह्मणतात,—गुरु, लिंग, जंगम, प्रसाद, पादोदक, विभूति, रुद्राक्ष आणि मन्त्र ह्या सर्वांस भक्तांग असें ह्मणतात.

ह्याप्रमाणें वीरशैवांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या, वीरशैवांच्या षट्स्थलमार्गांची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या सिद्धवीरनांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील पंचाक्षरीमाहात्म्यस्थल नांवाचें एकविसावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुवसवलिंगाय नमः ॥

## ॥ अथ भक्तस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ द्वाविंशतितमं प्रकरणम् ॥

एवं विभूतिरुद्राक्षाणि धृत्वा पंचाक्षरीं जपित्वा नित्यलिंगार्चनारतस्य सांगक्रियावर्तनं यथेत्याकांक्षायामनन्तरं भक्तस्थलमित्युच्यते ॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ प्राणायामसुगंधिगन्धवह एष्वन्तःसमाधिस्थितः प्राणो घ्राणहृषीकतो बहिरनात्मानार्थचारं विना ॥ जाप्ये कर्मणि शांभवे परमया भक्त्या स्वभक्तिस्थले नित्यं वर्तेत आत्मचारचरिताचाराख्यलिंगं भजन् ॥१॥ शिवधर्मपुराणे ॥ सदाकाले शिवे भक्तिर्लिंगजंगमपूजनम् ॥ लांछनेन शरण्यं च भक्तिस्थलसुबुद्धिमान् ॥२॥ उत्तरवातुले ॥ किं कुर्वाणस्समायुक्तो लिंगरूपेण जंगमम् ॥ मनसा सह इत्येव भक्तिस्थलसुबुद्धिमान् ॥३॥ शिवाद्वैते ॥ आचार्यागमवाक्येषु वि-

---

श्रीगुरुवसवलिंगास नमस्कार असो. आतां ह्यापुढें भक्तस्थलास आरंभ करितों ह्याप्रमाणें अंगास भस्म लावून अंगावर रुद्राक्षांच्या माळा घालून व शिवपंचाक्षरीमन्त्राचा जप करून नेहमीं लिंगपूजा करण्यांत गढून गेलेल्या भक्ताला यथास्थित रीतीनें क्रिया कशी घडेल, ही शंका येतेच; ह्मणून आतां ह्यापुढें भक्तस्थल ह्मणून काय आहे तें सांगतों. (१) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, प्राणायाम हाच सुगंधि वायु आहे, हाच वायु अन्तःसमाधींत असला ह्मणजे त्यास प्राणवायु असें ह्मणतात. त्याच प्राणवायूला नासिकेंद्रियानें बाहेर सोडून विषयासक्त न होता शंभूच्या भक्तीनें शिवाच्यासमाधींत तल्लीन होणें याला प्राणायाम असें ह्मणतात. शिवमंत्राचा जप करावयाच्यावेळीं तो जप अतिशय भक्तिभावानें करावा, व आपण स्वतः भक्तस्थलांत वर्तनाचे जे नियम सांगितले आहेत; त्यांस अनुसरून चालावें आणि आपापल्या धर्मांप्रमाणें वर्तन करून आचारलिंगाची भक्ति करावी. (२) शिवधर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, नेहमीं श्रीशिवाची उपासना करावी. लिंगाचें आणि जंगमाचें पूजन करावें. भक्तस्थलांत (भक्त लोकांत) जो बुद्धिमान मनुष्य असतो, जो शिवलांछन (शिवांनीं आपल्या अंगावर घेतलेल्या वस्तु भस्म रुद्राक्ष वगैरे) धारण करितो व जो शरण आहे, अशा त्या बुद्धिमान मनुष्याची भक्तस्थलांत गणना होते. (३) उत्तरवातुलांत ह्मटलें आहे कीं, लिंगस्वरूपी जंगमाच्या ठिकाणीं नेहमीं दासपणानें जो वागतो तो भक्तस्थलांत अतिशय बुद्धिमान होय. (४) शिवाद्वैतांत ह्मटलें आहे कीं, जो म-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

श्वासी लिंगजंगमे ॥ भक्त्या यो न फलाकांक्षी दाता भक्त इहोच्यते ॥४॥ वातुले ॥ अवाचिकं महानन्दं महाशान्तं महागुणी ॥ महालिंगे च संयोगी लिंगभक्तस्य लक्षणम् ॥५॥ शिवरहस्ये ॥ अल्पवाचस्सुदातारः शूरास्त्यागविशारदाः ॥ अमानिनो बुद्धिमन्तस्त्यक्तस्पर्धा गतस्पृहाः ॥६॥ शिवाद्वैते ॥ शिवयोगी शिवः साक्षादिति कैंकर्यभक्तितः पूजनं सुमनाः कुर्वन् स सद्भक्त इतीरितः ॥७॥ लैंग्ये ॥ भवभक्तिपराः ये च भवप्रणतिचेतसः ॥ भवसंस्मरणे युक्ता न ते दुःखस्य भागिनः ॥८॥ शिवरहस्ये ॥ तैलयुक्तं च कार्पासं ज्योतिस्पर्शेन ज्योतिवत् ॥ स्नेहयुक्तश्च भक्तश्च लिंगस्पर्शेन लिंगवत् ॥९॥ तत्रैव ॥ शिवभक्ता महा

---

नुष्य आचार्यांच्या आणि शिवागमाच्या वचनांवर विश्वास ठेवितो, लिंगाची व जंगमांची भक्ति करितो, दानकरणें झालें तर निष्कामबुद्धीनें करितो, (ह्या दानापासून पुढें आपला अमुक एक फायदा व्हावा असें इच्छित नाहीं; ) त्यास ह्या लोकीं भक्त असें म्हणतात. (५) वातुलांत ह्मटलें आहे कीं, शिवलिंगाची भक्ति करणारा मनुष्य मौन धारण करितो, तो अतिशय आनंदी असतो, त्याचा स्वभाव शांत असून तो मोठा गुणवान् असतो, तो नेहमीं महालिंगाचें चिंतन करीत असल्यामुळें त्या महालिंगांतच गढून गेलेला ( त्याशीं ऐक्य पावलेला ) असतो; इतके गुण अंगीं असणें हें लिंगभक्ताचें लक्षण आहे. (६) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिवभक्त लोक फार बोलत नाहींत त्यांस ज्यास्त बडबड करण्याची संवय नसते, ते मोठे वक्ते असतात; ते मोठे पराक्रमी असून दान करण्याचें कामीं फार उदार असतात; ते गर्विष्ठ नसून बुद्धिमान् असतात, ते कोणाचा मत्सर करीत नसून स्वभावानें निरिच्छ असतात. (७) शिवाद्वैतांत ह्मटलें आहे कीं, शिवयोगी प्रत्यक्ष श्रीशंकर आहे असें समजून, दासभावानें ( आपण ह्या परमेश्वराचे सेवक आहोंत अशा समजुतीनें ) जो सज्जन मनुष्य त्याची पूजा करितो, त्याला सद्भक्त असें ह्मणतात. (८) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे कोणी लोक शंकराची भक्ति करण्यांत नेहमीं तत्पर असतात शंकरास नमस्कार करण्याची ज्यांस मनापासून आवड असते, व जे लोक नेहमीं शिवाचें नामस्मरण करितात; ते कधींही दुःख भोगीत नाहींत. (९) शिरहस्यांत ह्मटलें आहे कीं, तेलांत भिजविलेला कापूस दिव्यास लाविल्या बरोबर तो जसा दिवा होतो, त्याप्रमाणें सप्रेम अंतःकरणाचा भक्त लिंगपूजन करूं लागल्यामुळें लिंगस्वरूप होतो. (१०) तेथेंच आणखी असेंही ह्मटलें आहे कीं, शिवभक्तलोक मोठे धाडशी असतात, ते शिवपूजा करण्यांत नेहमीं तत्पर

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्साहाः शिवार्चनपरायणाः ॥ संयुता धर्मसम्पन्नाः सर्वार्थान् साधयंति ते ॥१०॥ ऋजवो मृदवः स्वच्छा अनुकूलाः प्रियंवदाः ॥ शान्तस्मितमुखा भद्रा नित्यं स्वागतवादिनः ॥११॥ शिवाद्वैते ॥ शिवभक्तान् समालोक्य दूर एवात्र भक्तितः ॥ प्रांजलिः प्रणतो भूत्वा तोषयेद्दानभोजनैः ॥१२॥ शिवधर्मशास्त्रे ॥ प्रत्युत्थानाभिगमनं स्वागतं प्रियभाषणम् ॥ आसनं चान्नपानं च मुक्तेः सोपानसप्तकम् ॥१३॥ लैंग्ये ॥ शिवभक्तमथायान्तं दृष्ट्वापि सुमुखः प्रियम् ॥ प्रणामादि करोत्येवं महादेवं यथा तथा ॥ स वै भक्त इति ज्ञेयः पुनाति च जगत्त्रयम् ॥१४॥ उरसा शिरसा दृष्ट्या मनसा श्रध्दया गिरा ॥ पद्भ्यामुभाभ्यां बाहुभ्यां प्रणामोऽष्टांग उच्यते ॥१५॥ श्रवणं कीर्तनं शम्भोः स्मरणं पाद-

---

सतात. ते परस्पर एकविचारानें वागतात, ते मोठे धार्मिक असतात. त्यामुळें त्यांस धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष, ह्या चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ति होते. (११) शिवभक्त लोक स्वभावानें फार सरळ असतात, ते फार सुकुमार असतात, ते फार निर्मळ असतात, ते लोकांस त्रास न होईल अशा रीतीनें वागतात, ते नेहमीं सर्वांबरोबर गोड बोलतात, त्यांची मुद्रा नेहमीं शांत आणि हंसतमुख अशी असते, व ते नेहमीं सर्वांशीं मर्यादेनें बोलतात. (१२) शिवाद्वैतांत सांगितलें आहे कीं, शिवभक्त आपणाकडे येत आहेत असें आपणास लांबूनच नजरेस पडल्यावरोबर, भक्तिभावानें हात जोडून त्यांस नमस्कार करावा, व त्यांस दान देऊन आणि भोजन घालून संतुष्ट करावे. (१३) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, शिवभक्त आपलेकडे आले तर ते येण्यावरोबर उठून उभें राहणें, त्यांस सामोरें जाणें, त्यांचें आदरातिथ्य करणें, त्याचें मनास बरें वाटेल असें बोलणें, त्यास बसण्यास आसन देणें, आणि त्यांस अन्नपाणी देणें, हे सात प्रकार प्रत्यक्ष मोक्षाच्या सात पायऱ्या आहेत. (१४) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवभक्त आपलेकडे येतो आहे, असें पाहिल्यावरोबर त्यास सामोरे जावें, आणि त्याशीं प्रेमानें बोलावें; व जसें महादेवाला आपण नमस्कार वगैरे करितो तसेच शिवभक्तालाही नमस्कार करावे. असें वर्तन जो कोणी करील त्यालाच भक्त असें मानावें; आणि तोच भक्त त्रैलोक्यास पवित्र करितो. (१५) शिवाला नमस्कार करितांना आठ अंगें लववावीं लागतात, तीं ऊर, डोकें, दृष्टि, मन, श्रद्धा, वाचा, पाय, आणि हात, हीं होत. ह्या आठ अंगांनीं केलेल्या नमस्काराला साष्टांग नमस्कार ह्मणतात. (१६) शंकराचे गुणानुवाद ऐकणें, शंकराच्या गुणानुवादांचें कीर्तन करणें, शिवाचें स्मरण करणें, शिवचरणांची सेवा करणें, शिवाचें पूजन करणें,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सेवनम् ॥ अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ एवं नवविधा भक्तिः प्रोक्ता देवेन शंभुना ॥१६॥ मत्कथाश्रवणे भक्तिः स्वरनेत्रादि विक्रियाः ॥ ममानुस्मरणं नित्यं यश्च मामुपजीवति ॥१७॥ शिवरहस्ये शिवाचारसमा मुक्ता दयादाक्षिण्यगोचराः ॥ दंभमात्सर्यनिर्मुक्ता स्फुटाः तथा विभाषिणः ॥१८॥ शिवज्ञानविद्यायाम् ॥ ईश्वर उवाच ॥ यदुक्तं वैदिके शास्त्रे तत्सदाचारउच्यते ॥ आचारः परमो धर्म आचारः परमं पदम् ॥१९॥ सदाचारेण देवत्वं ऋषित्वं च वरानने ॥ अपि कुयोनित्वं सम्यगाचारवान्भवेत् ॥२०॥ वातुलतंत्रे ॥ समयाराधनं नित्यं धनप्राणाभिमानकैः ॥ त्रिसंध्यं ध्यानतो देवि मार्गशुद्धिरिहोच्यते ॥२१॥ आसने शयने याने गमनागमने स्थितौ ॥ भक्तैश्च सह संगो जनशुद्धिरिहोच्यते ॥२२॥ पात्राणि जंगमादीनि तत्पादरजसा शि

---

शिवास नमस्कार करणें, शिवाची इतर रीतीनें सेवा करणें, शिवाशीं स्नेह क आणि शिवास आत्मसमर्पण करणें, ही नऊ प्रकारची भक्ति होय. हे भक्तीचे नऊ प्रकार प्रत्यक्ष श्रीशिवांनींच सांगितले आहेत (१७) शिवभक्तानें माझी कथा (म गुणानुवाद ) ऐकावी. त्यानें भक्तिपूर्वक आपले स्वर, आपले नेत्र, आणि आप बोटें, ह्यांच्या हावभावाचे प्रकार करावे. नेहमीं मनांत माझें ( शिवाचें ) नामस्म करावें, आणि शिवभक्तानें भिक्षा मागून आपला चरितार्थ करावा. (१८) शिव स्यांत झटलें आहे कीं, शिवभक्तलोक शिवधर्म मनापासून पाळतात; त्यांचे दया आणि चतुरता हे गुण असतात. त्यांचे अंगीं दंभ आणि मत्सर हे मुळींच सतात. ते मोठे स्पष्टवक्ते असतात, जसें असेल तसें सांगतात; ते खोटें झणून लतच नाहींत. (१९) शिवज्ञानविद्येंत शिवांनीं झटलें आहे कीं, वेदांमध्यें आणि स्त्रांमध्यें जे वर्तनाचे प्रकार सांगितले आहेत, त्यास सदाचार असें म्हणतात. आच ह्या श्रेष्ठ धर्म आहे, आणि आचार हे श्रेष्ठ स्थान आहे. (२०) शिव झणतात पार्व सदाचार पाळल्यानें देवपणा आणि ऋषिपणा प्राप्त होतो. ज्या मनुष्याचें नीच नींत जन्म घेणें चुकलें असेल तो मनुष्य सदाचार चांगल्या रीतीनें पाळतो. इत च्या हातून सदाचार पाळणें होत नाहीं. (२१) वातुलतंत्रांत सांगितलें आहे शिव झणतात पार्वती, भक्तानें नेहमीं त्रिकाळ, द्रव्य, प्राण आणि गर्व सोडून ऊन शिवभक्तांचें मनापासून आराधन करावें. यास मार्गशुद्धि असें झणतात. (२ आसनावर, बिछान्यावर, वाहनावर, जातांना, येतांना, किंवा एकेठिकाणीं बसलें सलें तरी, शिवभक्तांचाच स्नेह करावा. यास जनशुद्धि असें झणतात. (२३)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तेनैव पावितं विश्वं कथ्यते पात्रसंस्कृतिः ॥२३॥ गोत्राणि शिवगोत्राणि तत्र संबंधकारणम् ॥ भयभक्तिः परा तत्र कथ्यते गोत्रसंस्कृतिः ॥२४॥ दासत्वं वीरदासत्वं भृत्यत्वं वीरभृत्यता ॥ समयः सकलावस्थः सज्जनः षड्विधस्तथा ॥२५॥ आदौ नियमसंयुक्तो गुरुपादांबुजार्चने ॥ कर्मयोगयुतः प्रोक्तो दासभावस्तु सज्जनः ॥२६॥ स्वामिभृत्यसमोपेतं परदैवविवर्जितम् ॥ मद्भक्ताकांक्षितं चित्तं वीरदासत्वसज्जनः ॥२७॥ अकुलं कुलवन्तं वा नमस्कृत्य तु भोजयेत् ॥ शेषान्नं भुंजते देवि भृत्यभावस्तु सज्जनः ॥२८॥ अष्टशुद्धियुतं प्रोक्तमीषणत्रयसंयुतम् ॥ आसुरं कर्म योगेन वीरभृत्यत्वसज्जनः ॥२९॥ स्वगृहं स्वधनं चैव स्वदेहं भक्तिसंयुतः ॥ जंगमे स्थावरे दद्यात्समयाचारसज्जनः ॥३०॥ अ-

---

ह्मणतात पार्वती, आपल्या घरीं जीं आपल्या उपभोगाचीं लहान मोठीं भांडीं असतील, तीं सर्व जंगमाच्या पादधूलीनें घांसून स्वच्छ करावीं, कां तर त्या जंगमाच्या पादधूलीनें त्रैलोक्य देखील पवित्र होतें असें ह्मणतात; त्या जंगमाचें पादधूलीनें भांडीं स्वच्छ करणें, ह्यास पात्रशुद्धि असें ह्मणतात. (२४) जीं शिवगोत्रें आहेत त्यांसच गोत्रें असें ह्मणतात, त्या गोत्राशींच परस्पर संबंध ठेवावा. त्या गोत्राविषयीं भय आणि भक्ति हीं असावीं; याला गोत्रशुद्धि असें ह्मणतात. (२५) दासपणा आणि वीरदासपणा, भृत्यपणा आणि वीरभृत्यपणा, समय आणि सकलावस्थ हे सज्जनाचे सहा प्रकार आहेत. (२६) सज्जनानें अगोदर नियम पाळावे, गुरूच्या चरणकमलांचें ध्यान करावें, आणि आपलीं नित्यकर्में पाळावीं असें वर्तन करणाऱ्या सज्जनास दासभावसज्जन असें ह्मणतात. (२७) ज्याचें मन स्वामी आणि भक्त ह्यांचेकडे असतें, इतर देवांस जें चित्त मुळींच मानीत नाहीं, माझे भक्त (शिवभक्त) ज्याला फार आवडते असतात त्या सज्जनास वीरदासभावसज्जन असें ह्मणतात. (२८) पार्वती, जो कोणी सज्जन मनुष्य कोणी अकुलीन असो किंवा कुलीन असो त्याला सन्मानानें नमस्कार करून भोजन घालतो आणि त्याचें उच्छिष्टअन्न आपण भक्षण करितो त्यास भृत्यभावसज्जन असें ह्मणतात. (२९) ज्या सज्जनाच्या आंगीं आठ प्रकारच्या शुद्धि असतात, व तीन प्रकारच्या ईषणा (अर्थेषणा, पुत्रेषणा, दारेषणा) असतात त्यानें आसुर (अघोर) कर्म केलें ह्मणजे त्यामुळें त्यास वीरभृत्यभावसज्जन असें ह्मणतात. (३०) जो कोणी सज्जन मनुष्य आपलें घर, आपलें द्रव्य, आणि आपलें शरीर भक्तिभावानें जंगमलिंगाला आणि स्थावरलिंगाला अर्पण करितो त्यास समयाचारभावसज्जन असें ह्मणावें. (३१) ज्याला अणिमा, महिमा वगैरे अष्टमहासिद्धि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

णिमादिगुणैश्वर्यमीषणत्रयवर्जितम् ॥ निर्मलं निरहंकारं सकलाव
सज्जनः ॥३१॥ गुरौ लिंगे दृढा भक्तिः सत्यवादी जितेंद्रियः ॥ सुम
सुमतिश्चैव दासभावार्चनक्रमः ॥३२॥ तैलाभ्यंगं च वस्त्रं च इष्टान्नं
गमार्पितम् ॥ सुखं संभाषणं प्रीत्या समयाराधनक्रमः ॥३३॥ वायवी
यसंहितायाम् ॥ सत्यं क्षमा दया शौचं नियमो मार्दवं तथा ॥ त
स्त्यागो ब्रह्मचर्यं संतुष्टिश्चार्जवं तथा ॥ धर्मा एकादश प्रोक्ता भक्ता
नां शुभलांछने ॥३४॥ कामं भक्तिरतं कामं क्रोधं चाधर्मकर्मणि ॥ लो
चैवार्चने कुर्यान्मोहं भक्तजनप्रिये ॥ मात्सर्यं करणेष्वेवं मदं माया
राभवे ॥३५॥ शिवरहस्ये ॥ अनादरोऽप्यहंकारो मोहो भीतिरुपाधि

---

अनुकूल आहेत, ज्याला तिन्ही प्रकारच्या ईषणा ( दारेषणा, पुत्रेषणा, अर्थेषणा
नाहींत, ज्याला कोणताही दोष नाहीं, व ज्याला अभिमान नाहीं, त्यास सकला
सज्जन असें ह्मणतात. (३२) ज्या मनुष्याचा आपल्या गुरूवर आणि इष्टलिंगा
दृढ विश्वास असतो, जो कधींही खोटें बोलत नाहीं, ज्याचीं इंद्रियें त्याच्या स्वा
असतात, जो चांगले चांगले नियम पाळतो, ज्याची बुद्धि चांगली असते, त
दासभाव असें ह्मणावें; आणि हाच दासभावाच्या अर्चनाचा क्रम होय. (३३)
क्तानें जंगमाला तेल लावून न्हाऊं घालणें, चांगलीं चांगलीं वस्त्रें अर्पण करणें,
जंगमास इच्छाभोजन घालणें, त्याबरोबर आनंदानें सुखासमाधानाच्या गोष्टी सां
ह्या त्याच्या वागणुकीला समयाराधनक्रम असें ह्मणतात. (३४) वायवीयसंहितेंत
टलें आहे कीं, खरेपणा, शांति, दया, शुद्धपणा, नियम, कोमळस्वभाव, तपश्च
दान, ब्रह्मचर्य, संतोष, आणि सरळपणा, हे अकरा गुण भक्ताच्या अंगीं असणें
कल्याणकारक मानलें आहे. (३५) शिवभक्ताची आवड ( काय ) शिवभक्तांवर
सावी, ( विषयसुखाची त्याला आवड नसावी ) अधर्मकृत्यावर त्याचा राग अ
( त्यानें अपकृत्यें करूं नयेत ) शिवपूजनाचा त्यानें लोभ करावा दुसरा कोण
लोभ त्यानें करूं नये. त्यानें भक्तलोकांचें बरें करण्याकडे आपलें नेहमीं लक्ष्य
वावें, दुसरा मोह त्यास नसावा. त्यानें आपल्या इंद्रियांबरोबर मत्सर करून
आपले ताब्यांत ठेवावें, दुसऱ्या कोणांबरोबर मत्सर करूं नये. मायेचा पराभव
रण्याचा त्यानें मद ( गर्व ) करावा इतर कोणत्याही गोष्टींबद्दल त्यानें गर्व करूं
(३६) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, ज्या शिवभक्ताला अनादर नाहीं ( जो
णाचा अपमान करीत नाहीं ), व त्याचा कोणी अपमान केला तर त्याबद्दल ज्या
क्षति वाटत नाहीं, ज्याला गर्व नाहीं, ज्याला मोह नाहीं, ज्याला भय नाहीं, ज्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ कीर्तिश्च षड्गुणं नास्ति दासोऽहं च स्वयं शिवः ॥३६॥ केशबंध शिरोमुण्डजटाबन्धत्रिमूर्तिषु ॥ दासोहमिति कर्तव्यं दासोहं च स्वयं शिवः ॥३७॥ अर्थप्राणाभिमानं च गुरौ लिंगे च जंगमे ॥ तल्लिंगजंगमप्राणं भक्तस्थलमुदाहृतम् ॥३८॥ वृद्धजाबालोपनिषदि ॥ तस्माद्भस्मरुद्राक्षाणि धृत्वा रुद्रानुवाकैः रुद्रं संपूज्य एक एव हि रुद्रो न द्वितीयाय तस्थ इत्यादिभिः परमेश्वरं स्तुत्वा सततं युक्तिभिर्मन्यमानो ध्यायेत् ॥ ततः सकलपाशबन्धच्छेदान्मुक्तो भवति नित्यसुखी भवति न संसारी भवति शिवस्वरूपो भवति शिवस्वरूपो भवति ॥३९॥ स्कान्दे ॥ लिंगांगसंगिनः शुद्धान् सदाशिवपतिव्रतान् ॥ पूजयेदादरेणैव श्रद्धाभक्तिसमन्वितः ॥४०॥ ब्रह्मगीतायाम् ॥ न कर्मणा न तपसा

---

उपाधि नाहीं, व ज्याला लोकांत आपली कीर्ति व्हावी अशी इच्छाही नाहीं सारांश हे सहा गुण ज्या शिवभक्ताच्या अंगीं नाहींत, तो भक्त असून प्रत्यक्ष शंकरही आहे.(३७)तो भक्त केश राखो, मस्तकाचें मुण्डण करो, किंवा जटा बांधो, ह्या तिहींपैकीं कांहींही करो, त्यानें मी स्वतः शिवभक्त आहें असें समजून वर्तन करावें असें वर्तन करणारा मनुष्य प्रत्यक्ष शंकरही आहे आणि भक्तही आहे. (३८) जो भक्त आपलें द्रव्य आपले प्राण आणि आपला अभिमान गुरु, लिंग आणि जंगम ह्यांस अनुक्रमानें अर्पण करितो. जो भक्त आपले गुरूस द्रव्य अर्पण करितो, लिंगाला प्राण अर्पण करितो व जंगमाशीं अभिमान सोडून वागतो त्याला लिंगजंगमांचें प्राण असें भक्तस्थल ह्मणून मानावें. (३९) वृद्धजाबालोपनिषदांत सांगितलें आहे कीं, ह्यासाठीं भक्तानें आपल्या आंगास भस्म लावावें गळ्यांत आणि सर्व आंगावर रुद्राक्ष धारण करावं रुद्रानुवाक ह्मणून रुद्राची ( महादेवाची ) पूजा करावी आणि रुद्र हा एकटा आहे त्याच्यासारखा देव दुसरा कोणी नाहीं वगैरे वाक्यांनीं परमेश्वराचें नेहमीं स्तोत्र करावें व त्या भक्तानें शिवाचें ध्यान करावें. असें केलें ह्मणजे, त्याचे सर्व पाश तुटून तो त्या पाशापासून मुक्त होतो. तो नेहमीं सुखी होतो, त्यास पुनः संसारदुःख भोगावें लागत नाहीं; तो शिवस्वरूप होतो. (४०) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे कोणी शिवलिंगाचा आपले शरीराशीं संबंध केलेले ( लिंगधारण केलेले ) असतील, जे स्वभावानें निर्दोष असतील व जे नेहमीं शिव हा आपला पति आहे असें समजून वर्तन ठेवितात त्यांची शिवभक्तानें आदरसत्कारानें व भक्तिभावानें पूजा करावी. (४१) ब्रह्मगीतेंत सांगितलें आहे कीं, शिव ह्मणतात–पार्वती, मी फक्त भक्तीनें मात्र वश ( प्रसन्न ) होतों; भक्ति नसेल तर नुसतीं कर्में ( यज्ञयागादि कृत्यें )

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न जपैर्न समाधिभिः ॥ न ज्ञानेन न दानेन वश्योऽहं श्रद्धया विना ॥४१॥ तत्रैव ॥ नाहं प्रसन्नस्तपसा न दानेन न चेज्यया ॥ तुष्टोऽहं भक्तिलेशेन क्षिप्रं याति परं पदम् ॥४२॥ शिवरहस्ये ॥ स्थावरं जंगमश्चैव द्विविधं लिंगमुच्यते ॥ जंगमस्यावमानेन स्थावरं निष्फलं भवेत् ॥४३॥ मम साहित्यभक्तास्तु तमोमायाविवर्जिताः ॥ मेघनिर्मलतोयेन पद्मपत्रं न धार्यते ॥४४॥ वीरागमे ॥ वृत्तम् ॥ इत्येव सत्यमिव भाति शरीरमेतत्प्राणार्थजातमिति तत्र निवृत्तचित्तम् ॥ भक्तिक्रियाचरणमेव सदा विरक्तभक्तस्थलं भवविकारविदूरमाहुः ॥४५॥ वासिष्ठपुराणे ॥ देहपातस्तथा कंपः परमानंदहर्षणम् ॥ स्वेदो रोमांच इत्येवं भक्तेः पदस्य लक्षणम् ॥४६॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ सुजलं सुरसं चैव यदा संभवद्द्रव्यतः ॥ जंगमेन युतां चार्चां मध्यान्हे भोजनक्रमः ॥४७॥

---

केल्यानें, तपश्चर्या केल्यानें, जप केल्यानें, समाधि लाविल्यानें, नुसत्या ज्ञानानें किंवा दानानें वश होत नाहीं. मला प्रसन्न होण्याला मजवर विश्वास ठेवून माझी भक्तीच केली पाहिजे. (४२) तेथेंच आणखी असेंही म्हटलें आहे कीं, शिव म्हणतात—पार्वती, मी तपानें प्रसन्न होत नाहीं, दानानें प्रसन्न होत नाहीं, किंवा यज्ञयागानें प्रसन्न होत नाहीं, माझी थोडी भक्ति केली तरी मी प्रसन्न होतों, व माझी भक्ति करणारा मनुष्य श्रेष्ठपदाला जातो. (४३) शिवरहस्यांत म्हटलें आहे कीं, स्थावरलिंग आणि जंगमलिंग असे लिंगाचे दोन भेद आहेत; जंगमलिंगाचा अपमान करून स्थावरलिंगाची पूजा केली तर त्या पूजेचा कांहींएक उपयोग होत नाहीं; ती पूजा फुकट जाते. (४४) माझे साहित्यभक्त अज्ञान आणि माया ह्यापासून अगदीं अलिप्त असतात. पद्माचे पानावर मेघाचें स्वच्छ पाणी कितीही ओतलें तरी तें त्यावर राहत नाहीं, तसेंच माझ्या भक्ताच्या अंगीं मल आणि माया हे दुर्गुण राहत नाहींत. (४५) वीरागमांत म्हटलें आहे कीं, हें शरीर अगदीं शाश्वत राहणारें आहे असें दिसतें, तसेंच प्राण आणि द्रव्य हेंही निश्चल आहे असें वाटतें; तरी तें खरें न मानतां भक्त त्याविषयीं प्रेम ठेवीत नाहीं, त्याचे अंगीं भक्ति, क्रिया आणि आचरण हे तिन्ही गुण असतात, त्यास संसाररोगाची भीति नसते; त्याला विरक्तभक्तस्थल असें म्हणतात. (४६) वासिष्ठपुराणांत म्हटलें आहे कीं, शरीर निपचित होऊन जमिनीवर पडणें, त्यास कांपरें सुटणें, अतिशय आनंद झाल्यासारखी स्थिति होणें, अंगास घाम येणें, अंगावर शहारा येणें, इतके प्रकार होणें हें भक्तिस्थलाचें लक्षण आहे. (४७) सिद्धान्तशिखामणींत म्हटलें आहे कीं, गाळलेलें, निर्मळ आणि सुगंधि पाणी घेऊन ज्यावेळीं जितकीं कांहीं द्रव्यें मिळतील तितकीं यथाशक्तीनें मिळवून जंगमलिंगाची

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ज्ञानयोगखण्डे ॥ वृत्तम् ॥ समागतं पुण्यबलात्तदातिथिं समर्चयेदीश्वर चेतसा तु तम् ॥ जलासनाद्यंऽघ्रवनेजलादिभिस्तदन्नपानैः प्रियवाग्भिरादरात् ॥४८॥ लैंग्ये ॥ आसनाभ्यंजनस्नानवस्त्रधान्यांगनादिभिः ॥ पूजयेच्छिवभक्तो यः स याति परमां गतिम् ॥४९॥ वीरागमे ॥ दिने दिने विशेषं च मासे मासे महाघने ॥ वत्सरे वत्सरे चोद्यं सद्भक्तो भक्तिवर्द्धनः ॥५०॥ क्रमेणैव फलं लिंगे चरे साक्षात्फलाध्द्रुवम् ॥ लिंगे चापि फलं देवि जंगमे च फलं न हि ॥५१॥ नोपकर्तुः स्थितं द्रव्यं किं तु तत्कालसंभवम् ॥ किमास्ते तालवृंतस्य मंदमारुतसंग्रहः ॥५२॥ वृत्तम् ॥ पिबन्ति नद्यः स्वयमेव नाम्भः खादन्ति न स्वादुफलानि वृक्षाः ॥ पुरंदरो न क्वचिदत्ति सस्यम् परोपकाराय सतां विभू-

---

पूजा करून दोनप्रहरीं भक्तानें भोजन करावें. (४८) ज्ञानयोगखण्डांत ह्मटलें आहे कीं, आपल्या सुदैवानें जर अतिथि आला, तर त्यास परमेश्वराप्रमाणें मानावें; व त्यास जल, आसन, पाय चेमणें, अन्नपाणी वगैरे अर्पण करून, व त्यावरोवर सन्मानानें गोडगोड वोलून, त्याची पूजा करावी. (४९) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी शिवभक्त आपले घरीं आलेल्या अतिथीची आसन, तैल लावणें, स्नान, वस्त्र, धान्य, स्त्री ( कन्यादान ) वगैरे वस्तूंनीं पूजा करितो, तो उत्तम गतीस जातो. (५०) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, प्रत्येक दिवशीं चांगल्या भक्तानें आपली भक्ति जास्त जास्त वाढवावी, महिन्या महिन्यास त्यापेक्षां जास्त वाढवावी, आणि वर्षोवर्षास तर त्याहूनही जास्त भक्ति वाढवावी. अशी भक्ति वाढविणाऱ्या भक्तास सद्भक्त असें ह्मणतात. (५१) लिंगाची पूजा केली तर क्रमाक्रमानें फलप्राप्ति होते, व चराची पूजा केली तर प्रत्यक्ष अक्षय फळ मिळतें; शिव ह्मणतात—पार्वती, लिंगाची पूजा केली तर जसें फळ मिळतें तसें जंगमाच्या पूजेनें फळ मिळत नाहीं; जंगमाची पूजा केली तर प्रत्यक्ष मोक्षच मिळतो, तेथें अत्यानन्द स्थिति असल्यामुळें फळ भोगण्याचें कारणच राहत नाहीं. (५२) उपकार करणाराजवळ द्रव्य सांठवून ठेवलेलें असत नाहीं, तें त्याला त्यावेळीं आपापच मिळतें; विंझणवाऱ्यानें हळू वाहणारा आणि गार असा वारा आपल्याजवळ सांठवून ठेविलेला नाहीं तो त्याचे हालण्यानें आपाप उत्पन्न होतो. (५३) नद्या आपलें गोड पाणी आपणच स्वतः पिऊन टाकीत नाहींत, झाडें आपलीं गोड फळें आपणच स्वतः खाऊन टाकीत नाहींत. इंद्र पृथ्वीवर पाऊस पाडून उत्पन्न केलेलें धान्य आपणच स्वतः खाऊन टाकीत नाहीं. सारांश, मोठ्या लोकांची संपत्ति दुसऱ्यावर उपकार करण्याकरितां अ-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तिः ॥५३॥ इंद्रियार्थं प्रशंसार्थं सर्वस्वं दीयते नरैः ॥ धर्मार्थमणुमात्रं च तद्दानं मरणोपमम् ॥५४॥ स्कान्दे ॥ न ग्राह्यं रसमादाय सरलो वांछयुक्तवान् ( वांच्छया युतः ) ॥ नियतो भक्तियुक्तत्वाद्भक्तिस्थलसुबुद्धिमान् ॥५५॥ शैवरत्नाकरे ॥ जंगमेन विना देवि कर्माणि चरते यदि॥ स एव नरके घोरे पुनश्चांडालवंशजः ॥५६॥ गुरुभक्तिविहीनस्य लिंगभक्तिर्हि निष्फला ॥ सा च भक्तिविहीनस्य द्वितीया या च निष्फला ॥५७॥ ईशप्राणमयं लिंगं लिंगप्राणो गुरुर्भवेत् ॥ गुरुप्राणश्चरो यस्मात्तस्माज्जंगमपूजनम् ॥५८॥ लिंगक्षेत्रं गुरुस्थानं गुरुक्षेत्रं च जंगमः ॥ जंगमस्तु निराभारी भाराभारविवर्जितः ॥५९॥ पिता गुरुः पतिर्लिंगं स्वदैवं जंगमः प्रभुः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन तस्य चाराधनं कुरु ॥६०॥

---

सते त्यानें तिचा उपभोग घ्यावा अशा करितां ती नसते. (५४) मनुष्य आपल्या ऐषआरामाकरितां किंवा लोकांत आपली कीर्ति व्हावी ह्मणून पाहिजे तितका ( सर्वस्व ) पैसा खर्च करितात; परंतु धर्मकार्याकरितां त्यांनीं अगदीं थोडे पैसे खर्च केले, तरी ते पैसे दान करणें मरणासारखें कष्टदायक वाटतें. (५५) जो भक्तिमान् मनुष्य चांगलीं चांगलीं अन्नें केलीं तरी जंगमास अर्पण केल्यावांचून आपण अगोदर भक्षण करीत नाहीं, जो स्वभावानें फार सरळ असून निरिच्छ असतो, त्याच्या भक्तीच्या अलौकिकगुणांमुळें त्यास भक्तिस्थलांतील बुद्धिमान् भक्त असें ह्मणतात. (५६) शैवरत्नाकरांत ह्मटलें आहे कीं, शिव म्हणतात–पार्वती, जो कोणी भक्त जंगमाखेरीज कर्में करील, तो भक्त भयंकर नरकांत पडतो, व तेथून चांडालवंशांत जन्मास जातो. (५७) जो कोणी मनुष्य गुरूची भक्ति करणारा नसेल त्यानें लिंगभक्ति केली तरी त्याचें तें करणें निष्फळ आहे, गुरूची भक्ति असून लिंगाची भक्ति करणें तिलाच भक्ति ह्मणावें. गुरूची भक्ति केल्याखेरीज लिंगाची पूजा ( भक्ति ) करणें अगदीं व्यर्थ आहे (५८) इष्टलिंग हें परमेश्वराचें प्राणस्वरूप आहे, गुरु हा लिंगप्राणस्वरूप आहे, आणि जंगम हा गुरुप्राणस्वरूप आहे. ह्यासाठीं जंगमाचें पूजन करावें. जंगमपूजन हें इष्टलिंगपूजेपेक्षां आणि गुरुपूजेपेक्षां श्रेष्ठ आहे. (५९) लिंगक्षेत्र हें गुरुस्थान आहे आणि गुरुक्षेत्र हा जंगम आहे, जंगमांत देखील निराभार जंगम श्रेष्ठ आहे, त्याला सुख आणि दुःख ह्यांचा मुळींच संबंध नसतो. सारांश, लिंगापेक्षां गुरु श्रेष्ठ आहे, गुरूपेक्षां जंगम श्रेष्ठ आहे आणि जंगमापेक्षां निराभार-जंगम श्रेष्ठ आहे. (६०) भक्ताचा गुरु हा पिता आहे, इष्टलिंग हें पति आहे, आणि जंगम हें त्या भक्ताचें कुळदैवत आहे, ह्यासाठीं हर प्रयत्नानें भक्तानें जंगमाचें आ-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri 

अयं जंगमलिंगैक्यो वीरो यज्जंगमार्पितम् ॥ अर्थप्राणादिकं प्रीत्या दत्वा न्मनसि न स्मरेत् ॥६१॥ ब्रह्मगीतायाम् ॥ शिवादिनामहीनस्य ध्यानहीनस्य शूलिनः ॥ शिवभक्तिविहीनस्य त्रिपुण्ड्रोध्दूलनादिषु ॥६२॥ श्रद्धाहीनस्य रुद्रस्य प्रसादस्याप्यसेविनः ॥ साक्षान्मुक्तिर्महादेवे नैव सिद्ध्यति शूलिनः ॥६३॥ ग्रन्थान्तरे ॥ जीवितं शिवभक्तानां वरं पंचदिनानि च ॥ अजकल्पसहस्रेभ्यो भक्तिहीनं न शांकरि ॥६४॥ स्कान्दे॥ शुभानामशुभानां च कर्मणां वापि संचयम् ॥ करोति भस्मसाद्भक्तिर्देहत्यग्निरिवेन्धनम् ॥६५॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥६६॥ तथैवोक्तं तत्वसारे ॥ सम्यग्गुरुं शिवं नित्यं ज्ञात्वा तत्पूजनं बुधः ॥ यः करोत्युभयाकारं शिवस्यैकाश्रयः स हि ॥६७॥ स्कान्दे ॥

---

राधन करावें. (६१) जो वीरशैव द्रव्य, प्राण वगैरे वस्तु देखील जंगमास अर्पण करण्यास अनमान करीत नाहीं, व अर्पण केलेल्या वस्तूंचें मनांत स्मरण देखील करीत नाहीं, त्यास जंगमलिंगैक्य असें ह्मणावें. (६२) ब्रह्मगीतेंत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य शिवाचें नांव घेत नाहीं, शूल धारण करणाऱ्या शंकराचें ध्यान करीत नाहीं, शंकराची भक्ति करीत नाहीं, भस्माचें त्रिपुण्ड्र करणें आणि आपल्या सर्व अंगास भस्म मर्दन करणें (६३) ह्या कृत्यावर ज्याचा विश्वास वसत नाहीं, रुद्राचा प्रसाद देखील जो भक्षण करीत नाहीं, तो असा इतका महादेवाशीं वैरभावानें वागणारा मनुष्य कधींही मुक्त होत नाहीं. (६४) इतर ग्रन्थांत देखील असें सांगितलें आहे कीं, शिव ह्मणतात–पार्वती, शिवभक्ति करणारे लोक पांच दिवस जिवंत असले तरी पुरवलें, परंतु शिवभक्ति न करणारा मनुष्य ब्रह्मदेवाचे हजार कल्प जिवंत राहिला तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. (६५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जसा विस्तव लांकडास जाळून टाकून त्याची राखरांगोळी करितो तशीच शिवभक्ति शुभकर्मांचा संग्रह असो किंवा अशुभकर्मांचा संग्रह असो त्यांचा नाश करून त्या मनुष्यास मोक्षप्राप्ति करून देते त्यास पुनः जन्ममरणाचे फेऱ्यांत पडावेंच लागत नाहीं. (६६) श्वेताश्वतरोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, ज्या मनुष्याची देवावर जशी मनापासून दृढभक्ति असते, तशीच दृढभक्ति गुरूवरही असेल, तर त्या मनुष्याला सांगितलेल्या गोष्टी आपाप प्रत्यक्ष अनुभवास येतात. (६७) तत्वसारांतही तसेंच सांगितलें आहे कीं, जो कोणी मनुष्य आपल्या गुरूला शिवस्वरूप मानून त्याची पूजा करितो आणि शिव आणि गुरु हे दोघेही सारख्या योग्यतेचे आहेत असें मानतो तो मनुष्य शिवाचे प्रीतीस पात्र होतो, शिवाचा तो अतिशय प्रियकर होतो. (६८) ख-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गुरौ निस्संशयो देवः शिवस्तुष्टस्तदात्मकः ॥ अतिथौ यस्य लाभे तु
स मुक्तो भवबन्धनात् ॥६८॥ शैवरत्नाकरे ॥ परात्परात्मके लिंगे तदा-
त्मायं महागुरौ ॥ भक्तियोगसमो यस्य स्वभावादुभयस्थलः ॥६९॥
स नारीभृत्यसद्भक्तः पतिक्रियश्च जंगमः ॥ तस्मिन् रूपं गुणः शील-
मविचारात्सुखं भवेत् ॥७०॥ स्वायंभुवागमे ॥ लिंगद्वयं समाख्यातं चरं
चाचरमेव च ॥ चरंत्वतिथिविख्यातमचरं पार्थिवादिकम् ॥७१॥ चरे
सदा वसत्त्येव प्रीतियुक्तो महेश्वरः ॥ अचरे मन्त्रसंस्कारैः स्वयं नित्यं
सदाशिवः ॥७२॥ शिवधर्मशास्त्रे ॥ चरे सदा वसत्येव प्रीतियुक्तो म-
हेश्वरः ॥ अचरे मन्त्रसंस्कारैर्द्वयोर्नित्यं सदाशिवः ॥७३॥ शिवरहस्ये ॥
स्थावरं जंगमं चैव द्वयमेकं समीरितम् ॥ इति भेदपरिज्ञानं दुर्लभं
शृणु पार्वति ॥७४॥ पदं देहमिति ख्यातं पदार्थः प्राण एव च ॥ उ-
भयोरन्तरं ज्ञेयं तद्देहं लिंगजंगमम् ॥ ७५॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ त-

---

रोखर संतुष्ट आणि गुरुस्वरूपी परमात्मा महादेव गुरूमध्यें राहतो ज्या मनुष्याला त्या
अतिथीचा लाभ झाला तो मनुष्य संसारदुःखापासून मुक्त होतो. (६९) शैवरत्नाक-
रांत झटलें आहे कीं, लिंग हें श्रेष्ठ वस्तूहून श्रेष्ठ वस्तु आहे आणि महागुरूच्या ठिकाणीं
त्याचा आत्मा आहे, त्या लिंगाकडे आणि गुरूकडे ज्याचें मन दृढ लागलें आहे,
त्यास उभयस्थल असें ह्मणतात. (७०) तो सज्जन भक्त वायको सारखा किंवा दास
सारखा आहे, आणि जंगम हा पतीसारखा व्यवहार करणारा आहे ह्या साठीं भ-
क्तानें आपलें रूप, गुण आणि शील कांहींएक विचार न करितां जंगमास अर्पण क-
रावें ह्मणजे त्यास सुख लागेल. (७१) स्वायंभुवागमांत झटलें आहे कीं, लिंगाचे स्था-
वरलिंग जंगमलिंग असे दोन भेद आहेत. अतिथीस चरलिंग असें ह्मणतात आणि
दगड माती वगैरे पदार्थांनीं केलेल्या लिंगास अचरलिंग असें ह्मणतात. (७२) चर-
लिंगांत ( जंगमलिंगांत ) मोठ्या संतोषानें महेश्वर नेहमीं राहतो, आणि स्थावरलिं-
गामध्यें मात्र मन्त्रसंस्कारांनीं महादेव नेहमीं राहतो. (७३) शिवधर्मशास्त्रांत सांगि-
तलें आहे कीं, जंगमलिंगांत तर संतुष्टमनानें नेहमीं सदाशिव राहतच आहे आणि स्था-
वरलिंगांत मन्त्रसंस्कारांनीं महादेव राहतो सारांश, स्थावर आणि जंगम ह्या दोन्ही
लिंगांत महादेव आहेच. (७४) शिवरहस्यांत झटलें आहे कीं, स्थावरलिंग आणि जं-
गमलिंग हीं दोन्ही एकच आहेत असें मानलें आहे. शिव ह्मणतात पार्वती, असें
स्थावरलिंगांतील आणि जंगमलिंगांतील यथार्थज्ञान होणें फार कठिण काम आहे.
(७५) पदालाच देह असें ह्मणतात आणि पदाच्या अर्थाला प्राण असें ह्मणतात.
दोहोंमधील अंतर लिंगजंगम असें जाणावें. (७६) श्वेताश्वतरोपनिषदांत झटलें आहे कीं,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्वाभिधानवृतीयं देहभेदे विश्वैश्वर्यं केवलमाप्तकामः ॥७६॥ तथैवोक्तं वातुलतंत्रे ॥ गुरौ देवे समा बुद्धिर्यथा या शिवयोगिनि ॥ सैषा त्रिविधसंपत्तिः संवित्साम्राज्यशालिनाम् ॥७७॥ श्रुतिः ॥ त्रिविधार्पणेन किं लभ्यते शरीरनिवेदनात्प्रसादं लब्धवान् प्राणनिवेदनात् लिंगसंबंधित्वं लब्धवान् अर्थनिवेदनात् जंगमभक्तिं लब्धवान् ॥७८॥ सूतसंहितायाम् ॥ सत्यसिद्धिर्देहदानान्निवृत्तिस्त्वर्थदानतः ॥ प्राणदानाज्ज्ञानसिद्धिस्सर्वसिद्धिर्भवेत्त्रिभिः ॥७९॥ लिंगस्य तन्मनो दत्तं भक्तानामर्पितं धनम् ॥ गुरोः सर्वविधं दत्वा भक्तोऽहंकारवर्जितः ॥८०॥ शैवरत्नाकरे ॥ स्वांगे लिंगं गुरुर्भावे चरो ज्ञान इति त्रिधा ॥ यस्य धृतिः स्थितिर्जाता स श्लाघ्यः शिववर्त्मनि ॥८१॥ वासिष्ठपुराणे॥ लिंगं स्वांगे

---

त्या शिवाच्या नांवापासून निघालेल्या लिंग, गुरु, जंगम अशा तीन प्रकारच्या देहांमध्यें सर्व ऐश्वर्य आणि मोक्ष आहे ते दोन्ही भक्ताला मिळून सुखप्राप्ति होते. (७७) त्याप्रमाणेंच वातुलतंत्रांतही सांगितलें आहे कीं, गुरूविषयीं व देवाविषयीं जशी आपली भक्ति सारखी असते, तशीच शिवयोगी मनुष्याविषयीं आपले मनांत भक्ति असावी; जे ज्ञानरूप सार्वभौमराज्याचा पूर्णपणें अनुभव घेतात ( जे महाज्ञानी लोक आहेत )त्यांची, गुरूची, देवाची आणि शिवयोगीलोकांची भक्ति करणें ही तीन प्रकारची संपत्तिच आहे. (७८) श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, तीन प्रकारच्या वस्तु अर्पण केल्या असतां काय मिळतें? शरीर अर्पण केलें असतां प्रसादाची प्राप्ति होते, प्राण अर्पण केल्यास लिंगाचा आत्म्याशीं संबंध होतो, व द्रव्य अर्पण केलें असतां जंगमाची भक्ति आपणास प्राप्त होते. (७९) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, देहाचें दान केलें असतां सत्याची सिद्धि होते, अर्थाचें ( द्रव्याचें ) दान केलें असतां मोक्षप्राप्ति होते, प्राणदान केलें असतां ज्ञानाची सिद्धि होते, व देहदान, अर्थदान आणि प्राणदान हीं तिन्हीं दानें केलीं असतां, मनुष्यास सर्व प्रकारचीसिद्धि प्राप्त होते. (८०) लिंगाचें पूजन करितेवेळीं त्यास मनोभावानें द्रव्य अर्पण करावें; भक्ताला द्रव्य अर्पण करावें; आणि गुरूला सर्व प्रकारचें द्रव्य अर्पण करावें; असें वर्तन करणारास भक्त ह्मणतात; आणि त्या भक्तास गर्व मुळींच नसतो. (८१) शैवरत्नाकरांत सांगितलें आहे कीं, आपल्या शरीरावर इष्टलिंग धारण करावें, भावाचे टिकाणीं गुरूस धारण करावें ( गुरूवर विश्वास ठेवावा ), आणि ज्ञानाचे ठिकाणीं जंगमास धारण करावें ( जंगमाचें यथार्थरूप ज्ञानानें ओळखावें ). अशी तीन ठिकाणीं तीन प्रकारची ज्याची बुद्धि स्थिर झाली आहे, त्यास शिवधर्माचारांत फारच श्रेष्ठ मानलें आहे.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्रिधा प्रोक्तं बाह्याभ्यन्तरमादिमम्॥बाह्यक्रियामयं सूक्ष्ममंतश्चिन्मात्रमादिमम् ॥८२॥ शिवरहस्ये ॥ लिंगं स्यादिष्टरूपं तु जंगमं प्राणलिंगकम् ॥ भावलिंगं गुरुः प्रोक्तं त्रिविधं त्वेकमुच्यते ॥८३॥ अकारं लिंगरूपं च उकारं गुरुरूपकम् ॥ मकारं जंगमं ज्ञेयं ॐकारं च परः शिवः ॥८४॥ नादं हि गुरुरूपाख्यं बिंदुरूपं तु लिंगकम् ॥ कलारूपश्चरो ज्ञेयः सर्वशास्त्रसमुच्चयः ॥८५॥ जानीयात्सच्चिदानंदादेशिकेश्वरजंगमात् ॥ नित्यं पूर्णं तत्प्रसादस्वात्मभावेन भावयेत् ॥८६॥ वीरागमे ॥ लिंगांगी गुरुर्लिंगं स्यात्त्रिविधं लिंगमुच्यते ॥ प्रसादो मुक्तिमूलश्च प्रसादो लिंगमुच्यते ॥८७॥ पराशरस्मृतौ ॥ प्रांचो धावंति प्रांच इव हि सुवर्गौ लोकश्चतस्रभिरनुमन्त्रयते चत्वारि च्छंदांसि छंदोभिरेवैनान् सुवर्गं लोकं गमयति ॥८८॥ तथैवोक्तं शिवरहस्ये ॥ शिवाचार्या-

---

(८२) वासिष्ठपुराणांत सांगितलें आहे कीं, अंगावर धारण करावयाच्या लिंगाचें तीन प्रकार आहेत ते असे— १ बाह्यलिंग २ अभ्यंतरलिंग ३ आदिमलिंग. क्रियामयलिंगास बाह्यलिंग ह्मणतात, अभ्यंतरलिंगास सूक्ष्मलिंग ह्मणतात, आणि चिन्मात्रलिंगास आदिमलिंग असें ह्मणतात. (८३) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, इष्टलिंग ( रूप ) हें लिंग आहे, जंगमलिंगास प्राणलिंग ह्मणतात, आणि भावलिंगास गुरु असें ह्मणतात. हे लिंगाचे तीन भेद झाले तरी वास्तविक पाहतां ते एकच आहेत. (८४) अकार हा लिंगस्वरूप आहे, उकार हा गुरुस्वरूप आहे, मकार हा जंगमस्वरूप आहे आणि अ उ म मिळून झालेला ॐकार हा प्रत्यक्ष परशिवस्वरूप आहे. (८५) नाद हा गुरुस्वरूप आहे, लिंग हें बिंदुस्वरूप आहे, आणि जंगम हा कलास्वरूप आहे; असें सर्व शास्त्रांचें मुख्य मत आहे. (८६) त्या परब्रह्माचें यथार्थस्वरूप सत् चित् आणि आनंदस्वरूप असणाऱ्या गुरु श्रेष्ठ जंगमापासून समजावून घ्यावें. तें परब्रह्मस्वरूप नित्य असून परिपूर्ण आहे. तें प्रसादामुळें आपणास प्राप्त झालेल्या आत्मज्ञानाच्या साधनानें जाणून घ्यावें. (८७) वीरागमांत असें सांगितलें आहे कीं, लिंगांगी, गुरु, आणि लिंग, हे लिंगाचे तीन प्रकार आहेत. प्रसाद हा मोक्षप्राप्तीचें मूल असून प्रसादालाच लिंग असें ह्मणतात. (८८) पाराशरस्मृतींत सांगितलें आहे कीं, प्राचीनलोक सुखावें पाहणारें असून जातात ( चांगलें वर्तन करतात ); प्राचीन लोकांप्रमाणें गुरु, लिंग, जंगम आणि प्रसाद ह्या चार वस्तूशीं अनुसरून ध्यान करावें, वेद हे चार वेदस्वरूप अशा गुरुलिंगजंगमप्रसाद ह्या चार पदार्थांच्या द्वारानें भक्तांस चांगली गति देतात. (८९) तसेंच शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, शिवाविषयीं, आचार्याविषयीं, अतिथी-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तिथिष्वेतत्प्रसादेप्येकरूपिणी ॥ सा चतुर्विधसारोक्ता भक्तिरव्यभिचारिणी ॥८९॥ वातुलतंत्रे ॥ प्रसादे जंगमे लिंगे गुराविति चतुर्विधा ॥ भक्तिः सारा भवेद्यस्तु चतुर्विधसुभक्तिमान् ॥९०॥ गुरुर्लिंगं चरो यस्तु प्रसादोप्येकरूपतः ॥ चतुरो भजते भक्त्या तद्वृत्तिं भक्त आस्तिकः ॥९१॥ वृत्तम् ॥ तथा न भवति चेच्छरीरवंचकस्य प्रसादसेवनासौख्यं न भवति प्राणवंचकस्य तल्लिंगसंबंधपदं न भवत्यर्थवंचकस्य तदपरावतारजंगमपरिचर्याफलं न भवति ॥९२॥ स्वगुरोः पादशुश्रूषो लिंगनिष्ठावधानकः ॥ चरे विश्वाससंयुक्तः प्रसादे परमः सुखी ॥९३॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ दानं तु त्रिविधं प्रोक्तं सोपाधिनिरुपाधिकम् ॥ सहजं चेति निर्दिष्टं सर्वतंत्रविशारदैः ॥९४॥ छंदोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ त्रयो धर्मस्कन्धाः यज्ञोध्ययनं दानमिति ॥९५॥ शिवधर्मशास्त्रे ॥ गोमयं रोचनं मूत्रं दधि क्षीरं घृतं गवाम् ॥ षडं-

---

विषयीं आणि प्रसादाविषयीं एकसारखी असणारी (सर्वांस सारखें मानणारी भक्ति) ही निष्कपटपणाची भक्ति होय आणि ह्या भक्तीलाच चतुर्विध भक्ति असें ह्मणतात. (९०) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, प्रसादाविषयीं जंगमाविषयीं, लिंगाविषयीं आणि गुरुविषयीं भक्ति असणें ही चतुर्विध भक्ति होय. ही चांगल्या रीतीची चार प्रकारची भक्ति ज्याचे अंगीं आहे त्यास चतुर्विधभक्तिमान् असें ह्मणतात. (९१) जो भक्त गुरु, लिंग, जंगम आणि प्रसाद ह्यास अगदीं सारखें मानतो, व भक्तिभावानें त्या चौघांची भक्ति करितो, त्या भक्तास आस्तिक असें ह्मणावें. (९२) तसें जर होत नाहीं तर शरीराची वंचना करणाऱ्या प्राण्याला प्रसादसेवनाचें सुख मिळत नाहीं, प्राणाची वंचना करणाऱ्याला लिंगसंबंधाचें पद मिळत नाहीं, आणि अर्थाची वंचना करणाऱ्याला गुरूचा दुसरा अवतारच अशा जंगमाच्या सेवेचें फळ मिळत नाहीं, (९३) जो चांगल्या स्वभावाचा भक्त आहे तो आपल्या गुरूची चरणसेवा मनापासून करितो, लिंगावर एकाग्रमनानें विश्वास ठेवितो, जंगमावर विश्वास ठेवितो, आणि प्रसाद भक्षण करण्यांत अतिशय सुख मानतो. (९४) सिद्धांतशिखामणींत ह्मटलें आहे कीं, सर्व प्रकारचीं शास्त्रें ज्यांनीं चांगल्या तऱ्हेनें वाचलीं आहेत असे ज्ञानी लोक दानाचे तीन भेद मानतात ते १ सोपाधिदान, २ निरुपाधिदान आणि ३ सहजदान, हे होत. (९५) छंदोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, यज्ञ, अध्ययन आणि दान हे तीन धर्मांचे प्रकार (शाखा) आहेत. (९६) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, गाईचें शेण, गोरोचन, गोमूत्र, गाईचें दहीं, गाईचें दूध, गाईचें तूप, हे सहा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गानि पवित्राणि ह्येतैः संमार्जनं चरेत् ॥९६॥ संमार्जनाच्छतं पुण्यं सहस्रमनुलेपनात् ॥ रेखादशसहस्राणि पद्मं मुखमनुत्तमम् ॥९७॥ यव गोधूमपिष्टैर्वा मौक्तिकैस्तंदुलैस्तु वा ॥ मरकतप्रस्तरैर्वापि रंगवल्लीति च स्मृता ॥९८॥ कृष्णाजिने ज्ञानसिद्धिर्मोक्षश्रीर्व्याघ्रचर्मणि ॥ पट्टासने व्याधिनाशो वेत्रे भूताघनाशनम् ॥९९॥ पट्टासने तथा पुष्टिः शांतिश्च श्वेतकर्पटे ॥ सर्वेष्वपि च कार्येषु रत्नकम्बलमुत्तमम् ॥१००॥ अथ दिङ्लक्षणम् ॥ तत्पूर्वाभिमुखं वश्यं दक्षिणं चाभिचारकम् ॥ पश्चिमं धनधान्यं च ह्युत्तरं शांतिदं भवेत् ॥१०१॥ आग्नेयमाकर्षणं स्यान्नैऋतं द्वेषणं तथा ॥ वायव्यमुच्चाटनं स्यादीशान्यं ज्ञानमेव च ॥१०२॥ इक्षु-

---

पदार्थ फार पवित्र आहेत. शिवालयाची जमीन सारविणें झालें तर ह्या सहा पदार्थांनीं जमीन सारवावी ह्मणजे ती शुद्ध होते. (९७) शिवालयांतील जमीन झाडली असतां जें पुण्य लागतें त्याच्या हजारपट पुण्य शिवालयांतील जमीन सारविली असतां लागतें, त्यापेक्षां त्यावर रांगोळीच्या रेघा काढल्या असतां दहा हजारपट जास्त पुण्य लागतें, व ती रांगोळी काढण्यांत पद्म वगैरे काढणें तर फारच चांगलें आहे; त्याचें अनंत पुण्य लागतें. (९८) यवाचें पीठ किंवा गव्हाची कणीक, किंवा मोत्यांचा चुरा किंवा तांदुळाचें पीठ किंवा मरकतमण्याचें पीठ घेऊन रांगोळी घालावी; त्याला रांगोळी असें ह्मणतात. (९९) हरिणाच्या कातड्याच्या आसनावर वसून जप केला असतां ज्ञानाची प्राप्ति होते. वाघाच्या कातड्यावर वसून जप केला असतां मोक्षप्राप्ति होते. पट्टासनावर वसून जप केला असतां शरीरास व्याधि झाली असली तर ती दूर होते. आणि वेताच्या आसनावर वसून जप केला असतां पिशाचबाधा दूर होते. (१००) पट्टासनावर वसून जप केला तर पुष्टि आणि पांढऱ्या फडक्यावर वसून जप केला तर शांति प्राप्त होते; कोणत्याही प्रकारचें कार्य असो त्यावेळीं रत्नकंबल वापरणें फार श्रेयस्कर आहे. (१०१) आतां दिशांचें लक्षण सांगतों. पूर्वेकडे तोंड करून जप केला असतां आपणास जो कोणी वश ( अनुकूल ) व्हावा असें वाटतें तो वश होतो, दक्षिणेकडे तोंड करून जप केला तर जारण, मारण, उच्चाटन वगैरेची सिद्धि होते, पश्चिमेकडे तोंड करून जप केला तर द्रव्य आणि धान्य ह्यांची प्राप्ति होते, उत्तरेकडे मुख करून जप केला तर शांति मिळते. (१०२) आग्नेय दिशेकडे तोंड करून जप केला तर लोकांचीं मनें आपलेकडे ओढून घेतां येतात, नैऋत्येकडे तोंड करून जप केला तर वैर वाढतें, वायव्यदिशेकडे तोंड करून जप केला तर उच्चाटन करितां येतें आणि ईशान्येकडे तोंड करून जप केला असतां ज्ञानाची प्राप्ति होते. (१०३) उंसाचा रस, गाईचें दूध, नारळाचें दूध, तसेंच मध आणि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्षीरं गवां क्षीरं नालिकेरं तथा मधु ॥ रंभाफलं च संयुक्तं पंचामृतमिति स्मृतम् ॥१०३॥ अरुणोदयवेलायां यः करोति शिवार्चनम् ॥ ऋणत्रयविनिर्मुक्तः शिवलोकमवाप्नुयात् ॥१०४॥ वृत्तम् ॥ जीर्णार्कपर्णपुटसंस्थितमर्घ्यमार्यों व्यासस्समस्तगुणबुद्धिमवाप्यचाभूत् ॥ सर्वैस्समर्चिपदाब्जयुगो मुनीन्द्रैर्दत्वा शिवाय विधिवत्स पितुर्नियोगात् ॥१०५॥ ग्रन्थातरे ॥ येऽपि दम्भं समाश्रित्य भक्ता मदुपजीवकाः ॥ संसारात्तेऽपि मुच्यन्ते किं पुनर्मत्परा जनाः ॥१०६॥ शिवरहस्ये ॥ मृतस्य जीवतो वापि शिवभक्तस्य नारद ॥ यमाद्भयं न तस्यास्ति राज्ञश्चैव तु का कथा ॥१०७॥ लैंगे ॥ ये च वा सकृदप्यत्र पूजयन्ति त्रिलोचनं ॥ ते धन्यास्ते महात्मानस्ते कृतार्थाश्च पंडिताः ॥१०८॥ हरिवंशे ॥ पुरुहूतनारदसंवादे ॥ कदाचिदीशपादाम्बुनिर्माल्यपरिमेलितः ॥ पवनः पन्नगेशेन निपीतः पुण्यकारिणा ॥१०९॥ तेन विश्वंभराभारधुरीणत्वम-

---

केळें, हीं एकेठिकाणीं कालविलीं ह्मणजे त्या रसास पंचामृत असें ह्मणतात. (१०४) अरुणाचा उदय होण्याचे वेळेस (तांबडे फुटण्याच्या वेळेस) कोणी मनुष्य शिवाची पूजा करितो, तो तीन प्रकारच्या ऋणां (देवऋण, पितृऋण आणि पुत्रऋण) पासून मुक्त होतो आणि मरणानंतर शिवलोकास जातो. (१०५) प्रत्यक्ष श्रीवेदव्यासांनीं देखील आपल्या बापाच्या (पराशर ऋषीच्या) आज्ञेप्रमाणें यथाविधीनें पिकलेल्या रुईच्या पानाचा द्रोण करून त्यांतील अर्घ्य शिवास अर्पण केलें त्यामुळें तो वेदव्यास इतका बुद्धिमान झाला कीं, मोठमोठाले ऋषीश्वर देखील त्या व्यासाचे पदकमलाची सेवा करूं लागले. (१०६) दुसऱ्या ग्रंथांत देखील असें सांगितलें आहे कीं जे कोणी लोक व्यर्थ अवडंबर माजवून माझी भक्ति करण्याचा डौल दाखवितात, व माझे नांवावर आपला चरितार्थ चालवितात, ते लोक देखील मुक्त होतात; मग मला एकाग्रमनानें भजणारे लोक मुक्त होतील ह्मणून काय सांगावयाचें आहे? ते तर मुक्त होतीलच होतील. (१०७) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, नारदा, शिवभक्त मनुष्य जिवंत असो, किंवा मरण पावो, त्याला यमापासून देखील भय नाहीं; मग राजापासून भय होईल ही कल्पना देखील नको, त्याला त्रिभुवनांत कोठेंच भय नाहीं. (१०८) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे कोणी मनुष्य फक्त एकवेळ शिवपूजा करितात ते धन्य होत, ते महात्म्ये होत, ते कृतकृत्य होत, ते पंडित होत. (१०९) हरिवंशांत इंद्राचा आणि नारदाचा संवाद आहे कीं, कोणे एके दिवशीं (वेळीं) परमेश्वराचे चरणोदक आणि निर्माल्य मिश्र झालेला वारा शेष (वासुकी) प्याला त्यामुळें तो मोठा पुण्यवान होऊन (११०) त्याला सर्व पृथ्वीचें ओझें नेहमीं उ-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वाप्यते ॥ भोगीश्वरत्वमचलमीशभूषणतापि च ॥ सर्वज्ञता च संजाता देवेंद्र न हि संशयः ॥११०॥ ऋग्वेदे ॥ भुवनस्य गोपाअतिथयः ॥ ॥१११॥ शिवयोगप्रदीपिकायाम् ॥ वृत्तम् ॥ धन्यानि तानि नगराणि निरामयानि नित्योत्सवानि विजयोत्तरभूपतीनि ॥ एकोऽपि यत्र शिवयोगसमाहितात्मा पद्भ्यां पवित्रयति पावनपादुकाभ्याम् ॥११२॥ वासिष्ठे ॥ दुर्वारघोरसंसारक्रूररोगैकभेषजः ॥ प्रणतालिकविन्यस्तदुर्वर्णपरिमार्जकः ॥११३॥ सुदूरमपिगन्तव्यं यत्रमाहेश्वरो जनः ॥ प्रयत्नेनापि द्रष्टव्यस्तत्र सन्निहितः शिवः ॥११४॥ शिवधर्मपुराणे ॥ गंगास्नानाधिकं पुण्यं दर्शनाच्छिवयोगिनः ॥ सर्वतीर्थाभिषेकाच्च तत्संभा-

---

चलण्याचें सामर्थ्य आलें; त्याला अक्षय सर्व नागांचें अधिपत्य मिळालें; आणि परमेश्वराचे ( शिवाचे ) अंगावर अलंकाराचे रूपानें राहण्याची योग्यताही आली. नारद ह्मणाले इंद्रा तुला फार काय सांगूं? त्यामुळें त्या शेषाला सर्वज्ञपणाही मिळाला, ह्यांत संशय नाहीं. (१११) ऋग्वेदांत ह्मटलें आहे कीं, अतिथि ( जंगम लोक ) पृथ्वीचें रक्षण करणारे आहेत. (११२) शिवयोगप्रदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, ज्या नगरांत एकच कां असेना परंतु तो शिवयोगी आपले शिवधर्म योग्यरीतीनें पाळून आपल्या पादुका घातलेल्या पवित्र चरणांनीं तेथील जमीन पवित्र करितो, तीं नगरें धन्य होत. त्या नगरांत कोणत्याही रीतीचा उपद्रव होत नाहीं. त्या नगरांत नेहमीं आनंदाचे प्रकार सुरू असतात; व तेथील राजांस वरचेवर जय मिळतात, त्यांचा पराजय कधींच होत नाहीं. (११३) वासिष्ठपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगम हा अचुक गुणकारी व भयंकर संसाररूपदुर्धररोग दूर करण्यास रामबाण औषध आहे ( जंगमाची सेवा केली असतां संसाररोग दूर होतो ). नमस्कार करणाऱ्या भक्ताच्या दुर्दैवानें त्याचे कपाळीं वाईट अक्षरें ब्रह्मदेवांनीं लिहिलीं असलीं तरी तीं पुसून जातात ( जंगमास नमस्कार केल्यानें दुर्दैवानें भोगावें लागणारें दुःख भोगावें लागत नाहीं ). (११४) माहेश्वर ( जंगम ) जेथें राहतो तें ठिकाण आपल्या राहण्याच्या ठिकाणापासून फार दूर असलें, तरी तेथें जाऊन जंगमाचें दर्शन मोठ्या अगत्यानें घ्यावें; कां तर तेथें शिव अगदीं जवळ राहतो ( जंगमाचें दर्शन घेतलें तर शिवदर्शन घेतल्याचें श्रेय आहे ). (११५) शिवधर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, गंगास्नान केलें तर जें पुण्य लागतें, त्यापेक्षां शिवयोग्याचें दर्शन घेतलें असतां जास्त पुण्य लागतें पृथ्वीवर जितकीं कांहीं पवित्र तीर्थें आहेत त्या तीर्थांत स्नानें केलीं असतां जें कांहीं पुण्य लागतें, त्यापेक्षां जंगमांशीं बोलल्या, चालल्यानें, संभाषणानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पणमुत्तमम् ॥११५॥ ज्ञानयोगखण्डे॥ वृत्तम् ॥ महात्मनो ज्ञानवतः प्रदर्शनात्सुरेश्वरत्वं झडिति प्रयाति ॥ अपारसंसारमहोदधिं नरो विहाय तत्पादबलादहो मुने ॥११६॥ भागवते ॥ नह्यंमयानि तीर्थानि न देवा मृच्छिलामयाः ॥ ते पुनंत्युरुकालेन दर्शनादेव साधवः ॥११७॥ शिवरहस्ये ॥ शिवयोगीक्षणं पुण्यं स्पर्शनं पापनाशनम् ॥ संभाषणं सर्वतीर्थं वंदनं मोक्षकारणम् ॥११८॥ शिवपुराणे ॥ अनेनैव तु देहेन रुद्रः संतिष्ठते क्षितौ ॥ पापहा सर्वमर्त्यानां सल्लापाद्दर्शनादपि ॥११९॥ शंकरसंहितायाम् ॥ यत्र तिष्ठति लिंगांगसंबंधीशपरायणः ॥ निमिषं निमिषार्धं वा तच्छिवक्षेत्रमुच्यते ॥१२०॥ स्वयंभु यत्र वा लिंगं यत्र वा शिवयोगिनः ॥ तत्र योजनपर्यन्तं वाराणस्याःसमंततः ॥१२१॥ यस्मिन् क्षेत्रे शिवो नास्ति नास्ति माहेश्वरो जनः ॥ तच्च स्थानं न गन्तव्यं

---

जास्त पुण्य लागतें. (११६) ज्ञानयोगखण्डांत झटलें आहे कीं, मुनिश्रेष्ठा, जो शिवयोगी महात्मा आणि सज्जन आहे त्याचें दर्शन घेतलें असतां मनुष्य त्या शिवयोग्याच्या चरणाच्या सामर्थ्यानें संसाररूप अपार समुद्र तरून जाऊन तत्काळ देवपणा पावतो. (११७) भागवतांत झटलें आहे कीं, ही जलस्वरूप तीर्थें कांहींच नाहींत, किंवा मातीचे दगडाचे देव कांहींच नव्हत त्यांच्या अंगीं देवपणा आहे ही गोष्ट खरी आहे, परंतु त्यांचें आराधन केलें असतां फार दिवसांनीं तीं तीर्थें आणि ते देव त्या मनुष्यास पवित्र करितात; पण सज्जनाचें दर्शन झाल्यावरोबरच ते दर्शन घेणारास पवित्र करितात. (११८) शिवरहस्यांत झटलें आहे कीं, शिवयोग्याचें दर्शन घेतलें तर पुण्य लागतें, त्यास स्पर्श केला असतां पातकाचा नाश होतो, शिवयोग्याशीं संभाषण केलें असतां सर्व तीर्थांत स्नान केल्याचें श्रेय लागतें, व त्या शिवयोग्याला नमस्कार केला असतां मोक्षप्राप्ति होते. (११९) शिवपुराणांत झटलें आहे कीं, शिवयोग्याचें स्वरूप घेऊन प्रत्यक्ष श्रीशंकर ह्या पृथ्वीवर अवतरलेला आहे. त्याच्याशीं भाषण केलें असतां किंवा निदान त्याचें दर्शन घेतलें असतां सर्व मनुष्यांचीं पापें नाहींशीं होतात. (१२०) शंकरसंहितेंत झटलें आहे कीं, ज्या ठिकाणीं लिंगांगसंबंधी आणि ईश्वरभक्तींत निमग्न असणारा शिवयोगी एक पळभर किंवा अर्धपळभर जरी राहिला तरी त्या ठिकाणास शिवक्षेत्र असें ह्मणावें. (१२१) जेथें स्वयंभु शिवलिंग आहे, किंवा जेथें शिवयोगी लोक राहतात, तेथें आसपास चार कोस पर्यंत काशीक्षेत्र असल्यासारखें समजावें. (१२२) ज्या ठिकाणीं शिवलिंग नाहीं किंवा ज्या ठिकाणीं जंगम रहात नाहीं, त्या ठिकाणीं मनुष्यानें जाऊं देखील नये, तें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विद्यं नरवनान्तरम् ॥१२२॥ शिवरहस्ये ॥ चंडालवाटिकायां वा शिवभक्तः स्थितो यदि ॥ तच्छ्रेणिः शिवलोकः स्यात्तद्गृहं शिवमंदिरम् ॥१२३॥ स्कांदे ॥ तस्मिन्सदाशिवः सोमः सर्वभूतगणावृतः ॥ सर्वतीर्थैश्च यज्ञैश्च सांनिध्यं कुरुते सदा ॥१२४॥ वृत्तम् ॥ माहेश्वरस्य हृद्यांबुजकर्णिकायां मध्ये वसामि गिरिराजसुतासहायः ॥ संपूजयेद्य इह मां मनुजोऽर्चयेच्च तस्मै ददामि शिखिवाहन वांच्छितार्थान् ॥१२५॥ यत्र माहेश्वरः कुर्याच्छिवलिंगार्चनं सकृत् ॥ वसंति तत्र तीर्थानि सर्वाणि सततं गुह ॥१२६॥ तस्मात्सर्वं परित्यज्य वीरमाहेश्वरं जनम् ॥ पूजयेदादराद्यस्तु स सम्यग्ज्ञानवान्भवेत् ॥१२७॥ वृत्तम् ॥ न वीरमाहेश्वरसेवया विना शिवस्य भक्तिर्मनुजस्य विद्यते ॥ विनास्ति भक्त्या शिववेदनं न हि प्रधानमेतच्छिवभक्तपूजनम् ॥१२८॥ शिवधर्मोत्तरे ॥ पात्रापात्रविशेषोऽस्ति धेनुपन्नगयोरिव ॥ तृणात्संजायते क्षीरं क्षीरात्संजायते विषम् ॥१२९॥ पात्रशासनयोर्मध्ये शासनं तु विशिष्यते॥

---

प्रत्यक्ष भयाण अरण्य आहे असें समजावें. (१२३) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, महारवाड्यांत जरी शिवभक्त राहत असला तरी तो सर्व महारवाडा शिवलोक असल्यासारखा समजावा. आणि त्या शिवभक्ताचें घर प्रत्यक्ष शिवालय असल्यासारखें समजावें. (१२४) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, त्या शिवभक्ताच्या शरीरांत सदाशिव स्वतः पार्वतीसहित आणि सर्व प्रमथगणांसहित राहतो; सर्व तीर्थें आणि सर्व यज्ञ त्या शिवभक्ताजवळ येऊन राहतात. (१२५) शंकरांनीं स्वतः असें ह्मटलें आहे कीं, मुला षडानना, जंगमाच्या हृदयकमलामध्यें मी पार्वतीसहित नेहमीं राहतो. जो कोणी मनुष्य त्या ठिकाणीं माझी पूजा करितो त्याचे सर्व मनोरथ मी पूर्ण करितों. (१२६) मुला कार्तिकेया, ज्याठिकाणीं जंगम फक्त एकवेळ शिवाचें पूजन करितो, त्याठिकाणीं सर्व तीर्थें नेहमीं येऊन राहतात. (१२७) ह्यासाठीं इतर सर्व व्यवहार सोडून, वीरमाहेश्वर मनुष्याची जो कोणी मनुष्य आदरसत्कारानें पूजा करील, तो मोठा ज्ञानसंपन्न होईल. (१२८) वीरमाहेश्वराची सेवा करणें हेंच मनुष्यानें शिवभक्ति करण्यासारखें आहे, वीरमाहेश्वराच्या भक्तीखेरीज दुसरी शिवभक्तिच नाहीं. भक्ति केल्याखेरीज मनुष्याला शिवाचें यथार्थज्ञान होत नाहीं. ह्यासाठीं शिवभक्तांचें पूजन करणें हा मुख्य पक्ष आहे. (१२९) शिवधर्मोत्तरांत सांगितलें आहे कीं, गाय आणि साप ह्या दोन प्राण्यांमध्यें जसें अंतर आहे, तसें सत्पात्र कुपात्र ह्यांतही भेद आहे. कां तर गाईच्या पोटांतून दूध निघतें, आणि तें दूध सापास पाजिलें असतां त्यापासून विष होतें, इतकें दोहोंत अंतर आहे. (१३०) पात्र आणि शासन ह्या दोहोंत शासनच (शिव-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तस्माच्छासनमेवादौ पूज्यते च शिवो यथा ॥१३०॥ नोपवीतसहस्रेभ्यो ब्रह्मचारी विशिष्यते ॥ ब्रह्मचारिसहस्रेभ्यो वेदाध्यायी विशिष्यते ॥१३१॥ वेदाध्यायिसहस्रेभ्यश्चाग्निहोत्री विशिष्यते ॥ अग्निहोत्रिसहस्रेभ्यो यज्ञयाजी विशिष्यते ॥१३२॥ यज्ञयाजिसहस्रेभ्यो सत्रयाजी विशिष्यते ॥ सत्रयाजिसहस्रेभ्यो सर्वविद्यार्थपारगः ॥ सर्वविद्यार्थवित्कोट्या शिवभक्तो विशिष्यते ॥१३३॥ तस्मात्पात्रतमं ज्ञात्वा शिवभक्तमकल्मषम् ॥ तस्मै सर्वं प्रदातव्यमक्षयं फलमिच्छता ॥१३४॥ शिवरहस्ये ॥ न मे प्रियश्चतुर्वेदी मद्भक्तः श्वपचोऽपि वा॥ तस्मै देयं ततो ग्राह्यं स च पूज्यो यथा ह्यहम् ॥१३५॥ शिवभक्ताय यद्दानं भक्त्या दत्तं यदर्चितम् ॥ तदहं चानुगृण्हामि तेनानंत्यं तदुच्यते ॥१३६॥ वा-

---

लांछन भस्म रुद्राक्ष भगवें वस्त्र ) श्रेष्ठ आहे. ह्यासाठीं जशी अगोदर शिवाची पूजा करितात तशी अगोदर शासनाची पूजा करावी. ( भस्म, रुद्राक्ष धारण करावें असें तात्पर्य आहे ). (१३१) हजार मुंज न केलेल्या ब्राह्मणांपेक्षां ब्रह्मचारीश्रेष्ठ आहे, हजार ब्रह्मचाऱ्यापेक्षां वेदाध्ययन करणारा श्रेष्ठ आहे. (१३२) हजार वेदाध्ययन करणाऱ्यांपेक्षां एक अग्निहोत्री ब्राह्मण श्रेष्ठ आहे, हजार अग्निहोत्री ब्राह्मणांपेक्षां यज्ञयाग करणारा श्रेष्ठ आहे. (१३३) हजार यज्ञयाग करणाऱ्यांपेक्षां सत्रयाग ( अमुक हजार वर्षेपर्यंत पुराण श्रवण करण्याचा नियम ) करणारा श्रेष्ठ आहे, त्या हजार सत्रयाग करणाऱ्यांपेक्षां सर्व विद्यांचे अर्थ यथार्थरीतीनें जाणून त्यांत पारंगत झालेला ज्ञाता श्रेष्ठ आहे; आणि अशा विद्यांचे अर्थ जाणणाऱ्या कोटि मनुष्यांपेक्षां शिवभक्त श्रेष्ठ आहे. (१३४) ह्यासाठीं शिवभक्तच उत्तमोत्तम पात्र आहे असें समजावें. शिवभक्ताला कोणत्याही प्रकारचा दोष नाहीं. ज्यास अक्षयफळ मिळावें अशी इच्छा असेल, त्यानें काय दान करणें असेल तें सर्व दान त्या शिवभक्तासच करावें. (१३५) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, एखादा ब्राह्मण चार वेद तोंडानें पाठ ह्मणणारा असला तरी तो जर माझी भक्ति करणारा नसेल, तर तो मला आवडत नाहीं; तो चांडाल जातीचा असून माझी भक्ति करणारा असेल तर तो मला फार आवडतो, त्याला काय पाहिजे असेल तें द्यावें आणि त्यापासून काय पाहिजे असेल तें घ्यावें. जसा मी पूज्य आहें तसाच तो माझा भक्तही पूज्य आहे. (१३६) शिवभक्ताला जें दान भक्तिभावानें अर्पण केलें असेल, किंवा शिवभक्ताची भक्तिभावानें जी कांहीं पूजा केली असेल, तें दान व ती पूजा मी स्वतः ग्रहण करितों. आणि ते दान अनंत फळ देणारें आहे असें मानलें आहे. (१३७) वायवीयसंहितेंत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यवीयसंहितायाम् ॥ चतुर्वेदधरो विप्रः शिवभक्तिविवर्जितः॥ तस्य कांचनदानेन दातापि नरकं व्रजेत् ॥१३७॥ शैवरत्नाकरे ॥ शिवभक्तमतिक्रम्य यच्चान्यस्मै प्रदीयते ॥ निष्फलं तु भवेद्दानं नरकं च प्रपद्यते ॥१३८॥ शिवधर्मोत्तरे ॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वाप्यंत्यजोऽपि वा ॥ शिवभक्तः सदा पूज्यः सर्वावस्थां गतोऽपि वा ॥१३९॥ नित्यं नैमित्तिकं काम्यं विमलं च चतुर्विधम् ॥ दानं पात्रे प्रदातव्यं नापात्रेऽप्यणुमात्रकम् ॥१४०॥ शिवस्य प्रीणनार्थं तु शिवभक्ताय दीयते ॥ दानं तद्विमलं प्रोक्तं केवलं मोक्षसाधनम् ॥१४१॥ स्कांदे ॥ वृत्तम् ॥ अहो महांतं परमार्थदर्शनं विहाय मायापरिमोहिता जनाः ॥ विहाय लोके विचरंति शंभुं विषं पिबन्तीव महामृतं विना ॥१४२॥ सूतसंहितायाम्॥ यथा राजा जनैः सर्वैः पूज्यते मुनिसत्तमाः ॥ तथा योगी सदा देवैर्मुनिभिः पूज्य एव हि ॥१४३॥ शिवधर्मशास्त्रे॥ असंयतः संयतो वा सर्वा-

---

म्हटलें आहे कीं, जो कोणी ब्राह्मण चार वेद मुखोद्गत झालेला असेल, परंतु जो शिवभक्ति करणारा नसेल, त्याला सुवर्ण दान दिलें, तर तो दान देणारा नरकास जातो. (१३८) शैवरत्नाकरांत म्हटलें आहे कीं, दान द्यावयाचें तें शिवभक्तास न देतां दुसऱ्या कोणास दिलें तर त्या दानाचा कांहींएक उपयोग होत नाहीं; व उलट तो दान देणारा नरकाला मात्र जातो. (१३९) शिवधर्मोत्तरांत सांगितलें आहे कीं, ब्राह्मण असो, क्षत्रिय असो, वैश्य असो किंवा शूद्र असो, शिवभक्त नेहमीं पूज्यच आहे मग तो कोणत्याही स्थितींत कां असेना? तो पूज्यच आहे. (१४०) दानाचे –१ नित्यदान, २ नैमित्तिकदान ३ काम्यदान व ४ विमलदान असे चार भेद आहेत. दान देणें झालें तरी तें पात्र पाहूनच द्यावें. अपात्राला थोडें देखील दान देऊं नये. (१४१) शिव आपणावर प्रसन्न व्हावें ह्या हेतूनें शिवभक्तास जें दान द्यावयाचें त्यास विमलदान असें म्हणतात. तें दान निःसंशय मोक्षप्राप्ति करून देणारें आहे. (१४२) काय आश्चर्य आहे पहा! परमार्थदर्शन हें फार श्रेष्ठ आहे; त्याला हे अज्ञानपणानें गांजून गेलेले लोक सोडून देतात व लोकांमध्यें निष्कारण भटकत फिरतात. तसेंच शंकरास सोडून, अमृत सोडून ज्याप्रमाणें विष प्यावें त्याप्रमाणें इतर देवांस भजतात. (१४३) सूतसंहितेंत म्हटलें आहे कीं, हे मुनीश्वरहो, जसा राजा सर्व लोकांकडून पूजा घेतो ( सर्व लोकांपेक्षां श्रेष्ठ आहे,) तसा शिवयोगी हा सर्व देवांपेक्षां आणि सर्व मुनीश्वरांपेक्षां श्रेष्ठ आहे. सर्व देव आणि मुनि त्या शिवयोग्याची पूजा करितात.(१४४) इंद्रियनिग्रहवान् असो, किंवा इंद्रियनिग्रहवान् नसो, किंवा तो कोणत्याही स्थितींत असो,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वस्थां गतोऽपि वा ॥ यो वा को वा शिवे भक्तः शिववत्पात्रमुत्तमम् ॥१४४॥ न्यायार्जितस्य वित्तस्य त्याग एव हि रक्षणम् ॥ तटाकोदरसंस्थानां परिवाह इवांभसाम् ॥१४५॥ न्यायार्जितस्य वित्तस्य द्वावनर्थौ प्रकीर्तितौ ॥ अपात्रे प्रतिपत्तिश्च पात्रे चाप्रतिपादनम् ॥१४६॥ दधीचिरुवाच ॥ अपूज्यपूजनाच्चैव पूज्यानां चाप्यपूजनात् ॥ नरः पापमवाप्नोति महद्वै नात्र संशयः ॥१४७॥ शिवरहस्ये ॥ वृत्तम् ॥ नाहं तथाग्नि यजमानहविर्वितानैः स्यात्तध्दुतं प्लुतमिदं हुतभुङ्मुखेन ॥ यज्जंगमस्य पुरतश्चरतोऽन्नमेवं तृप्तिर्न मे ह्यवहितैर्निजकर्मपाकैः॥१४८॥शिवपुराणे ॥ क्षीयन्ते च वरारोहे तपोयज्ञक्रियादयः ॥ न क्षीयन्ते वरारोहे भक्तवक्त्रहुतं हविः ॥१४९॥ शैवसंहितायाम् ॥ माहेश्वरमुखक्षेत्रमनूपकमशार्करम् ॥ वापयेत्सर्वबीजानि सा कृषिः सर्वकालिका ॥१५०॥

---

जो कोणी शिवाची भक्ति करितो तो शिवासारखा पूज्य आहे. त्यासारखे पात्र दुसरें नाहींच (१४५) खरेपणानें मिळविलेल्या पैशाचा दानधर्म करणें हेंच त्याचें रक्षण करणें आहे. तलावांत तुडुंब भरलेलें पाणी तसेंच कायम ठेवावयाचें असेल तर त्याचा पाट काढून दिलाच पाहिजे. नाहींपेक्षां सर्व तलाव फुटून जावयाचा. (१४६) खरेपणानें मिळविलेल्या पैशाचे दोन दुरुपयोग आहेत असें मानलें आहे; तें असें पात्र नसेल त्या ठिकाणीं दान करणें, आणि पात्राचे ठिकाणीं दान न करणें. (१४७) दधीचीनें ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य आदरसत्कार करण्यास योग्य नाहीं, त्याचा आदरसत्कार करावयाचा; आणि जो मनुष्य आदरसत्कार करण्यास योग्य असेल, त्याचा आदरसत्कार करावयाचा नाहीं; असें करणाऱ्या मनुष्यास मोठें पाप लागतें; ह्यांत कांहीं शंका नाहीं. (१४८) शिव ह्मणतात पार्वती, यजमानाच्या हविष्यान्नाच्या समुदायांनीं माझी तशी तृप्ति होत नाहीं किंवा अग्नीच्या तोंडांत जाळलेल्या तुपानें तशी तृप्ति होत नाहीं. नेहमीं पृथ्वीवर संचार करणाऱ्या जंगमापुढें ठेविलेलें अन्न त्यानें भक्षण केल्यानें जशी माझी तृप्ति होते, तशी सावधानपणानें आपआपलीं कर्में यथाविधीनें शेवटास नेलीं तरी होत नाहीं. जंगमास अर्पण केलेल्या वस्तूंनीं जशी माझी तृप्ति होते, तशी दुसऱ्या कोणत्याही रीतीनें होत नाहीं. (१४९) शिवपुराणांत शिवांनीं ह्मटलें आहे कीं, हे पार्वती, यज्ञ, याग, क्रिया वगैरे सर्व कर्में कालांतरानें नाश पावतात; परंतु भक्ताच्या (शिवभक्ताच्या) मुखांत जें तूप घातलें तें कधींही नाश पावत नाहीं. (१५०) शैवसंहितेंत सांगितलें आहे कीं, जंगमाचें तोंड एक शेत आहे, त्यांत खडकाळ जमीन नाहीं किंवा रेतीची जमीन नाहीं. तेथील जमीन सर्वकाळ नांगरलेली असल्यासारखी आहे तेथें सर्व प्रकारचीं चांगलीं चांगलीं बियें पेरावींत. (जंगमास चांगले चांगले पदार्थ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अंशुमदागमे ॥ सर्वव्रतानि नियमाः प्राणलिंगीशतात्परः ॥ तद्व्रती मम देहस्तु मन्मुखं जंगमो भवेत् ॥१५१॥ शिवधर्मे ॥ यद्वा यद्वा शिवायान्नं लिंगजंगममूर्तये ॥ भक्त्या निवेद्य भुंजानः फलमक्षयमाप्नुयात् ॥१५२॥ शिवरहस्ये ॥ पत्तीर्थं (सत्तीर्थं) सर्वतीर्थानी प्रसादः कोटिलिंगकैः ॥ नित्यं सेवितभक्तस्तु मम रूपं तु पार्वति ॥१५३॥ शिवधर्मे॥ भस्मनिष्ठं प्रतिष्ठाप्य दिवसेनापि यत्फलम् ॥ न तच्छक्यं गृहस्थेन प्राप्तुं क्रतुशतैरपि ॥ १५४॥ शैवसंहितायाम् ॥ यत्र भुंजीत भस्मांगी मूर्खो वा पंडितोऽपि वा ॥ तत्र भुंक्ते महादेवः सपत्नीको वृषध्वजः ॥१५५॥ ब्रह्मपुराणे ॥ नैवेद्यं पुरतो न्यस्तं दर्शनात्स्वीकृतं मया ॥ रसान् भक्तस्य जिव्हाग्रादश्नामि कमलोद्भव ॥१५६॥ शिवरहस्ये ॥ वृक्षस वदनं भूमिः स्थावरस्य च जंगमः ॥ मम तृप्तिर्महादेवि उभयोर्लिंगजं-

---

खावयास घालावे ) (१५१) अंशुमदागमांत ह्मटलें आहे कीं, सर्व प्रकारचीं व्रतें आणि नियम पाळणाऱ्या शंभर मनुष्यांपेक्षां प्राणलिंगी हा श्रेष्ठ आहे प्राणलिंगीचीं व्रतें पाळणारा मनुष्य माझें प्रत्यक्ष शरीर आहे, आणि जंगम हा माझें तोंड आहे. (१५२) आपल्याला जसें मिळेल तसें अन्न शिवाला आणि जंगमाला अगोदर अर्पण करून, नंतर आपण स्वतः तें अन्न प्रसादान्न ह्मणून भक्षण करणारा मनुष्य, त्या अर्पण केलेल्या अन्नाचें अक्षय फळ पावतो. (१५३) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, पादोदक सर्व तीर्थांत श्रेष्ठ आहे आणि कोटिलिंगप्रसादापेक्षां जंगमप्रसाद श्रेष्ठ आहे. तें पादोदक आणि जंगमप्रसाद नित्य भक्षण करणारा माझा भक्त, पार्वती, माझेंच स्वरूप आहे. (१५४) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं, भस्मावर दृढ विश्वास ठेवून आपल्या अंगास नेहमीं भस्मलेप कारणाऱ्या शिवयोगी मनुष्याची आपलें घरीं एक दिवस पूजा केली असतां, जें कांहीं पुण्य लागतें तें पुण्य गृहस्थाश्रम पाळणाऱ्यानें शंभर यज्ञ केले तरी देखील त्यास मिळणार नाहीं. (१५५) शैवसंहितेंत ह्मटलें आहे कीं, भस्मलेप आपले अंगास करणारा मनुष्य मग तो शिकलेला असो, किंवा शिकलेला नसो, तो जेथें जेवतो तेथें नंदिकेश्वर ध्वजावर असणारा महादेव आपल्या पार्वतीसहित जेवतो, असें समजावें. (१५६) ब्रह्मपुराणांत शिवांनीं ह्मटलें आहे कीं, ब्रम्हदेवा, माझ्यापुढें मला समर्पण करावयाच्या बुद्धीनें भक्तानें जो नैवेद्य ठेविला, त्याकडे मी पाहिल्याबरोबर त्याचा स्वीकार करितों. त्या नैवेद्याची गोडी मी भक्ताच्या जिभेच्या शेंड्यांनीं घेतों. ( भक्तानें नैवेद्यान्न भक्षण केलें ह्मणजे मला पोंचतें. ) (१५७) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, झाडाचें जमीन हें तोंड आहे, आणि स्थावराचें मुख जंगम आहे. हे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाशात् ॥१५७॥ अनन्तमुखमीशस्य मन्मुखं नैव पार्वति ॥ मन्मुखं स-ततं देवि प्राणलिंगवतां मुखम् ॥१५८॥ अथर्वणे ॥ सदा औपासनं व-न्हिमुखे स्यात्सर्वद्रव्याणि दध्यादीनि सर्वेषां देवानामपि पितॄणां तृ-प्तिर्भवति यथा तथा चरलिंगमुखं वन्हेस्तस्य सर्वपदार्थानि ईशरु-द्रेशगणेश्वरास्तृप्ता भवंति ॥१५९॥ शैवसंहितायाम् ॥ शिवयोगिनि संतृप्ते तृप्तो भवति शंकरः ॥ तत्तृप्त्या तन्मयं विश्वं तृप्तिमेति चरा-चरम् ॥१६०॥ कोटितीर्थेषु च स्नानात्कोटिलिंगार्चनात्तपः ॥ कोटियज्ञ-सदादानाद्विशेषं जंगमार्चनम् ॥१६१॥ शिवधर्मोत्तरे ॥ युगपत्पूजयेद्यो या ब्रह्मविष्णुमहेश्वरान् ॥ इतरान् सर्वदेवांश्च अर्चयेच्छिवयोगिनम् ॥१६२॥ सूक्ष्मागमे ॥ मत्पूजाकोटिगुणितं मद्भक्तानां च वन्दनम् ॥ म-न्मुखं जंगमं देवि भोगभाग्यमयं मम ॥१६३॥ शाकटागमे ॥ विश्वप्रा-णमयं लिंगं लिंगप्राणो गुरुर्भवेत् ॥ गुरुप्राणश्चरो लिंगं तस्माज्जंगम-

---

महादेवी म्हणून माझी तृप्ति लिंग आणि जंगम ह्या दोहोंकडून होते. (१५८) परमे-श्वराचीं अनंत मुखें आहेत. पार्वती, मला तर तोंडच नाहीं. हे देवि प्राणलिंगिलो-कांचें मुख हेंच माझें मुख आहे. (१५९) अथर्वणवेदांत म्हटलें आहे कीं, नेहमीं औपासन पाळून अग्नीच्या मुखांत दधि वगैरे सर्व द्रव्यें अर्पण करावीं; त्या द्रव्यांनीं जसे सर्व देव आणि पितर तृप्त होतात, तसेच परमेश्वर, रुद्र, आणि प्रमथगण, जंगमाचें मुख अग्नि समजून त्यांत अर्पण केलेल्या पदार्थांनीं तृप्त होतात. (१६०) शैवसंहितेंत म्हटलें आहे कीं, शिवयोगी तृप्त झाला असतां शंकर तृप्त होतो. त्या शिवयोग्याची तृप्ति झाल्यानें त्याचे पोटांत असणारें सर्व स्थावरजंगमविश्व तृप्त होतें. (१६१) कोटितीर्थांत स्नानें केल्यापेक्षां, कोटिशिवलिंगांची पूजा केल्यापेक्षां, तपश्चर्या केल्यापेक्षां, कोटि यज्ञ केल्यापेक्षां, आणि नेहमीं सर्व प्रकारचीं दानें दिल्यापेक्षां, जंगमाचें पूजन करणें जास्त श्रेयस्कर आहे. (१६२) शिवधर्मोत्तरांत म्हटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य एकवेळ शिवयोग्याची पूजा करितो, त्यानें एकदम ब्रह्मदेव, विष्णु, महेश्वर, आणि इतर सर्व देव ह्यांची पूजा केल्यासारखें आहे. (१६३) सूक्ष्मागमांत म्हटलें आहे कीं, शिव म्हणतात—पार्वती, माझें स्वतःचें पूजन केलें असतां जें कांहीं पुण्य लागतें, त्यापेक्षां माझ्या भक्ताला नमस्कार करण्यानें कोटपटीनें जास्त पुण्य लागतें. जंगम हे सर्व भोग व सुखें भोगण्याला साधन असें माझें मुख (तोंड) होत. (१६४) शाकटागमांत सांगितलें आहे कीं, लिंग हें विश्वप्राणस्वरूप आहे, गुरु हा लिंगप्राण आहे, आणि जंगम हा गुरुप्राण आहे. त्यासाठीं लिंगाची आणि जंगमाची

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मर्चयेत् ॥१६४॥ माता गुरुः पिता लिंगं स्वदेवो जंगमः प्रभुः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन तथैवाराधनं कुरु ॥१६५॥ परमरहस्ये ॥ लिंगार्पितं न कर्तव्यं कर्तव्यं जंगमार्पितम् ॥ लिंगजंगमयोर्मध्ये जंगमस्तु विशिष्यते ॥१६६॥ शैवरत्नाकरे ॥ कनिष्ठा मत्प्रिया पूजा मध्यमं गुरुपूजनम् ॥ उत्तमं जंगमस्यार्चा तदाराधय जंगमम् ॥१६७॥परमरहस्ये ॥ भिक्षामात्रप्रदानेन शांताय शिवयोगिने ॥ यत्फलं लभते नैव यज्ञकोटिशतैरपि ॥१६८॥ शिवधर्मोत्तरे ॥ पितॄनुद्दिश्य यः श्राद्धे भोजयेच्छिवयोगिनम् ॥ स गच्छेदीश्वरस्थानमेकविंशत्कुलान्वितः ॥१६९॥ अन्नं वा जलमात्रं वा यद्दत्तं लिंगधारिणे ॥ तदन्नं मेरुसदृशं तज्जलं सागरोपमम् ॥१७०॥ स्कांन्दे ॥ वृत्तम् ॥ लिंगार्चनं यस्य गृहे शिवैक्यः कुर्वीत वै तस्य गृहं पवित्रम् ॥ माता कृतार्थो सफलं च जन्म धन्यः पिता पुण्यतमोऽन्ववायः ॥१७१॥ सूक्ष्मागमे ॥ षड्रसान्नं च मृष्टान्नं भुंक्ते यो मूढधीः पु-

---

पूजा करावी. (१६५) गुरु ही भक्ताची माता आहे, लिंग हा बाप आहे आणि जंगम हा आपला देव आणि स्वामी आहे, ह्यासाठीं हरप्रयत्नानें त्या जंगमाचेंच आराधन कर. (१६६) परमरहस्यांत झटलें आहे कीं, वस्तु अर्पण करणें झालें तर लिंगाला अर्पण करूं नये; जंगमास अर्पण करावी. कां तर, लिंग आणि जंगम ह्या दोहोंत श्रेष्ठ कोण ह्याचा विचार केला असतां, जंगमच श्रेष्ठ आहे असें दिसून येतें. (१६७) शैवरत्नाकरांत झटलें आहे कीं, माझी पूजा करणें हा अधम प्रकार आहे, गुरूचें पूजन करणें हा मध्यम प्रकार आहे, आणि जंगमाची पूजा करणें हा उत्तमपक्ष आहे. ह्यासाठीं जंगमाची पूजा करावी. (१६८) परमरहस्यांत सांगितलें आहे कीं, शांत स्वभावाच्या शिवयोग्याला नुसती भिक्षा घातली तरी देखील जें फळ मिळतें तें फळ एक कोटि यज्ञ केल्यानें देखील मिळत नाहीं. (१६९) शिवधर्मोत्तरांत झटलें आहे कीं, पितरांच्या उद्देशानें श्राद्धामध्यें शिवयोगी मनुष्याला जो कोणी जेऊं घालतो, तो आपल्या एकवीस कुळांसहित कैलासपदास जातो. (१७०) लिंगधारी मनुष्याला अन्न किंवा निदान नुसतें पाणी जरी प्यावयास दिलें तरी तें अन्न, मेरुपर्वताएवढा अन्नाचा ढीग दान केल्याचें श्रेय देतें; आणि तें पाणी समुद्रांतील सर्व पाणी दान केल्याइतकें श्रेय देतें. (१७१) स्कन्दपुराणांत झटलें आहे कीं, शिवाशीं ऐक्य पावलेला (शिवस्वरूप झालेला) शिवयोगी ज्याच्या घरीं लिंगपूजा करितो तें घर पवित्र आहे. त्याची आई कृतार्थ झाली, त्याच्या जन्माचें सार्थक्य झालें, त्याचा बाप धन्य झाला, व त्याचें कुळ अतिशय पवित्र झालें असें समजावें. (१७२) सूक्ष्मागमांत झटलें आहे कीं, जो मूर्ख मनुष्य जंगमास न दाखवितां आपण स्वतःच षड्रस आणि गोडगोड

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मात् ॥ असाक्षिणं चरं कृत्वा रौरवं नरकं व्रजेत् ॥१७२॥ ग्रन्थान्तरे॥ वस्त्रभूषणगन्धादिधूपताम्बूलदीपकम् ॥ जंगमेन विना भुंक्ते प्रसादो निष्फलं भवेत् ॥१७३॥ दौर्गागमे ॥ आसने शयने याने सर्वकर्मसु सर्वदा ॥ असाक्षिणं चरं कृत्वा रौरवं नरकं व्रजेत् ॥१७४॥ कालिकाखण्डे ॥ मज्जनं वस्त्रगन्धौ च अक्षतान्पुष्पमेव च ॥ धूपं दीपं च नैवेद्यं हस्ताचमनमेव च ॥१७५॥ तांबूलं वसनं चैव तूर्यत्रितयमेव च ॥ मानिनीं भूषणं चैव वाहनं ग्रहमेव च ॥ एवं षोडशसद्भक्त्या चरलिंगे समर्पयेत् ॥१७६॥ विवाहेषु प्रतिष्ठासु गणसंकुलपर्वणि ॥ जंगमेन विना भुंक्ते प्रसादो निष्फलो भवेत् ॥१७७॥ उपनिषदि ॥ यस्त्वतिथिभ्योऽन्नादि हविरदत्वा भुंक्ते स किल्बिषम् ॥१७८॥ मल्लिंगधारी निपतेन्मद्भक्तश्चरवंचकः ॥ कुंभिपाकेषु घोरेषु तस्माज्जंगमपूजनं ॥१७९॥ यद्यदात्महितं लोके तत्तद्द्रव्यमवंचयन् ॥ चरलिंगार्पको भक्त्या तत्र तु-

---

अन्नें करून खातो, तो मनुष्य रौरवनरकाला जातो. (१७३) इतर ग्रन्थांत ह्मटलें आहे कीं, वस्त्र, अलंकार, गन्ध, धूप, ताम्बूल, दीप वगैरे पदार्थ जो जंगमास अर्पण करीत नाहीं, व जंगमास नैवेद्य दाखविल्यावांचून जो आपण स्वतः जेवतो, त्याचा प्रसाद व्यर्थ होतो. (१७४) दुर्गागमांत ह्मटलें आहे कीं, आसन, शयन, वाहन वगैरे सर्व प्रकारच्या पदार्थांचा अगोदर जंगमास अर्पण केल्याखेरीज आपण स्वतः जो उपभोग घेतो, तो मनुष्य रौरव नरकास जातो. (१७५) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे कीं, स्नान, वस्त्र, गन्ध, अक्षता, फूल धूप, दीप, नैवेद्य, हात धुण्यास पाणी, (१७६) तांबूल (विडा), वस्त्र, तीन प्रकारचीं वाद्यें, स्त्री (कन्या), अलंकार, वाहन, आणि घर हे सोळा पदार्थ उत्तम प्रकारची भक्ति मनांत धरून जंगमास अर्पण करावें. (१७७) लग्नकार्यांच्यादिवशीं, सणावाराच्यादिवशीं, किंवा अमावास्या, पौर्णिमा वगैरे पर्वणीच्यादिवशीं, जो कोणी मनुष्य जंगमाला पंक्तीस न घेतां आपण एकटाच भोजन करितो, त्याचा प्रसाद व्यर्थ जातो. (१७८) उपनिषदांत सांगितलें आहे कीं, जो कोणी मनुष्य अतिथीला चांगलीं चांगलीं अन्नें व तूप वगैरे अर्पण न करितां, आपण एकटाच खातो, तो प्रत्यक्ष पापच खातो. (१७९) जो कोणी मनुष्य माझें इष्टलिंग गळ्यांत घालतो, माझा भक्त ( शिवभक्त ) ह्मणवितो, आणि जंगमाशीं मात्र लबाडी करितो, तो भयंकर कुंभीपाक नरकांत पडतो ह्यासाठीं जंगमाचें पूजन अवश्य करावें. (१८०) जी जी वस्तु आपणास मनापासून आवडते ती ती वस्तु कांहीं एक कपट न करितां जंगमलिंगाला जो भक्तीनें समर्पण करितो, त्या ... हे सदाचारी पार्वती, मी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ष्यामि सुव्रते ॥१८०॥ संविभागपराः प्राज्ञाः ह्यशठाश्चाप्यकुत्सिताः ॥ नदीना नापि मलिना न च रोषवशानुगा॥१८१॥ सिद्धान्तशिखामणौ॥ अनृतं स्त्वस्थिरं वाक्यं वंचनं पंक्तिभेदनम् ॥ उदासीनं निर्दयत्वं षड्विधं भविमिश्रितं ॥१८२॥ ब्रह्मोत्तरखण्डे ॥ वृत्तम् ॥ स्वर्गच्युतानामिह जीवलोके चत्वारि नित्यं हृदये वसंति ॥ दानप्रसंगो मधुरा च वाणी देवार्चनं सद्गुरुपूजनं च ॥१८३॥ ज्ञानरत्नावल्याम् ॥ प्राप्तकाले तु दातव्यमविचारेण यत्नतः ॥ वंशानुत्तार्य तैस्सोऽपि दशपूर्वान् दशापरान् ॥१८४॥ सर्वेषां चैव पात्राणां पात्रमेवातिथिः परम् ॥ हीनांगो वाथपूर्णांगोऽप्यवृत्तोऽजातिरेव वा ॥ अविचारेण पूज्योऽसावश्वमेधफलं भवेत् ॥१८५॥ शिवधर्मशास्त्रे ॥ तस्मादतिथिमायान्तमभिगच्छेत्कृतांजलिः ॥ स्वागतासनपाद्यार्घस्नानशय्यासनादिभिः ॥१८६॥

---

अतिशय प्रीति करितों ( तो मनुष्य मला मनापासून आवडतो ). (१८१) जे ज्ञानी लोक आहेत ते द्रव्याची यथायोग्य विभागणी करितात, ते कपटी नसतात, त्यांचें वर्तन निर्दोष असतें, ते दरिद्री नसतात, ते मलीन ( पातकीही ) नसतात, ते कधींही रागावत नाहींत. (१८२) सिद्धान्तशिखामणींत सांगितलें आहे कीं, जे भविलोक असतात त्यांच्या आंगीं खोटेपणा, मनाचा चंचळपणा, कपट, पंक्तिप्रपंच, उदासीनता; आणि कठोरपणा, हे सहा दुर्गुण अगदीं अवश्य असतातच असतात, (१८३) ब्रह्मोत्तरखंडांत सांगितलें आहे कीं, जे लोक स्वर्गांतून खालीं जमिनीवर ( मृत्युलोकीं ) जन्मास आलेले असतात, त्या लोकांचे आंगीं दानधर्म करण्याची बुद्धि, गोड बोलणें देवपूजा करण्याची बुद्धि, आणि सद्गुरुपूजा करावयाची बुद्धि, हे चार गुण असतातच असतात. (१८४) ज्ञानरत्नावलींत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य प्रसंग पडला असतां द्यावयासारखें असेल तें देण्यास अगदीं मागेंपुढें पाहत नाहीं, तो आपल्या पूर्वींच्या दहा पूर्वजांस आणि पुढें जन्मास येणाऱ्या दहा वंशाजांस उद्धरून जातो. (१८५) दान देण्याला योग्य स्थलें ( पात्रें ) ह्मणून जितकीं कांहीं असतील, त्या सर्वांत जंगम हेंच श्रेष्ठ पात्र आहे; मग त्याचे अवयव कमी असले तरी हरकत नाहीं, जास्त असले तरी हरकत नाहीं, तो दुराचारी असो, किंवा जातिहीन असो तो दान देण्यास योग्य आहे. कोणताही भलतासलता विचार मनांत न आणतां त्याची पूजा करावी ह्मणजे त्या पूजा करणारास अश्वमेध यज्ञ केल्याचें श्रेय मिळतें. (१८६) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, ह्यासाठीं जंगम आपलेकडे येतो आहे असें पाहिलें, तर त्यास हात जोडून सामोरें जावें; त्याचें आदरातिथ्य करावें; त्यास आसन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रूपान्वितं विरूपं वा मलिनं मलिनाम्बरम् ॥ योगीद्रं श्रद्धया नित्यमतिथिं चोपचारयेत् ॥॥१८७॥ विटो विद्वान् शठश्चैव भिक्षुको नटनाटकः ॥ राजचिन्हधरो योगी चरत्येवं महीतले ॥१८८॥ क्वचिद्भ्रष्टः क्वचिच्छ्रेष्ठः क्वचिद्भूतपिशाचवत् ॥ नानावेषधरो योगी चरत्येवं महीतले ॥१८९॥ शिवधर्मपुराणे ॥ शिवयोगिशरीरेषु नित्यं सन्निहितः शिवः ॥ योगींद्रपूजनात्तस्मात्साक्षात्संपूजितः शिवः ॥१९०॥ वीरभद्रीये ॥ दंडक्षीरद्वयं हस्ते जंगमो भक्तमंदिरम् ॥ अतिभक्त्या लिंगतुष्टिरपह्नासाच्चदण्डनम् ॥१९१॥ शंकरसंहितायाम् ॥ विना माहेश्वरैरेतैर्यस्तु भुंक्ते षडानन ॥ स पापीयानघं भुंक्ते स श्रीकण्ठापराधकृत् ॥१९२॥ वासिष्ठे ॥ अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रति निवर्तते ॥ स तस्य दुष्कृतं दत्वा पुण्यमादाय गच्छति ॥१९३॥ ज्ञानरत्नावल्याम् ॥

---

पाद्य, अर्घ्य, स्नान, शय्या, वगैरे समर्पण करावीं. (१८७) मग तो जंगम सुस्वरूप असो किंवा कुरूप असो, तो स्वतः मलीन असो किंवा मलीन वस्त्रें नेसलेला असो, त्या योगीश्वर जंगमाची दररोज भक्तिभावानें पूजा करावी. (१८८) शिवयोगी पृथ्वीवर संचार करितांना एकाच रूपानें फिरत नाहीं. कधीं जार, कधीं विद्वान, कधीं ठक, कधीं भिक्षुक, कधीं उडाणटप्पू, कधीं विलासी, अशा निरनिराळ्या वेषानें हिंडतो. (१८९) कधीं जातिभ्रष्ट, कधीं उत्तम कुलीन, कधीं भूत, प्रेत, पिशाच, यांसारखा, अशीं नानाप्रकारची रूपें घेऊन शिवयोगी पृथ्वीवर संचार करीत असतो. (१९०) शिवधर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, शिवयोगी मनुष्याचे शरीरांत शिव नेहमीं राहतो. ह्यासाठीं शिवयोग्याचें पूजन केलें असतां प्रत्यक्ष श्रीशंकराचें पूजन केल्यासारखें आहे. (१९१) वीरभद्र पुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगम भक्ताच्या घरीं जातांना एका हातांत दण्ड, आणि एका हातांत दूध घेऊन जातो; त्यानें तो भक्तास असें सुचवितो कीं, अतिशय भक्ति कराल तर तुह्मास इष्टलिंग प्रसन्न होईल, माझा अपमान कराल तर तुह्मास शिक्षा होईल. (१९२) शंकरसंहितेंत ह्मटलें आहे कीं, मुला कार्तिकेया, ह्या जंगमास भोजन घातल्याखेरीज जो मनुष्य आपण स्वतःच आधीं जेवतो, तो पातकी मनुष्य पातकच खातो असें समजावें; तो शिवाचा मोठा अपराधी आहे (१९३) वासिष्ठ पुराणांत सांगितलें आहे कीं, ज्या भक्ताच्या घरीं अतिथी भिक्षेस आला असतां त्याची इच्छा तेथें पूर्ण न होतां, त्याला तेथून निराश होऊन परत जावें लागतें. त्या मनुष्यास शाप देऊन तो अतिथी त्याचें पुण्य घेऊन जातो. (१९४) ज्ञानरत्नावलींत ह्मटलें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पाके निवर्तिते यत्र अतिथिश्च पराङ्मुखः ॥ देवाश्च पितरः सर्वे यान्ति तस्मात्पराङ्मुखः ॥१९४॥ वृत्तम् ॥ अदत्तदोषाच्च भवेद्दरिद्रो दारिद्र्यदोषाच्च करोति पापम् ॥ पापादवश्यं नरकं प्रयाति पुनर्दरिद्रः पुनरेव पापी ॥१९५॥ द्वारि द्वारि पठन्त्येते भिक्षुकाः पात्रपाणयः ॥ दर्शयन्तीव लोकानामदातुः फलमीदृशम् ॥१९६॥ शंकरसंहितायाम् ॥ वृत्तम् ॥ माहेश्वरो यस्य गृहे न कुर्याल्लिंगार्चनं प्राणशिवैक्यभाजः ॥ भुंजीयुरन्नं न हि तस्य जन्म व्यर्थं पशूनामिव जीवितं तत् ॥१९७॥ शिवधर्मशास्त्रे ॥ शिवयोगी गृहे यस्य भिक्षां गृण्हाति संस्कृताम् ॥ कुलं तारयते तस्य सप्त सप्त च सप्त च ॥१९८॥ यस्य गेहं समुद्दिश्य योगी गच्छति सुव्रत ॥ तस्य क्रीडंति पितरो यास्यामः परमां गतिम् ॥१९९॥ शिवयोगिनमायान्तं दृष्ट्वैव गृहसंस्थिताः ॥ क्रीडन्त्यौषधयः सर्वा

---

आहे कीं, भक्ताच्या घरीं स्वयंपाक अगदीं तयार झाला असतां, त्यावेळीं आपणास अन्न मिळावें ह्या इच्छेनें आलेला जंगम; त्यास तेथें अन्न न मिळाल्यामुळें निराश होऊन जर माघारा गेला, तर त्यामुळें त्या भक्ताचे देव आणि पूर्वज देखील निराश होऊन तेथून परत जातात. (१९५) जंगम आपले घरीं भिक्षेस आला असतां त्यास अन्नदान न केलें तर त्या दोषामुळें तो भक्त दरिद्री होतो, दरिद्रावस्थेनें अतिशय गांजून गेला म्हणजे दुष्कृत्यें ( पाप ) करूं लागतो. त्या पापामुळें नरकास जातो, पुनः दरिद्री होतो, आणि पुनः पातकी होतो. (१९६) भिक्षा मागण्याकरितां हातांत भोंपळा घेऊन फिरणारे जंगम दारोदार फिरून, लोकांस दान न दिलें तर तुम्हासही आमच्यासारखीच भिक्षा मागावी लागेल, असें सुचवितात ( भिक्षा न घालणारांस असाच भोंपळा हातांत घेऊन भीक मागावी लागेल असें सुचवितात. ) (१९७) शंकरसंहितेंत म्हटलें आहे कीं, ज्या भक्ताच्या घरीं जंगम लिंगपूजा करणार नाहीं, त्या घरीं प्राणलिंगी मनुष्यानीं कधींही अन्न ग्रहण करूं नये. जनावराचा जन्म जसा व्यर्थ आहे, तसाच त्या मनुष्याचाही जन्म व्यर्थ आहे असें समजावें. (१९८) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, शिवयोगी मनुष्य ज्या भक्ताच्या घरीं शुद्ध भिक्षाग्रहण करितो, त्या भक्ताच्या एकवीस कुळांचा उद्धार होतो. (१९९) हे सदाचारी मनुष्या, ज्या भक्ताच्या घरीं आपण जावें असा मनांत विचार करून शिवयोगी जातो, त्या भक्ताचे पूर्वज सुखानें कालक्रमणा करितात; त्यांस वाटतें कीं, आपण आतां उत्तम गतीस खचित जाऊं. (२००) शिवयोगी आपल्याच घराकडे येतो आहे असें पाहतांच, त्या घरांतील सर्व औषधि, आतां आमचें जन्माचें सार्थक्य होईल ह्या आनंदानें नाचूं उड्डूं लागतात. त्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यास्यामः परमां गतिम् ॥२००॥ शंकरसंहितायाम् ॥ वीरमाहेश्वरो यस्य गेहे भुंक्ते षडानन ॥ पितरस्तस्य गच्छेयुस्तृप्तिमानन्तवार्षिकीम् ॥२०१॥ अथो माहेश्वरान् शुद्धान् भोजयित्वा विधानतः ॥ पश्चाद्भुंजीत सार्ध वा पुत्रबन्धुजनैर्नरः ॥२०२॥ ज्ञानतारावल्याम् ॥ एवं मुनिवरं शान्तमीश्वरार्पितमानसम् ॥ भोजयेद्यस्तु सद्भक्त्या सर्वान्कामानवाप्नुयात् ॥२०३॥ शिवधर्मपुराणे ॥ पूजयिष्यंति ये केचित्तदाश्रमसमाश्रितान् ॥ स्नानभोजनदानाद्यैस्तेषां मुक्तिः करे स्थिता ॥२०४॥ शिवधर्मशास्त्रे ॥ पानकानां सुगन्धानां फलं सौम्यं रसायनम् ॥ तथा फलविशेषाश्च स्वादुभिः सदृशं फलम् ॥२०५॥ रसालां सुनवां शीतां कर्पूरैः सुरभीकृताम् ॥ निवेद्य पुण्यमाप्नोति शतकोटिगुणाधिकम् ॥२०६॥ गुडखण्डकृतैर्भक्ष्यैर्घृतेन परिपाचितैः ॥ सहस्रकोटिगुणितं ज्ञेयं पंच सुगंधिभिः ॥२०७॥ माषप्रकारैर्विविधैर्मधुरैर्घृतपाचितैः ॥ कोटिकोटिगुणं पुण्यं शि-

---

औषधींस वाटतें कीं, आह्मांस ह्या शिवयोगीश्वरानें भक्षण केलें ह्मणजे आमच्या जन्माचें सार्थक्य होईल. (२०१) शंकरसंहितेंत सांगितलें आहे कीं, हे कार्तिकेया, वीरमाहेश्वर मनुष्य ज्याच्या घरीं जेवतो, त्याचे पूर्वज अनंत वर्षेंपर्यंत तृप्त होतात (२०२) मनुष्यानें अगोदर शुद्ध अन्नें करून जंगमास जेऊं घालावें, आणि त्याचें जेवण झाल्यावर मागाहून त्यानें आपल्या बायकांमुलांसह व नातलगांसह जेवावें. (२०३) ज्ञानतारावलींत ह्मटलें आहे कीं, जो शिवयोगी शांत स्वभावाचा आहे, व ईश्वराकडें त्याचें मन लागलें आहे, अशा योगीश्वरास जो कोणी मनुष्य भक्तिभावानें जेऊं घालील, त्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतात. (२०४) शिवधर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, जे कोणी भक्तलोक जंगमाच्या मठांत राहणाऱ्या इतर शिवभक्तलोकांस स्नान, भोजन, दान, वगैरे देऊन त्यांचा आदरसत्कार करितात, व त्यांस तृप्त करितात, त्यांच्या हातांत मोक्ष असल्यासारखा आहे. (२०५) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, उत्तम उत्तम सुगंधि सरबतें, चांगलीं चांगलीं गोड फळें, उत्तम रसायनें, तशींच अनेक प्रकारचीं निरनिराळीं फळें; हीं शिवयोग्यास अर्पण केलीं असतां भक्तास तशा तऱ्हेचें फळ मिळतें. (२०६)उत्तम तऱ्हेच्या आंब्याची फोड अगदीं ताजी अशी घेऊन त्यास कापूर लावून चांगली सुगंधि करून, शिवयोगीश्वरास नैवेद्य ह्मणून जो कोणी भक्त समर्पण करितो, त्याला इतर दानांच्या शंभर हजार कोटिपटीनें जास्त पुण्य लागतें. (२०७) गूळ घालून केलेले आणि तुपांत तळलेले पदार्थ, आणि पांच प्रकारचे सुगंधि पदार्थ, शिवास जो अर्पण करितो; त्याला पदार्थांच्या दानांपेक्षां हजारपटीनें जास्त फळ मिळतें. (२०८) अनेक प्रकारचे गोड गोड वडे करून तें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वाज्ञागुरुकल्पितैः ॥२०८॥ शिवधर्मे ॥ चित्तं वित्तानुसारेण कदा कस्य भविष्यति ॥ ग्रासादर्धमपि ग्रासं युक्तं दातुं सदार्थिनः ॥२०९॥ यदि नाम देयं न स्यात्सम्प्राप्तायार्थिने गृहम् ॥ किं वाक्यान्यपि नष्टानि प्रि-याण्यनुगतानि च ॥२१०॥ शैवपुराणे ॥ पेषणं खण्डनं चुल्ली उदकु-म्भप्रमार्जनी ॥ पंचसूना गृहस्थस्य केन मोक्षो न जायते ॥२११॥ शाता-तपस्मृतौ ॥ आत्मार्थं न पचेदन्नं देवतार्थं तु पाचयेत् ॥ आत्मार्थं पा-चते यस्तु ब्रह्महत्या च कथ्यते ॥२१२॥ शिवरहस्ये ॥ लिंगार्थं जंगमार्थं च विशेषं पाकमुत्तमम् ॥ आत्मार्थं यत्कृतं पाकं श्वानमांससमं भवेत् ॥२१३॥ शैवपुराणे ॥ देवकार्ये गुरोःकार्ये गणकार्ये च योगिने ॥ खन-नात्पाटनं खण्डं कुर्वन् पापैर्नलिप्यते ॥२१४॥ आदित्यपुराणे ॥ शिवस्य नित्यतृप्तस्य किं नाम क्रियते जनैः ॥ यत्कृतं शिवभक्तानां तेन प्रीतो

---

तुपांत तळून, ते शिवाला आणि जंगमाला अर्पण केले असतां, इतर दानापेक्षां कोट-पटीनें जास्त पुण्य लागतें. (२०९) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, आपल्या मनास जितका पैसा मिळावा ह्मणून वाटतें, तितका कोणास कधीं तरी मिळाला आहे काय? तेव्हां आपली जी स्थिति आहे त्यांतच संतोष मानून आपल्या घांसांतील अर्धघांस याचकांस नेहमीं दान करीत असावा हेंच योग्य आहे. (२१०) आपल्या घरीं जर कोणी एखादा शिवयोगी कांहीं वस्तु मागण्यास आला, व ती देण्यास आपले जवळ नसली; तर त्याच्याशीं दोन गोड गोड शब्द बोलून, त्याच्या मनास बरें वाटेल असें करण्यास तर कांहीं हरकत येत नाहींना? (२११) शैवपुराणांत सांगितलें आहे कीं, दळणें, कांडणें, चूल पेटविणें, पाण्याची घागर भरून ठेवणें आणि झाडून काढणें, हीं अनेक प्राण्यांची जीवहिंसा होणारीं पांच कामें गृहस्थास अवश्य करावींच लाग-तात; मग मनुष्याला मोक्ष कसा होईल? (२१२) शातातपस्मृतींत सांगितलें आहे कीं, मनुष्यानें आपल्या स्वतःकरितां अन्न शिजवूं नये देवाकरितां ह्मणून शिजवावें. जो मनुष्य आपल्याकरितां अन्न शिजवितो त्याला ब्रह्महत्या केल्याचा दोष लागतो. (२१३) शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, लिंगाकरितां किंवा जंगमाकरितां अन्न शिज-विणें फारच चांगलें. जर कोणी मनुष्यानें अपल्या करितांच अन्न शिजविलें तर तें कुत्र्याच्या मांसासारखें निषिद्ध समजावें. (२१४) शैवपुराणांत सांगितलें आहे कीं, जो कोणी मनुष्य देवाच्या कामाकरितां, गुरूच्या कामाकरितां, प्रमथगणांच्या कामाकरितां, किंवा शिवयोग्याचे कामाकरितां उकरणें, उपटणें, तोडणें वगैरे हिंसा घडणारीं कामें करील. त्यास मुळींच पापें लागत नाहींत. (२१५) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव-परमात्मा हा नेहमीं तृप्त आहे. त्याला कशाचीही आशा नाहीं. त्याला इतर लोकांनीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भवेच्छिवः ॥२१५॥ पादप्रक्षालनं यस्तु कुरुते शीतलोदकैः ॥ वीरमाहेश्वरस्यासौ चतुरंबुधिराड् भवेत् ॥२१६॥ शैवपुराणे ॥ सकृल्लिंगार्चके दत्वा वस्त्रमात्रं यदृच्छया ॥ एकछत्रं भवेद्राज्यं शिवसायुज्यमाप्नुयात् ॥२१७॥ शिवधर्मे ॥ फलं मूलं च भक्ता ये शाकानि विविधानि च ॥ श्वपचः शिवभक्तश्चेदुत्तमोत्तमजन्मभाक् ॥२१८॥ आदित्यपुराणे ॥ छत्रं चोपानहौ यस्तु चामरव्यजनानि च ॥ दद्याल्लिंगार्चकायैव सचेंद्रपदमाप्नुयात् ॥२१९॥ सूतसंहितायाम् ॥ यूयं श्रद्धान्विता विप्रा दानमानार्चनादिभिः ॥ षट्स्थलज्ञानवन्तं तं वीरमाहेश्वरं जनम् ॥२२०॥ पूजयध्वं महाभागा पूजा सा पुरुषार्थदा ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन वीरमाहेश्वरं जनम् ॥ आराधयत विप्रेंद्रा यूयं भक्तिपुरःसराः ॥२२१॥ शैवपुराणे ॥ हस्तपादादिसाधर्म्यान्मर्त्यान् रुद्रवपुर्धरान् ॥ प्राकृतानेव मन्वानाः नैव

---

तृप्त तें काय करावयाचें आहे? तरी पण शिवभक्तांनीं भक्तिभावानें जीं जीं कृत्यें केलीं, तीं तीं शिवास पोहोंचून तो तृप्त होतो. (२१६) जो कोणी मनुष्य थंडगार पाणी घेऊन वीरमाहेश्वराचे ( जंगमाचे ) पाय धुतो, त्याला सर्व विद्या येऊन तो मोठा बुद्धिमान् ह्मणून जगांत प्रसिद्धीस येतो (२१७) शैवपुराणांत सांगितलें आहे कीं, शिवलिंगपूजन करणारे शिवयोग्यास एखादेवेळीं एखादें वस्त्र जो कोणी सहजगतीनें अर्पण करितो, त्याला सार्वभौम राजाचें राज्य मिळतें; व तो मनुष्य त्यापुण्यानें शिवसायुज्य पावतो. (२१८) शिवधर्मांत सांगितलें आहे की, भक्त लोक भक्तिभावानें मला जीं फळें, मुळें आणि सर्व प्रकारचीं कंदमुळें अर्पण करितात; तीं सर्व मला पोहोंचतात एखादा चांडाल जरी शिवभक्त असला तरी त्यापुण्यानें पुढील जन्मांत तो उत्तमोत्तम श्रेष्ठ कुलांत जन्मास येतो. (२१९) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य लिंगपूजन करणाऱ्या शिवभक्ताला ( शिवयोग्याला ) छत्री, जोडा, चवरी विंझणवारा वगैरे वस्तु दान करितो, तो मनुष्य त्या पुण्यामुळें इंद्रलोकास जातो. (२२०) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, हे ब्राह्मणहो, तुह्मी मोठे दृढनिश्चयी आहां, तुह्मी सर्वजण दान, मान, पूजन वगैरे प्रकारांनीं षट्स्थलांचें ( भक्त, माहेश्वर. प्रसादी. प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य ह्यांचें ) यथार्थज्ञान असणाऱ्या वीरमाहेश्वराची ( जंगमाची ) पूजा (२२१) करा. हे दैवशाली ब्राह्मणहो, तुमची पूजा व्यर्थ जाणार नाहीं. ती तुमचे मनोरथ परिपूर्ण करील ह्यासाठीं ब्राह्मणश्रेष्ठहो, तुह्मी हरप्रयत्नानें भक्तिभावानें जंगमाचें आराधन करा. (२२२) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे अडाणी लोक आहेत ते प्रत्यक्ष शंकराचाच अवतार असणाऱ्या जंगमलोकांस हात, पाय वगैरे अवयव इतर माणसांसारखेच आहेत असें मानतात; परंतु ती त्यांची

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जानंत्यपंडिताः ॥२२२॥ अवज्ञानं कृतं तेषु नरैर्व्यामूढचेतनैः ॥ आयुः श्रियं कुलं शीलं हित्वा नरकमाप्नुयुः ॥२२३॥ शिवरहस्ये ॥ शिवभक्तं सकृन्निंद्येद्यो जनः पापकर्मकृत् ॥ युगकोटिंक्रिमिर्भूत्वा विष्टायां जायते पुनः ॥२२४॥ सूकरः कोटिजन्मानि जायते शतकोटिशः ॥ मृगश्च कोटिजन्मानि शृगालः कोटिजन्मसु ॥२२५॥ अंधश्च कोटिजन्मानि कुब्जः स्यात्कोटिजन्मसु ॥ पंगुश्च शतजन्मानि पाषंडी जायते शतम् ॥२२६॥ उलूको वायसो गृध्रो सर्पसूकरगर्दभाः ॥ जायते म्रियते चैव निष्कृतिर्न विधीयते ॥२२७॥ शिवधर्मशास्त्रे ॥ दानं वित्ताहृतं वाचः कीर्तिधर्मौ तथायुषः ॥ परोपकारं यः कुर्यात्सारात्सारं समुद्धरेत् ॥२२८॥ आदित्यपुराणे ॥ शंकरस्य च ये भक्ताः शान्तास्तद्गतमानसाः ॥ तेषां दासस्य दासोऽहं भवेयं जन्मजन्मनि ॥२२९॥ शिवरहस्ये ॥ सर्वाचारविशेषेण सर्वव्रतविशेषतः ॥ सर्वशीलविशेषेण शिव-

---

मोठी चूक आहे. (२२३) जे अज्ञान लोक हे जंगमलोक इतर माणसांसारखेच आहेत, ह्यांचें अंगीं कांहीं विशेष प्रकारची शक्ति नाहीं, असें समजून त्यांची अवहेलना करतील, त्यांच्या आयुष्याचा, कुलाचा, व शिलाचा नाश होऊन ते नरकास जातील. (२२४) जो पातकी मनुष्य शिवभक्ताची एकवेळ निंदा करतो, तो त्या दोषानें एककोटियुगें पर्यंत किडा होऊन विष्टेंत लोळत पडेल. (२२५) त्यानंतर एक कोटिवेळ डुकराच्या जन्मास जावें लागतें, व हरिणाचे जन्म कोटिवेळ भोगून, नंतर त्यास कोटवेळ कोल्ह्याचे जन्मास जावें लागतें. (२२६) तेथून कोटिजन्म आंधळें व्हावें लागतें, कोटिजन्म बाहिरा होऊन घ्यावे लागतात, कोटिजन्मांत पांगळें व्हावें लागतें, आणि एक कोटिजन्म नास्तिकाच्या कुळांत घ्यावे लागतात. (२२७) नंतर त्यास दिवाभीत, कावळा, घार, साप, डुकर, आणि गाढव ह्या पशुपक्ष्यांच्या योनींत जन्म घ्यावे लागतात, त्याच्या पातकाची निष्कृति ह्मणून कधीं होणार नाहीं. (२२८) शिवधर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य द्रव्याचें दान करितो, खरें बोलतो, कीर्ति आणि धर्म होईल अशीं कृत्यें करितो, तसेंच गोरगरिबांस जीवदान देतो, इतक्या गोष्टी जो करितो, त्यानें उत्तमांतील उत्तम काम केलें असें ह्मणावें. (२२९) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे शंकराचे भक्त आहेत, त्याचा स्वभाव शांत आहे, त्यांचें सत्कृत्याकडे लक्ष्य आहे, त्यांच्या दासांचा दास जन्मोजन्मीं व्हावें. (२३०) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, सर्व प्रकारचें चांगले चांगले आचार पाळल्याचें जें कांहीं फळ असेल, सर्व प्रकारचीं व्रतें पाळल्याचें जें कांहीं फळ असेल आणि सर्व प्रकारचें सद्गुण पाळल्याचें जें कांहीं फळ असले, त्यापेक्षां शिवाचा भक्त होणें हें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दासोहमुत्तमम् ॥२३०॥ ममेशस्वामिकं कार्यं सर्वं मत्वेशचोदितम् ॥ यस्यार्थे क्रियते पात्रे सा क्रिया निरुपाधिका ॥२३१॥ भगवद्गीतायाम् ॥ दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ॥ देशे काले च पात्रे च तद्दानं निरुपाधिकम् ॥२३२॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ सर्वलोकैकनाथस्य शंभोः कः किं प्रयच्छति ॥ उपचारप्रियः शंभुस्तेनैवायं प्रसीदति ॥२३३॥ वातुलतंत्रे ॥ मदीयं तुभ्यमित्युक्तं (क्त्वा) न दद्याद्वस्तु किंचन ॥ त्वदीयं तुभ्यमित्येत्तद्दानं विमलमीरितम् ॥२३४॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ कर्तृभृत्यस्य सन्मार्गममार्गं च परित्यजेत् ॥ अंहकारौ महापापं तत्पापं वर्जयेत् सुधीः ॥२३५॥ वृत्तम् ॥ अहं ममत्वंच भवस्य बीजं नाहं ममत्वं भवबीजनाशं ॥ बीजे प्रणष्टे कुत एव जन्म निरिंधनाद्वन्हिरु-

---

जास्त कल्याणकारक आहे. (२३१) परमेश्वर श्रीशंकर माझा प्रभु आहे. मी जें कांहीं काम करितों तें सर्व परमेश्वराच्या प्रेरणेनें करितों. परमेश्वराच्या प्रेरणेखेरीज माझे हातून कोणतीही गोष्ट घडत नाहीं. सत्पात्राच्या ठिकाणीं दान करणें ही जी क्रिया आहे; त्या क्रियेला निरुपाधिक क्रिया असें ह्मणतात. (२३२) भगवद्गीतेंत सांगितलें आहे कीं, ज्याला आपण दान करितों त्या मनुष्यापासून उलट आपणास कांहीं मोबदला मिळावा अशी आशा मनांत न ठेवितां निरपेक्ष बुद्धीनें देश काळ वेळ आणि पात्र पाहून जें दान करावयाचें त्या दानास निरुपाधिक दान असें ह्मणतात. (२३३) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, श्रीशंकर हा सर्व त्रैलोक्याचा अधिपति आहे, त्याला कोण काय देणार आहे? त्याला सर्व प्रकारची अनुकूलता आहेच, तरी पण तो महादेव भक्तिप्रिय आहे (त्याला भक्ति फार आवडते) त्याची भक्ति केली ह्मणजे तो प्रसन्न होतो. (२३४) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, ही वस्तु माझी आहे ही मी तुला अर्पण करितों असें ह्मणून कधींही दान देऊं नये. ही वस्तु तुझी आहे, ही मी तुझी तुला अर्पण करितों, असें ह्मणून जें दान करावयाचें, त्या दानास विमलदान असें ह्मणतात. (२३५) सिद्धान्तशिखामणींत म्हटलें आहे कीं, परमेश्वर हा कर्ता आहे, आणि आपण त्याचे सेवक (भक्त) आहोंत, असें मानून चालावें. भलताच मार्ग धरूं नये, सोडून द्यावा. गर्व करणें मोठें पाप आहे तें पाप ज्ञानी मनुष्यानें कधींही करूं नये. (२३६) मी आणि माझें ह्या दोन गोष्टी (शब्द) संसार वृद्धिंगत करण्यास मूलकारण आहेत. मी आणि माझें अशा दोन प्रकारच्या समजुती आपल्या मनांतून नाहींशा झाल्यावर संसारबीजाचा आपाप नाश होतो. बीजाचा नाश झाल्यावर जन्म तरी कोठून होणार? विस्तवांतील लांकडें संपलीं ह्मणजे विस्त-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पैति शांतिं ॥२३६॥ वातुलतंत्रे ॥ आर्यावृत्तम् ॥ नाहमनात्मा पश्चा-त्कोहं सोहं पदस्य मात्मा वै ॥ सोहं तत्पतिदासोहंदासोहमिति चरेदुप-रि पदे ॥२३७॥ कूर्मपुराणे ॥ कृता या शिवपूजा सा मनसा काम-गामिनी ॥ कामेन कृतपूजायाः सहस्रगुणतां व्रजेत् ॥२३८॥ शिव-धर्मपुराणे ॥ सालोक्यं शिवसामीप्यं सारूप्यं च शिवैक्यता ॥ अपे-क्षितानि भक्तैश्च मोक्षो नास्ति वरानने॥२३९॥ वीरागमे ॥ भक्तोऽहमिति सद्भावान्मुक्तएव न संशयः ॥ मुक्तोऽहमितिचेत्तस्मात्सहजानंदभूषणः ॥२४०॥ शिवधर्मे ॥ नाशिवस्य शिवोपास्तिर्घटते जन्मकोटिभिः ॥ शिव-स्यैव शिवोपास्तिरिति नानाश्रुतिस्थितिः ॥२४१॥ वातुले ॥ मुक्तस्यैवभवे-द्भक्तिर्बद्धस्य न कदाचन ॥ भक्तस्यैव हि मुक्तिश्च नाभक्तस्य कदाचन। ॥२४२॥ वृत्तम् ॥ नित्यं समर्पणकलानिपुणं प्रसन्नं यद्भक्तिरूपमचलं नि-

---

व आपापच विझतो. ( २३७ ) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, आत्मा नाहीं असें नाहीं. कां तर मागाहून " कोहं सोहं " कोण मी? तो मी! अशा शब्दानें ज्याचें ज्ञान होतें तोच आत्मा आहे. तो आत्मा त्या आत्म्याचा पति परमेश्वर ह्याचा मी दास आहें मी दास आहें असें वारंवार वारंवार ह्मणून तसें आपलें वर्तन ठेवील तर तो श्रेष्ठ पदास जाईल. ( २३८ ) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, जी आपण शिवपूजा केली ती आपले मनाप्रमाणें इच्छित पूर्ण करिते; आपलें अमुक काम व्हावें अशा उद्देशानें शिवपूजा केली तरी त्या इच्छेपेक्षां हजारपटीनें जास्त फळ मिळतें. ( २३९ ) शिवधर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, माझे भक्त शिवसालोक्य ( शिवपुरांत राहण्यास मिळणें, ) शिवसामीप्य ( शिवाचेजवळ बसण्यास मिळणें) शिवसारूप्य ( शिवा सारखें आपलें स्वरूप होणें ) आणि शिवैक्यता ( शिवस्वरूपांत मिसळून जाणें ) ह्या चार गोष्टींचीच इच्छा करितात मोक्षाची इच्छा करीत नाहींत. ( २४० ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, मी स्वतः भक्त आहें अशी दृढ समजूत निष्कपटपणानें झाली ह्मणजे, तो मुक्तच आहे ह्यांत संशय नाहीं. मी मुक्त आहें असें समजलें, ह्मणजे त्यास स्वाभाविकपणेंच आनंद होऊन तो शोभूं लागतो. ( २४१ ) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य दोषी ( अशिव ) आहे, त्यानें कोट्यावधि जन्म घेतले तरी त्याचे हातून शिवाची सेवा होणार नाहीं. शिव ( सद्वर्तनी ) आहे. त्याचे हातूनच शिवसेवा घडेल असा अनेक वेदांचा सिद्धांत आहे. ( २४२ ) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, जो मुक्त आहे त्याचे हातूनच शिवाची भक्ति होईल; जो बद्ध ( संसारचक्रांत नेहमीं फिरणारा असेल ) त्याकडून होणार नाहीं. जो भक्त असेल त्यालाच मुक्ति होईल, भक्त नसेल त्याला मुक्ति होत नाहीं. ( २४३ ) जें भक्तिस्वरूप नित्य आहे, समर्पण ( दान ) करा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जभावसिद्धम् ॥ निर्लेपभोगरसिकं निरहंममत्वं तत्कर्मशैवमुभयाति गमाद्गुरार्याः ॥२४३॥ प्रभुः स्वतन्त्रः प्रभुरस्वतन्त्रः प्रभुर्यदेवेच्छति तत्करोमि ॥ पुण्यं च पापं च निजेच्छया हि द्वयोर्न कर्ता प्रभुरस्वतन्त्रः॥ ॥२४४॥ इच्छाज्ञानक्रियाशक्तित्रयं यस्यास्ति स प्रभुः ॥ स्वतन्त्र त्वदधीनोऽयमस्वतंत्रोऽहमप्रभुः ॥२४५॥ आर्यावृत्तम् ॥ इच्छति जानातीदं करोति सकलं शुभाशुभं कर्म ॥ इच्छाज्ञानक्रियया शिव एव सोहमिति सत्यम् ॥२४६॥ तत्प्रेरितस्सकलकर्म करोमि कर्ता नाहं न तस्य फलभुक् परतंत्रभावात् ॥ भृत्यापराध इह यद्यदुमेश दण्डः स्यात्स्वामिनस्तव मया कृतमेव तद्वत् ॥२४७॥ आत्मा क्षेत्रं भवेद्भक्तिर्बीजं बीजी महेश्वरः ॥ तस्मात्क्षेत्रस्य बीजस्य बीजिनश्च कदाचन ॥ वियोगो नेष्यते क्वापि सदासंयोगएव हि ॥२४८॥ वासिष्ठे ॥ निरुपाधिकचि-

---

ण्याची बुद्धि ज्यास फार आहे जें चंचळ नाहीं, जें दृढनिश्चयी असतें, ज्याला विषयसुखाची आवड नसते, ज्याला मीपणा आणि माझेपणा हे दोन्ही गुण नसतात, त्याला कर्मशैव असें म्हणतात. त्याला ज्ञानी लोक दोहोंकडून पलीकडे ( अद्वैत ) असें म्हणतात. (२४४) प्रभु हा स्वतंत्र आणि प्रभु हा परतंत्रही आहे प्रभु आपलें मनांत जें कांहीं आणतो तें मी करितों. पुण्य आणि पाप ह्या दोन्ही गोष्टी स्वाभाविकपणानेंच परमेश्वर करीत नाहीं. कारण तो परतंत्र आहे. (२४५) इच्छा, ज्ञान आणि क्रिया करण्याचें सामर्थ्य ह्या तिन्ही गोष्टी ज्याच्या अंगीं आहेत त्याला प्रभु असें म्हणावें. तो स्वतंत्र आहे असें आपणास मानतों. जो प्रभु नाहीं तो स्वतंत्रही नाहीं. (२४६) तो परमेश्वर अमुक एक कर्म करावयाचें हें मनांत आणतो, तें कसें करावें हें जाणतो, आणि तो परमेश्वरच सर्व कांहीं बरें वाईट कृत्य करितो. इच्छा, ज्ञान आणि क्रिया ह्या तिन्ही गोष्टी ज्याचे आंगीं आहेत तो शिवच स्वतः परमेश्वर आहे, आणि तोच शिव मी आहें हें खरें. (२४७) तूं परमेश्वर आहेस, तुझ्या प्रेरणेप्रमाणें मी सर्व कांहीं कर्म करितों. मी कर्ता नाहीं त्यामुळें मला त्या कर्मांचें फळ भोगावें लागत नाहीं. कां तर मी परतंत्र आहे. पार्वतीपते ह्या जगांत माझ्या हातून जे कांहीं अपराध झाले असतील त्या बद्दल जर मला कांहीं दण्ड कराल तर तो तुम्ही आपल्यालाच करून घेतला असें होईल. कां तर तूं स्वामी आहेस आणि मी तुझा दास आहें. मीं जीं कृत्यें केलीं तीं तुझ्या प्रेरणेनें केलीं, स्वतंत्रपणानें केलीं नाहींत, सबब त्यांचदोष मजकडे नाहीं. (२४८) आत्मा हें क्षेत्र आहे, भक्ति हें बीज आहे, आणि महेश्वर हा बीज पेरणारा आहे; ह्या साठीं क्षेत्राचा, बीजाचा आणि बीज पेरणाराचा कधींहीं वियोग होतां कामा नये. नेहमीं त्यांचा संयोगच असला पाहिजे. (२४९) वासि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्रूपपरानंदात्मवस्तुनि ॥ समाप्तं सकलं यस्य स दानी शंकरः स्वयं ॥२४९॥ शिवसूत्रे ॥ परिपूर्णस्वरूपस्य दीयते बुध्यते भिदा ॥ धार्यंते शुध्यते रूपं यद्दानं सहजोदितम् ॥२५०॥ शैवरत्नाकरे ॥ स्वीकुर्वन्ति स्वकं वस्तु गुरुलिंगार्यजंगमाः ॥ इति कर्तृत्वयोगादिसत्यात्सहजदानवान् ॥२५१॥ कपिल उवाच ॥ न्यायार्जितं धनं यस्तु शिवभक्त्यैव केवलम् ॥ दद्यात्संगविनिर्मुक्तस्तद्दानं सहजं स्मृतम् ॥२५२॥ शिवगीतायाम् ॥ पदार्थइत्यत्र न किंचिदस्ति द्विधाकृतश्चेति न संमतोऽत्र ॥ समर्पिता भक्तिरथोपचारप्रियः सदा शंभुरिति प्रतेने ॥ ॥२५३॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ भोक्ता भोग्यं प्रेरिता चेति मत्वा सर्वं भोग्यं त्रिविधं ब्रह्म चैतत् ॥२५४॥ तथैवोक्तं कूर्मपुराणे ॥ दाता दानं च देयं च पात्रं चैव शिवः स्वयं ॥ नाहं कारणमित्येत्तद्दानं विमलमीरितम् ॥ ॥२५५॥ स्कान्दे ॥ शिवो दाता शिवो भोक्ता शिवस्सर्वमिदं जगत् ॥

---

छांत ह्मटलें आहे कीं, चिद्रूप हें निरुपाधिक आहे अतिशय आनंदस्वरूप आहे; त्या परमानंदस्वरूप वस्तूंत ज्याचें सर्व कांहीं समाप्त झालें ( जो तत्स्वरूप झाला ) तो दाता स्वतः शंकरच आहे. (२५०) शिवसूत्रांत ह्मटलें आहे कीं, जें दान परिपूर्ण स्वरूप अशा परमेश्वराला दिलें जातें, ज्या दानानें श्रेष्ठ कोण? नीच कोण? हें समजतें, जें दान ईश्वरास पोंचतें, व जें दान आपल्या यथार्थरूपाची आपणास ओळख करून देतें, त्याला सहजदान असें ह्मणतात. (२५१) शैवरत्नाकरांत ह्मटलें आहे कीं, गुरुलिंग आणि श्रेष्ठजंगम आपली स्वतःची वस्तु आपण ग्रहण करितात अशी कर्तृत्वाची यथार्थ माहिती ज्याला आहे त्यास सहजदान करणारा असें ह्मणावें. (२५२) कपिल ह्मणतात, आपण स्वतः खरेपणानें मिळाविलेलें द्रव्य कोणत्याही प्रकारचा स्नेहभाव मनांत न आणतां, जो शिवभक्तालाच अर्पण करितो, त्या दासाच्या दानाला सहजदान असें ह्मणावें. (२५३) शिवगीतेंत ह्मटलें आहे कीं, पदार्थ असा कांहीं नाहीं, आणि एकच पदार्थ असतां, त्याचे दोन भाग केले हें ह्मणणेंही बरोबर नाहीं. समर्पण करावयाची वस्तु ह्मटली तर भक्ति; आणि भक्तीची आवड असणारा शंभु अशी कल्पना करावी म्हणजे चांगलें. (२५४) श्वेताश्वतरोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, भोक्ता, भोग्य, प्रेरिता आणि भोग असे तीन प्रकार मानावें. ब्रह्मस्वरूप हें तीन प्रकारचें आहे आणि तें सर्व भोग्य आहे. (२५५) तसेच कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, दाता, दान, द्यावयाची वस्तु आणि सर्व कांहीं स्वतः शंकरच आहे. त्यांत मीपणा मुळींच नाहीं; त्या दानाला विमलदान असें ह्मणतात. (२५६) शिवपुराणांत ह्मटलें आहे कीं,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवो यजति तत्सर्वं तच्छिवस्सोऽहमेव च ॥२५६॥

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण्य श्रीसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे भक्तस्थलं नाम द्वाविंशतितमंप्रकरणं समाप्तम् ॥

---

शिव हाच दाता आहे, शिव हाच भोक्ता आहे. शिव हाच स्वतः त्रैलोक्यस्वरूप आहे-शिवच स्वतः यज्ञकर्ता आहे, सर्व कांहीं आहे तें शिवच आहे, आणि तो शिवच मी आहें.

ह्याप्रमाणें वीरशैवाचार्यांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या, वीरशैवांच्या षट्स्थल-मार्गांची स्थापना करण्यांत पुढारी ह्मणविणाऱ्या श्रीसिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्व-रानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील भक्तिस्थल नांवाचें बाविसावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुचन्नबसवेश्वराय नमः ॥

## ॥ माहेश्वरस्थलं प्रारभ्यते ॥

### ॥ त्रयोविंशतिप्रकरणम् ॥

**एवं भक्तिस्थलमाश्रित्य कर्तृत्वभावं विस्मृत्य स्वस्वरूपनिष्ठोमाहात्माऽनंतरं निष्ठामुखेन आचारमनुसृत्य सामरस्यप्राप्तभेदः कथमित्याकांक्षायामनंतरं माहेश्वरस्थलमित्युच्यते॥ वातुले वृत्तम् ॥ आस्तिक्यबुद्धिनियमव्रतसत्यधर्माशौचादिलक्षणपरिस्फुटसच्चरित्रम् ॥ लिंगैक्यनैष्ठिकतयासहवीरवृत्तम् माहेश्वरस्थलमिति प्रवदंति सन्तः ॥१॥ शिवरहस्ये ॥ नैष्ठिकाचारसंयुक्तं मायामार्गविवर्जितम् ॥ अज्ञानगुणवर्ज्यं च माहेश्वरमितीश्वरि ॥२॥ लैंगे ॥ परदारं परद्वेषं परार्थं कामहिंसनम्॥ संकल्पं च विकल्पं च वर्जयेच्छिवभक्तिमान् ॥३॥ शिवरहस्ये ॥ परस्त्रियं परार्थं च वर्जयेद्भावशुद्धिमान् ॥ लिंगनिष्ठो नियुक्तात्मा माहेश्वर उदाहृतः ॥४॥ शैवे ॥ दासीं वेश्यां च विधवां परस्त्रीं पतितस्त्रि-**

---

श्रीगुरुचन्नबसवेश्वरास नमस्कार असो. ह्याप्रमाणें भक्तिस्थलाचा आश्रय करून, कर्त्यांचा भाव आणि कृत्याचा भाव विसरून आपल्या स्वरूपाचें यथार्थज्ञान झाल्यानंतर, त्या महात्म्याच्या अनुरोधानें आचारास अनुसरून सामरस्य पावलेल्याची स्थिति कशी असते अशी शंका आल्यानंतर, माहेश्वरस्थल कसें आहे तें सांगतों. (१) वातुलांत सांगितलें आहे कीं, माहेश्वराच्या (जंगमाच्या) अंगीं आस्तिक्यबुद्धि, नियम, व्रत, सत्य, अतिशय शुचिर्भूतपणा इतके गुण असल्यामुळें त्याचें वर्तन निर्दोष असतें; तसेंच लिंगावर त्याचा दृढ विश्वास असल्यामुळें तो पराक्रमी मनुष्यासारखा शोभतो; म्हणून त्याला ज्ञानीलोक माहेश्वरस्थल असें म्हणतात. (२) शिवरहस्यांत शिवांनीं म्हटलें आहे कीं, जंगम शिवधर्मावर दृढ निश्चय ठेवून आपले आचार चांगल्या तऱ्हेनें पाळतो, त्याला कपटीवर्तनाचा मार्ग माहित नसतो, व त्याचे अंगीं अज्ञानपणा नसतो; म्हणूनच पार्वती, त्याला माहेश्वर असें नांव पडलें. (३) लिंगपुराणांत म्हटलें आहे कीं, शिवाची भक्ति मनापासून करणारा मनुष्य, दुसऱ्याच्या बायकोबरोबर दुराचाराचें कर्म, दुसऱ्यांचा द्वेष, दुसऱ्यांचें द्रव्य, पाहिजे तितकी जीवहिंसा आणि अनेक प्रकारचे संकल्पविकल्प ( वाईटसाईट गोष्टी ), कधींच करीत नाहीं. (४) शिवरहस्यांत म्हटलें आहे कीं, ज्याचें मन निष्पाप आहे, जो दुसऱ्याचे बायकोकडे पापदृष्टीनें पाहत नाहीं, जो दुसऱ्याचें द्रव्य चोरीत नाहीं, ज्याचा लिंगावर दृढविश्वास असतो, ज्याचीं इंद्रियें त्याच्या अगदीं ताब्यांत असतात, त्याला माहेश्वर असें म्हणतात. (५) शिवपुराणांत म्हटलें आहे कीं, वीरशैवयोगीश्वर दासी, विधवा, वेश्या,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यम् ॥ एवं पंचस्त्रियश्चैव वर्जयेद्वीरशैवराट् ॥५॥ सिद्धांतशेखरे ॥ एकपत्नीव्रताचारः परदारविवर्जितः ॥ जितेंद्रियो ब्रह्मचारी स एव वीरशैववान् ॥६॥ सदा सद्गुरुभक्तिःस्याल्लिंगजंगमपूजनम्॥ एकपत्नीव्रतं वीरमाहेश्वरस्य सुव्रतम् ॥७॥ शैवपुराणे ॥ शकुनं स्वप्नसामुद्री स्त्रीजातं पौरुषं तथा ॥ कामशास्त्रकलाज्ञानं राशिनक्षत्रकाणि च ॥८॥ वारं योगं च करणं घटिकालग्नकं तथा ॥ भविशब्दं मुहूर्तं च दारा होमादि कर्म च ॥९॥ तदेव भविकर्मेति त्यजेन्माहेश्वरो जनः॥ प्रमादात्कुरुते यस्तु न वै माहेश्वरो हि सः ॥१०॥ प्राणलिंगमविश्वस्य ग्रामलिंगस्य पूजनम् ॥ शुनां योनिशतं गत्वा चंडालगृहमाचरेत् ॥११॥ स्वतन्त्रः प्राणलिंगी च लिंगसंगकरस्तु यः ॥ प्रसादं स्थावरे लिंगे गृण्हीयान्नरकं व्रजेत् ॥१२॥ शिवधर्मे ॥ जलगन्धाक्षतैः पुष्पैर्धूपैर्दीपैस्तथैव च ॥ नैवे-

---

दुसऱ्याची बायको, आणि नीचकुलांत उत्पन्न झालेली बायको; अशा पांच तऱ्हेच्या बायकांकडे ढुंकून देखील पहात नाहीं. (६) सिद्धान्तशेखरांत झटलें आहे कीं, वीरशैव मनुष्य आपल्या स्वतःच्या बायकोखेरीज दुसऱ्यांच्या बायकांकडे पापदृष्टीनें कधीही पहात नाहीं. त्याचीं इंद्रियें त्याच्या स्वाधीन असतात. आणि तो ब्रह्मचारी असतो. (७) वीरमाहेश्वरव्रत पाळणारा मनुष्य नेहमीं सद्गुरूची भक्ति करितो. तो लिंगाचे आणि जंगमाचें पूजन करितो. आपल्या बायकोखेरीज दुसऱ्यांच्या बायकांकडे कधींही पापदृष्टीनें पहात नाहीं. हें वीरमाहेश्वराचें सदाचरण आहे. (८) शैवपुराणांत झटलें आहे कीं, शकुन पाहणें, स्वप्नाचा अर्थ सांगणें, सामुद्रिक पाहणें, स्त्रियांचे अथवा पुरुषांचें जातक पाहणें, कामशास्त्राची सविस्तर रीतीनें माहिती करून घेणें, राशि, नक्षत्र, (९) वार, योग, करण, घटिका, लग्न, भविलोकांचा शब्द, मुहूर्त वगैरे सांगणें, दारा, होम वगैरे हीं भविकर्में होत; झणून असलीं कर्में करूं नये. (१०) असें कर्म माहेश्वर ( जंगम ) जातीचा मनुष्य कधींही करीत नाहीं. जर कदाचित् न कळत त्याचे हातून असें भलतेंसलतें कर्म घडलें, तर त्यास माहेश्वर झणूं नये, तो माहेश्वरच नव्हे. (११) जो कोणी मनुष्य प्राणलिंगावर विश्वास न ठेवितां, गांवांत इतर देवळें करून त्यांत स्थापन केलेल्या स्थावरलिंगाची पूजा करतो. तो मनुष्य शंभरवेळ कुत्र्याच्या जन्मास जाऊन पुनः चांडाळाच्या वंशांत जन्मास येतो. (१२) ज्यानें आपल्या शरीरावर इष्टलिंग धारण केलें आहे, तो स्वतंत्र असून त्यास प्राणलिंगी असें झणावें; तो जर आपल्या इष्टलिंगाखेरीज इतर स्थावरलिंगाचा प्रसाद घेईल, तर नरकास जाईल. (१३) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, पाणी, गंध, अक्षत, फुलें, धूप, दीप, तसेच नैवेद्य, आणि तांबूल, ह्या द्रव्यांनीं शिवाचें पूजन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्यैरपि तांबूलैर्भवेदष्टविधार्चनम् ॥१३॥ अर्घ्यं पाद्यं तथाचम्यं स्नानं नैवेद्यमेव च ॥ दर्पणं धूपदीपौ च चामरं चातपत्रकम् ॥१४॥ गीतं वाद्यं तथा नृत्यं नमस्कारो जपस्तथा ॥ प्रदक्षिणं क्रमेणोक्ताः षोडश ह्युपचारकाः ॥१५॥ वातुले ॥ पूजा द्वादशधा प्रोक्ता शिवसिद्धान्ततत्परैः॥ उपचारास्तथाचैव चतुर्विंशद्विधाः स्मृताः ॥१६॥ विभूत्यभ्युक्षणं लिंगे करणं स्नपनं तथा ॥ अंगारतापनं चैव धूपसंव्यजनं तथा ॥१७॥ धूमप्रसरणं चैव ततो गंधावतंसनम् ॥ अक्षतारोपणं चैव पुष्पोपहरणं तथा ॥१८॥ दीपप्रकाशनं चैव नैवेद्यस्य समर्पणम् ॥ तांबूलस्य प्रदानं च वस्त्रप्रावरणं तथा ॥ एवं द्वादशधा प्रोक्ता शिवलिंगार्चनक्रिया ॥१९॥ आसनाव्हानमर्घ्यं च पाद्यमाचमनं तथा ॥ यज्ञोपवीतमाल्यानुलेपनाभरणानि च ॥२०॥ छत्रं च चामरं चैव तालवृंतं च दर्पणम् ॥ घंटाशखं च गीतं च वाद्यं नृत्यं प्रदक्षिणम् ॥२१॥ नमस्कारः स्तुतिर्याञ्चा विज्ञप्तिस्तु विसर्जनम् ॥ इत्येवमुपचाराश्च चतुर्विंशतिधाः स्मृताः ॥२२॥ समर्चनोपचाराणां योगः षट्त्रिंशदीरितः ॥ षट्त्रिंशत्त-

---

केलें; ह्मणजे त्या पूजनास अष्टविधार्चन (आठ पदार्थांनीं केलेलें शिवाचें पूजन) असें ह्मणतात. (१४) अर्घ्य, पाद्य, आचमन, स्नान, नैवेद्य, दर्पण, धूप, दीप, चामर, आणि छत्र, (१५) गायन, वाद्य, नृत्य, नमस्कार, जप आणि प्रदक्षिणा, हे अनुक्रमानें पूजेचे सोळा प्रकार सांगितले आहेत. (१६) वातुलांत सांगितलें आहे कीं, शिवसिद्धांत यथार्थ रीतीनें जाणणाऱ्या लोकांनीं पूजेचे बारा प्रकार सांगितले आहेत, आणि उपचाराचे चोवीस प्रकार सांगितले आहेत. (१७) ते पूजेचे बारा प्रकार असे–लिंगास विभूति लावणें, स्नान घालणें, विस्तवावर शेकणें, धूप पेटवून वारा घालणें, तसेंच (१८) धूर चोहोंकडे पसरविणें, त्यानंतर मस्तकास गंधाचा लेप करणें, अक्षता वाहणें, फुलें वाहणें, तसेंच (१९) दीप पेटविणें, नैवेद्य समर्पण करणें, विडा देणें, आणि वस्त्रप्रावरण अर्पण करणें ह्याप्रमाणें बारा प्रकारची शिवलिंगाची पूजा करावी ह्मणून सांगितलें आहे. (२०) आसन, आवाहन, अर्घ्य, पाद्य, आचमन, यज्ञोपवीत, फुलांच्या माळा, गंध, अलंकार, (२१) छत्र, चामर, विंझणा, आरसा, घंटा, शंख, गाणें, वाजविणें, नाचणें, प्रदक्षिणा करणें, (२२) नमस्कार आणि स्तुति, पदर पसरून क्षमा मागणें, विनंति करणें, आणि विसर्जन करणें, असे चोवीस प्रकारचे उपचार ह्मणून मानलेले आहेत. (२३) बारा प्रकारची पूजा, आणि चोवीस प्रकारचे उपचार, मिळून पूजेचे आणि उपचारांचे छत्तीस भेद झाले.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्वमप्येषां शैवी स्थितिरिति श्रुतिः ॥२३॥ अथार्चनोपचाराणां योगक्रम उदीर्यते ॥ विभूत्यभ्युक्षणाल्लिंगे पृथिवी परिशुध्यते ॥२४॥ आपश्च स्नपनात्तद्वद्वन्हिरंगारतापनात् ॥ वायुस्तदार्द्ररूपेण शिवव्यजनकर्मणा ॥२५॥ धूपधूम्रेणचाकाशश्चंद्रो गन्धावतंसनात् ॥ ज्योत्स्ना कर्पूरदीपेन नक्षत्राण्यक्षतैः शुभैः ॥२६॥ सूर्यः पुष्पोपहारेण घृतदीपेन चातपः ॥ छायापश्चात् पुरस्ताच्च पार्श्वतो दीपचालनात् ॥२७॥ शीतोष्णादीनि पूर्वोक्ततत्तदंशोद्भवादिभिः ॥ आत्मानैवेद्यरूपेण ताम्बूलात् त्रिगुणा व्ययम् ॥२८॥ वस्त्रप्रावरणादेव विशुद्ध्यंति दिशो दश ॥ एवमर्पणसापेक्षैरर्चनैः शिवमर्चयन् ॥ द्रव्यशुद्धिं परां लब्ध्वा प्रसादसुखमश्नुते ॥२९॥ वृत्तम् ॥ चित्कान्ताधरसेवनं जपविधिश्चालिंगनं नैष्ठि-

---

म्हणून शिवतत्वेंही छत्तीसच आहेत, आणि शिवपूजाही छत्तीस प्रकारची आहे असें वेद सांगतो. (२४) आतां शिवाची बारा प्रकारची पूजा, आणि चोवीस प्रकारचे उपचार ह्यांपासून कोणत्या पूजेनें किंवा कोणत्या उपचारानें काय काय वस्तु शुद्ध होतात तें सांगतों. लिंगाला विभूतीचा लेप केला असतां पृथ्वी शुद्ध होते; (२५) लिंगास स्नान घातलें तर त्यामुळें पाणी शुद्ध होतें; विस्तवावर लिंगास तापविल्यानें अग्नि शुद्ध होतो; पाण्यांत भिजविलेल्या वाळ्याचे विंझण्यानें शिवास वारा घातल्यानें वायु शुद्ध होतो. (२६) धूपाचा धूर दिल्यानें आकाश शुद्ध होतें; लिंगास गंध लाविल्यानें चंद्र शुद्ध होतो; शिवापुढें कापुराचा दीप लाविल्यानें चंद्रप्रकाश शुद्ध होतो; शिवाला चांगल्या चांगल्या अक्षता अर्पण केल्यानें नक्षत्रें शुद्ध होतात. (२७) शिवास सुवासिक फुलें समर्पण केल्यानें सूर्य शुद्ध होतो; शिवापुढें तुपाचा दिवा लावल्यानें ऊन्ह शुद्ध होतें; शिवाच्या पाठीमागें, पुढें, आणि आजूबाजूला दिवा ( दीप ) ओंवाळला म्हणजे छाया शुद्ध होते. (२८) पूर्वीं जे जे पदार्थ अर्पण करावे म्हणून वर सांगितलें आहे त्या त्या पदार्थांच्या अंशांनीं शीत, उष्ण वगैरे इतर त्या त्या वस्तूंचे गुणधर्म शुद्ध होतात. शिवाला नैवेद्य समर्पण केला असतां आत्मा शुद्ध होतो, आणि तांबूल ( विडा ) शिवास अर्पण केला तर त्यामुळें सत्व, रज व तम हे तीन गुण शुद्ध होतात. (२९) शिवाला वस्त्रप्रावरण अर्पण केलें तर दहा दिशा शुद्ध होतात. ह्याप्रमाणें अर्पण करावयाच्या वस्तु शिवास अर्पण करून शिवपूजा करणाऱ्या मनुष्याची चांगली द्रव्यशुद्धि होऊन, त्यास प्रसादसुखाचा अनुभव घ्यावयास सांपडतो. (३०) शिवपंचाक्षरीमंत्राचा एकाग्रमनानें जप करूं लागलें असतां चैतन्यरूप स्त्रियेचें चुंबन घेण्यासारखेंच जप करितांना सुख

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

का बद्धं पाणितलं क्षतं गणनरेखैर्वाक्यविक्षेपणम् ॥ संरंभः सुरतक्रि
समुचितं शय्या हि पद्मासनं सल्लापः शनकैरुदीरितमनः पंचाक्षरी
संगमे ॥३०॥ रमते मामहोरात्रं पराविद्या परांगना ॥ नावकाशो मया
रंतुं तव माये परांगने ॥३१॥ वीरागमे ॥ ज्ञानं ज्ञेयमनुष्ठेयमधिकारो
ऽपि साधनम् ॥ साध्यं चेति षडर्थानां संग्रहिष्यामि संग्रहम् ॥३२
गुरोरधिगतं ज्ञानं ज्ञेयं पाशः पशुः पतिः ॥ लिंगार्चनाद्यनुष्ठेयं भस्म
द्यधिकृतिर्भवेत् ॥३३॥ साधनं शिवमंत्रादि साध्यं शिवसमानता ॥
दार्थसंग्रहस्यास्य ज्ञानात्सर्वज्ञतोच्यते ॥३४॥ वृत्तम् ॥ जलाभिषेकोत्
फलं जनानां पत्रप्रसूनार्चनजं द्रुमाणाम् ॥ नैवेद्यसंकल्पजमोषधीनाम्

---

लागतें, पंचाक्षरीमंत्रावर दृढ विश्वास ठेवणें, हें त्या चिद्रूपस्त्रीला कडकडून भेटण्या
सारखें सुख देतें. पंचाक्षरीमंत्राचा जप करीत असतांना जोडलेले दोन्ही हात चै
न्यस्त्रीचे अंगावर प्रेमानें केलेल्या नखक्षतांसारखे शोभतात. पंचाक्षरीमंत्राची संख्या
किती झाली हें वारंवार हळुहळू मोजणें, हेंच त्या चिद्रूपस्त्रीबरोबर प्रेमाचें बोल
होय. एकाग्रमनानें पंचाक्षरीमंत्राचा जप करणें हें त्या चिद्रूपस्त्रीबरोबर मैथुन क
आहे. पंचाक्षरीमंत्र जप करावयाच्यावेळीं पद्मासन घातलेलें असतें तें पद्मासन
चिद्रूपस्त्रीबरोबर विलास करावयाच्या वेळेचा बिछाना आहे, आणि हळूहळू पंचाक्ष
मंत्राचा जप करणें, हेंच त्या चिद्रूपस्त्रीबरोबर सुखासमाधानाच्या गोष्टी बोलणें हो
(३१) मजबरोबर शिवपंचाक्षरीरूप महाविद्या नेहमीं विलास करीत असते त्या
परपुरुषाची स्त्री असणारे माये, तुजबरोबर विलास करण्यास मला फुरसतच मिळ
नाहीं. (३२) वीरागमांत म्हटलें आहे कीं, ज्ञान, जाणावयाची वस्तु, करावयाचें कर्म
अधिकार, साधन, आणि साध्य, ह्या सहा वस्तूंचा मी संग्रह करीन. (३३) गुरू
पासून जें कांहीं शिकावयाचें तें ज्ञान, पाश कोण? पशु कोण? आणि पति कोण
हें समजून घ्यावयाचें हेंच होय. ह्यालाच ज्ञेय म्हणतात. नेहमीं लिंगपूजन करणें हें
अनुष्ठेय ( नित्य करावयाचें कर्म ) आहे. भस्म रुद्राक्ष धारण करणें हाच अधिकार
होय. (३४) शिवमंत्र वगैरे साधन असून शिवाची साम्यता (बरोबरी) पावणें हें
साध्य ( प्राप्त करून घ्यावयाची वस्तु ) होय. ह्या पदार्थसंग्रहाचें ज्ञान झालें म्हणजे
त्यास सर्वज्ञता असें म्हणतात. (३५) शिवावर शुद्धोदकाचा अभिषेक करणें, ह्या
पाण्याचा उपयोग आहे. शिवपूजेच्या उपयोगीं पडण्यासारखीं पानें फुलें द्यावीं, ह्य
झाडांचा उपयोग आहे. शिवाच्या नैवेद्याकरितां पदार्थ तयार करितां यावे, ह्य
औषधींचा उपयोग आहे. शिवपूजेच्या उपयोगीं पडण्यासारखी वस्तु ज्यांच्यापा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कृतः परेषामकृतात्मानां च ॥३५॥ शिवधर्मोत्तरे ॥ परिनिष्ठितभावस्य शिवलिंगार्चनाविधौ ॥ अपवर्गोऽपि दुष्प्रापः सिद्धः पाणितले स्थितः ॥३६॥ लैंगे ॥ यथा मुनिवरं त्यक्त्वा पतिमित्रं पतिव्रता ॥ कृतकृत्या भवेत्पूर्वं तपसाराध्यशंकरम् ॥३७॥ शिवलिंगं परित्यज्य योऽन्यं देवमुपासते ॥ प्रसादो निष्फलस्तस्य रौरवं नरकं व्रजेत् ॥३८॥ वातुले ॥ ध्यायेन्नस्मरेदन्यं न पश्येच्छृणुयान्न च ॥ यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥३९॥ शैवरत्नाकरे ॥ स्वजातिस्वकुलाचारं लिंगनिष्ठपरायणः ॥ त्यजेन्माहेश्वरो धीरः पूर्वाश्रयनिरासकः ॥४०॥ मातरं पितरं भ्रातॄन् बान्धवान् सुहृदो धनम् ॥ सर्वं त्यक्त्वा सदाचारी लिंगत्रयमुपासयेत् ॥४१॥ लैंगे ॥ ज्ञानाचारविहीनश्चेत्सर्ववेदसमन्वितः ॥

---

उपयोग होत नाहीं अशा दुसऱ्या वस्तूंचा काय उपयोग आहे? त्यांचा कांहींएक उपयोग नाहीं. (३६) शिवधर्मोत्तरांत सांगितलेलें आहे कीं, शिवलिंगपूजा करण्याविषयीं ज्याचें अन्तःकरण भक्तियुक्त आहे, त्या मनुष्याला मोक्ष दुर्मिळ नाहीं; आणि सिद्धि तर त्याच्या तळहातांत असल्यासारखी आहे. (३७) लिंगपुराणांत म्हटलें आहे कीं, जशी पूर्वीं एक पतिव्रता वायको आपल्या नवऱ्यास आणि इतर नवऱ्याचे मित्र यांस न जुमानतां, शंकराची आराधना करूं लागली, आणि त्यामुळें कृतकृत्य झाली; त्याप्रमाणें शिवोपासना करणारे लोक धन्य होतील. (३८) शिवलिंगपूजन करण्याचें सोडून देऊन जो मनुष्य दुसऱ्या देवांची पूजा करितो, त्याचा प्रसाद निष्फळ होतो; आणि तो रौरवनरकास जातो. (३९) वातुलांत म्हटलें आहे कीं, शंकराखेरीज दुसऱ्या देवाचें ध्यान करूं नये. शंकराखेरीज दुसऱ्या देवाचें स्मरण करूं नये. दुसऱ्या देवाचें दर्शन घेऊं नये व दुसऱ्या देवाचे गुणानुवाद ऐकूं नयेत. ज्या घरांत शिवाखेरीज इतर देव असतील तीं घरें वर्ज्य करावींत (त्या घरीं जाऊं नये). (४०) शैवरत्नाकरांत सांगितलें आहे कीं, जो दृढ निश्चयी माहेश्वर आहे तो लिंगनिष्ठेनें लिंगपूजन करूं लागला, म्हणजे मग पूर्वाश्रमांतील सर्व कर्मे सोडून देतो; आपल्या जातीचा आणि कुलाचा आचार काय असेल तो मुळींच पाळीत नाहीं. (४१) जो सदाचारी मनुष्य आहे तो आपली आई, आपला बाप, आपले भाऊ, आपले नातलग, आपले इष्टमित्र, आपलें द्रव्य, हे सर्व कांहीं सोडून देऊन इष्टलिंग, प्राणलिंग आणि भावलिंग, ह्या तीन लिंगांची उपासना करितो. (४२) भागीरथीचें पाणी पवित्र आहे ही गोष्ट खरी आहे, परंतु तें जर एखाद्या हीनाच्या महारामांगाच्या भांड्यांत भरलेलें असलें, तर त्याचा जसा उपयोग नाहीं;

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दुष्टचांडालभांडेषु यथा भागीरथीजलम् ॥४२॥ सौरसंहितायाम्॥ यस्तु संवत्सरं प्रेम्णा पतितैः सह वासयेत् ॥ याने शय्यासने नित्यं ज्ञानी च पतितो भवेत् ॥४३॥ शिवज्ञानं शिवध्यानं शिवपूजातपःफलम् ॥ निष्फलं यान्ति देवेशि भविसंसर्गकारणात् ॥४४॥ शिवधर्मोत्तरे ॥ असंस्कारिकृतं पापं शंभोर्नैवेद्यमेव न ॥ अनैवेद्यं तु भुंजीयान्नरके कालमक्षयम् ॥४५॥ शिवरहस्ये ॥ भविपाको न कर्तव्यः शिवलिंगार्पणाय च ॥ भक्तपाको हि कर्तव्यः शंभोर्निवेदितुं सदा ॥४६॥ शिवधर्मोत्तरे॥ भक्तानां सदनं गत्वा भुंजीयाद्भक्तिसंयुतः ॥ वर्णानामष्टदशकं चांडालमिति वर्जयेत् ॥४७॥ लैंगे ॥ व्रतोपवासनियमैर्येन केनापि हेतुना ॥ पूजाप्रसादलोपश्च नासौ ह्याप्नोति तत्फलम् ॥४८॥ आदित्यपुराणे ॥ प्राणलिंगी प्रसादी चेन्नोपवासादिकं चरेत् ॥ मोहाद्यद्याचरेत्तस्य प्रत्य-

---

तसा एखादा मनुष्य चारी वेद मुखोद्गत ह्मणणारा असून त्यास शिवज्ञान नसेल, तर त्याचा कांहींएक उपयोग नाहीं. (४३) सौरसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जरी ज्ञानी असला तरी तोच ज्ञानी एक वर्षपर्यंत पतितांबरोबर स्नेहभावानें वागेल त्यांच्याच मंडळींत नेहमीं वापरेल, त्यांच्याबरोबर गाड्याघोड्यांवर बसेल, त्यांच्याबरोबर नेहमीं ह्तरुणापांघरुणांत लोळेल, तर तो पतितच होईल. (४४) हे देवी पार्वती, ज्ञानी मनुष्यानें भवि लोकांचा ( नीच लोकांचा ) संसर्ग केला, तर त्याचें शिवज्ञान, त्याचें शिवध्यान, त्याचें शिवपूजन, व त्याचें तपश्चर्येचें फळ सर्व कांहीं व्यर्थ होतें. (४५) शिवधर्मोत्तरांत सांगितलें आहे कीं, ज्यानें शिवदीक्षा घेतली नाहीं, त्यानें कोणतेंही सत्कृत्य केलें तरी तें पापकृत्यच समजावें; त्याच्या हातचा नैवेद्य शंकरास चालत नाहीं. तो अलिंगी मनुष्यानें अर्पण केलेला शिवनैवेद्य जो भक्षण करील, तो अनेक काळपर्यंत नरकांत पडेल. (४६) शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, शिवाला नैवेद्य दाखविण्याकरितां भवि लोकांनीं स्वयंपाक करूं नये. शिवाला नैवेद्य समर्पण करावयाच्या अन्नाचा स्वयंपाक नेहमीं भक्तांनींच केला पाहिजे. (४७) शिवधर्मोत्तरांत ह्मटलें आहे कीं, भक्तांच्याच घरीं जाऊन मोठ्या आनंदानें भोजन करावें. भक्त लोकांखेरीज इतर अठरापगड जातींच्या लोकांचीं घरें चांडाळांचीं घरें आहेत, असें समजून तीं वर्ज्य करावीं. भक्तांचीं घरें मात्र अन्न घ्यावयास योग्य आहेत इतरांचीं नाहींत. (४८) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, व्रत, उपवास, नियम, वगैरे पाळून, किंवा आणखी कोणत्याही प्रकारानें, शिवपूजेचा आणि प्रसादाचा लोप न होईल असें वर्तन करावें; नाहींपेक्षां त्या व्रतांचें उपवासांचें वगैरे फळ त्या मनुष्यास मिळणार नाहीं. (४९) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, प्राणलिंगी मनु-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यो महान् भवेत् ॥४९॥ शिवरहस्ये ॥ गौरवं लैंगिकाचारं प्रसादं चरणोदकम् ॥ भक्तिकं च मया प्रोक्तं षड्विधं व्रतमाचरेत् ॥५०॥ अक्रोधस्सत्यवचनं संविभागो दमः क्षमा ॥ अनुग्रहश्च दानं च शीलमेतत्प्रशस्यते ॥५१॥ अक्रोधो गुरुशुश्रूषा शौचमाहारलाघवम् ॥ अप्रमादश्च पंचैते नियमाश्च प्रकीर्तिताः ॥५२॥ षड्वर्गविजयः शूरः कालकामजयप्रभुः ॥ पंचेंद्रियसमारूढो वीरमाहेश्वरः स्मृतः ॥५३॥ स्वच्छन्दललितभैरवीये ॥ वृत्तम् ॥ भिंदन्ति चाद्रीनुदधीन् पिबन्ति व्यत्यासयन्ति क्षितिमंतरिक्षम् ॥ विश्वं विलुंपन्ति पुनः सृजन्ति किं दुष्करं शंकरकिंकराणाम् ॥५४॥ स्कान्दे ॥ माहेश्वरपदासक्तं स्थानं भवति संपदाम् ॥ पदाहतं दधीचेन विष्णोर्वक्षः श्रियः पदम् ॥५५॥ ब्रह्मनारा-

---

ध्यानें आणि प्रसादी मनुष्यानें उपवास वगैरे कांहींएक करूं नये. जर अज्ञानपणानें तो मनुष्य उपवास वगैरे करील तर त्याचे नियमास मोठा अपवाद येईल. (५०) शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, गुरुसंबंधी व्रत, लिंगसंबंधी व्रत, आचारसंबंधी व्रत, प्रसादसंबंधी व्रत, चरणोदकसंबंधी व्रत, आणि भक्तसंबंधी व्रत, अशीं सहा प्रकारचीं व्रतें मीं सांगितलीं आहेत. हीं सहा व्रतें मनुष्यानें करावींत. (५१) शांतस्वभाव ( अक्रोध ), सत्यभाषण, यथायोग्य व्यय करणें, ( भवि भक्तांचा भेद ) इंद्रियनिग्रह, दया, अनुग्रह, आणि दान, इतके गुण अंगीं असणाऱ्या मनुष्याचें शील चांगलें असें मानलें जातें. (५२) अक्रोध ( शांतस्वभाव ), गुरुसेवा, स्वच्छपणा, लवकर लवकर जेवणें ( चेंगटपणा न करणें ), व सावधपणा ( दक्षता ) असणें, हे पांच नियम ह्मणून मानले आहेत. (५३) काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे जिंकणें (हे दुर्गुण अंगीं नसणें), पराक्रम, काळाला आणि मदनाला जिंकण्याची अंगांत शक्ति असणें, पांच ज्ञानें आपले स्वाधीन ठेवणें, इतकी योग्यता ज्याचे अंगीं आहे, त्यास वीरमाहेश्वर असें ह्मणतात. (५४) स्वच्छन्दललितभैरवांत सांगितलें आहे कीं, शिवभक्तलोक पर्वत फोडतील, प्रसंग पडल्यास समुद्रांचें सर्व पाणी पिऊन टाकून समुद्र कोरडा करतील; पृथ्वीला आकाशांत नेऊन ठेवतील, व आकाशास पृथ्वीवर आणूं शकतील; विश्वाचा संहार करून टाकतील, आणि पुनः सृष्टि उत्पन्न करूं शकतील. सारांश, शिवभक्तांस करितां येत नाहीं असें कांहींच नाहीं. ते सर्वकांहीं करूं शकतील. (५५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, माहेश्वरानें जेथें पाय ठेविला तें स्थळ संपत्तीचें स्थान होतें. ह्याला प्रत्यक्ष उदाहरण ह्मटलें तर, दधीचि मुनीनें विष्णूच्या उरावर लाथ मारली तो विष्णूचा ऊर लक्ष्मीची नेहमींची रहाण्याची जागा झाली. (५६) जो प्रसादी मनुष्य आहे त्याच्या आज्ञेप्रमाणें ब्रह्म-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

यणाद्याश्च देवता अखिला अपि ॥ प्रजायन्ते च नश्यन्ति ह्याज्ञयैव प्रसादिनः ॥५६॥ वासिष्ठे ॥ यथा भक्तिस्तथा सिद्धिः सत्यं सत्यं न संशयः ॥ यथा भावस्तथा लिंगं सत्यं सत्यं न संशयः ॥५७॥ शिवरहस्ये॥ पंचाक्षरोपदेशी च नरस्तुतिकरो यदि ॥ सोऽलिंगी स दुराचारी कुकविः स तु विश्रुतः ॥५८॥ सर्वज्ञानोत्तरे ॥ न च मुख्यतया स्कंद लोकधर्मं समाश्रयेत् ॥ नान्यशास्त्रसमादिष्टं न चान्यां देवतां स्मरेत् ॥५९॥ वीरभद्रीये ॥ पतिव्रतास्वभावेन विहायान्यत्तु दैवतम् ॥ शिवमेकं भजेद्भक्त्या सर्वशांतिकरं परम् ॥६०॥ आदित्यपुराणे ॥ शिवे भक्तो नरो राजन् भक्तोऽन्येषु सुरेषु यः ॥ स्वपतिं युवतिस्त्यक्त्वा यथा चान्येषु रज्यते ॥६१॥ पाराशरपुराणे ॥ विहाय साम्बमीशानं ये भजन्त्यन्यदैवतम् ॥ ते महाघोरसंसारे पतंति परिमोहिताः ॥६२॥ ब्र-

---

देव, नारायण वगैरे सर्व देवता देखील उत्पन्न होतात, आणि नाशही पावतात. (५७) वासिष्ठपुराणांत सांगितलें आहे कीं, जशी भक्ति असेल तशी सिद्धि होते, हें अगदीं खरें आहे; ह्यांत कांहीं संशय नाहीं. जसा भाव असेल तसें लिंग आहे, हें अगदीं खरें आहे, ह्यांत संशय नाहीं. (५८) शिवरहस्यांत झटलें आहे कीं, शिवपंचाक्षरीमंत्राचा ज्याला उपदेश झाला आहे, तो मनुष्य जर लिंगाची स्तुति न करितां मनुष्याची स्तुति करील, तर तो अलिंगी समजावा; तो दुराचारी समजावा, तो वाईट चालीचा कवि झणून लोकांत प्रसिद्धीस येतो. (५९) सर्वज्ञानोत्तरांत सांगितलें आहे कीं, शिव झणतात-- मुला कार्तिकेया, आपला धर्म प्रसिद्ध नाहीं, म्हणून इतर लोकांचा सर्व पृथ्वीवर प्रसिद्ध असलेला धर्म स्वीकारूं नये. अन्यमती लोकांच्या शास्त्रांत जें कांहीं सांगितलें असेल तें खरें मानूं नये, आणि शिवाखेरीज इतर देवांचें स्मरणही करूं नये. (६०) वीरभद्रीयांत सांगितलें आहे कीं, पतिव्रता बायको जशी आपल्या पतीखेरीज दुसऱ्या पुरुषाकडे कधींही पाहत नाहीं, त्याप्रमाणें मनुष्यानें शिवाखेरीज इतर देवांस भजूं नये; एका शिवालाच भक्तिभावानें भजावें. तो देव सर्व देवांत श्रेष्ठ असून मनाला शांति देणारा आहे. (६१) आदित्यपुराणांत सांगितलें आहे कीं, राजा, जो कोणी मनुष्य शिवाची भक्ति करीत असून इतर देवांचीही भक्ति करितो, तो मनुष्य जशी एखादी दुराचारी बायको आपल्या नवऱ्यास सोडून दुसऱ्या पुरुषाबरोबर व्यभिचारकर्म करिते, तसा दुराचारी समजावा. (६२) पाराशरपुराणांत सांगितलें आहे कीं, जे पार्वतीपति श्रीशंकराला भजावयाचें सोडून, इतर देवतांस भजतात; ते आपला पति कोण आहे हें त्यांस न समजल्यामुळें, अतिशय भयंकर अशा संसारसमुद्रांत पडतात. (६३) ब्रह्म-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्गीतायाम् ॥ शिवपूजापरो भूत्वा योऽन्यदेवमनुस्मरेत् ॥ अष्टविंशति-कोट्यस्तु नरके यातना ध्रुवम् ॥६३॥ लिंगार्चनैकशरणो योऽन्यं देवं तु वंदते ॥ नायकं नरकं गत्वा चित्रदोषी तु जायते ॥६४॥ ग्रन्थान्तरे॥ शम्भोर्नैवेद्यकं शुद्धमन्योच्छिष्टविमिश्रितम् ॥ तद्गृहं शिवभक्तानां वर्जनीयं न संशयः ॥६५॥ यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥ यद्गृहेषु भविप्राप्तिस्तद्गृहाणि परित्यजेत् ॥६६॥ वीरागमे ॥ वृत्तम् ॥ भक्तो दुराचारदुरिष्टदुर्लभो दूरीकृताशेषदुरुक्तिदूषणः ॥ दुष्टापहा दुर्घटरोगनाशको दुर्ज्ञेयदुष्पारगुणो विराजते ॥६७॥ शैवरत्नाकरे ॥ तदेव लिंगं तत्प्रोक्तं लिंगाचारस्तु यस्य वै ॥ तेनैवाचारलिंगेन लिंगी माहेश्वरो जनः ॥६८॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ शब्दं गृण्हन्नगृण्हीयादन्याख्यामीश्वरादृते ॥ पद्भ्यां न पद्यते चान्यद्दृते भूतेश्वरालयात् ॥६९॥

---

गीतेंत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य शिवाची एकनिष्ठपणानें पूजा करीत असून, दुसऱ्या देवांचीही भक्ति करितो; तो मनुष्य खरोखर अठ्ठावीस कोटि वर्षेंपर्यंत नरकांत भयंकर यातना भोगतो. (६४) जो मनुष्य शिवलिंगाची एकनिष्ठपणें सेवा करणारा असून दुसऱ्या देवांस नमस्कार करितो, तो अतिशय कष्टप्रदस्थिति असणाऱ्या नरकांत जाऊन पुनः पृथ्वीवर जन्मास येऊन अनेक प्रकारचीं पापें करितो. (६५) ग्रन्थान्तरांत सांगितलें आहे कीं, ज्या घरीं शिवाला समर्पण करावयाचा शुद्धान्नाचा नैवेद्य इतर देवांच्या नैवेद्यांत मिळविला जातो; त्या शिवभक्ताचे घरीं जाऊं नये, तें घर वर्ज्य करावें; ह्यांत संशय नाहीं. (६६) ज्या घरीं शिवाखेरीज इतर देव आहे, तीं घरें वर्ज्य करावींत; त्या घरीं जाऊं नये. तसेंच ज्या घरीं अलिंगि लोकांची मंडळी राहते, तीं घरें वर्ज्य करावींत; त्या घरीं देखील जाऊं नये. (६७) वीरागमांत सांगितलें आहे कीं, शिवभक्ताचे अंगीं दुराचार आणि दुष्ट विचार नसतात, तो अपकृत्यें कधीं करीत नाहीं, व कोणास अपशब्दही बोलत नाहीं. तो दुर्जनांचा स्नेह करीत नाहीं, त्याचें दर्शन घेतलें तर ज्यास असाध्य रोग झाला असेल तो बरा होतो. त्याचे अंगीं अनेक चांगले चांगले गुण असतात, ते यथार्थ रीतीनें समजत नाहींत. ह्या गोष्टींमुळें त्या शिवभक्ताची लोकांत प्रतिष्ठा होते. (६८) शैवरत्नाकरांत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य लिंगाचार यथार्थ रीतीनें पाळतो त्याच्याच लिंगास लिंग ह्मणावें. आणि त्या आचारलिंगामुळेंच जंगमाला लिंगि असें ह्मणतात. (६९) अचिंत्यविश्वसाद नांवाचे ग्रंथांत झटलें आहे कीं, शिवभक्त मनुष्य तोंडानें शब्द उच्चारणें झालें, तरी शिवनामाखेरीज दुसरा शब्दच उच्चारीत नाहीं; पायानें चालणें झालें तर शिवालयाखेरीज दुसरीकडे कोठेंही जातच नाहीं. (७०)

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सूत्रार्णवे ॥ मत्तोऽन्यदनपेक्षाणां मद्गतानां महात्मनाम् ॥ ब्रह्मविष्णुसुरेशानामपि तूलायते पदम् ॥७०॥ कामिकागमे ॥ क्षयातिशयसंयुक्ता ब्रह्मविष्ण्वादिसंपदः ॥ तृणवन्मन्यते बुद्ध्या वीरमाहेश्वरः सदा ॥७१॥ अथर्वणे ॥ अतएव अनीश्वरा अनर्च्या अनित्यपदान्वितानश्वरा अपवर्गपदं दातुमसमर्थास्तस्मादीश्वरस्य अनश्वरः सकलनिष्कलात्मकः सच्चिदानंदस्वरूपः सदाशिवः शिवंकरः शिवएव नित्यमुक्तिप्रदः स एव मुमुक्षुभिः पूजनीयः स एको ध्येयः सर्वमन्यत्परित्यजेदित्यनेन वाक्येन देवतान्तरपरित्यागोऽभिधीयते ॥७२॥ कामिकागमे ॥ ब्रह्माद्यैर्मलिनप्रायैर्निर्मले परमेश्वरे ॥ साम्योक्तिं यो न सहते स वै माहेश्वराभिधः ॥७३॥ श्रीरुद्रीये ॥ यो भूतानामधिपतयो विशिखासः कप-

---

सूत्रार्णवांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात--पार्वती, जे माझे भक्त मजखेरीज इतर देवांस कधीं मनांतही आणीत नाहींत, जे माझी भक्ति एकनिष्ठपणानें करितात, ज्यांचीं मनें मोठीं आहेत, अशा माझ्या भक्तांस ब्रह्मदेवाचा सत्यलोक आणि श्रीविष्णूचा वैकुंठलोक, व इंद्राचा स्वर्गलोक हे देखील तुच्छ वाटतात. (७१) कामिकागमांत सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेवाची संपत्ति आणि श्रीविष्णूची संपत्ति ह्यांस नाश आणि वृद्धि आहे; त्या अक्षय सारख्या राहणाऱ्या नाहींत. ह्यासाठीं वीरमाहेश्वर आपल्या समजुतीप्रमाणें त्यास कसपटासारखें मानतो. (७२) अथर्वणवेदांत सांगितलें आहे कीं, ह्यासाठींच शिवाखेरीज इतर देव असमर्थ आहेत, ते पूजा करण्यास योग्य नव्हत, त्यांचीं स्थानें अक्षयकाळपर्यंत राहणारीं नाहींत, ते देव देखील जन्ममरण ही अवस्था भोगणारे आहेत, त्यांच्यानें मोक्ष देववत नाहीं. ह्मणूनच हा शिवपरमात्मा अविनाशी आहे, तो सप्रपंच निष्प्रपंच आहे, तो सच्चिदानंदस्वरूप आहे, त्याला सदाशिव ह्मणतात, तो नेहमीं सर्वांचें कल्याण करितो, तो शंकरच नेहमीं मोक्ष देणारा आहे; ज्यांस आपण मुक्त व्हावें असें वाटत असेल त्यांनीं त्या शिवाचेंच पूजन करावें; त्या एका शिवाचेंच ध्यान करावें. बाकीचें सर्व सोडून द्यावें, ह्या वचनांवरून, शिवाखेरीज इतर देवांचा त्याग करावा, असें स्पष्ट सांगितल्यासारखें होतें. (७३) कामिकागमांत सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगैरे देव पातकी आहेत; आणि परमेश्वर श्रीशंकर निर्दोष आहे. त्या ब्रह्मदेवासारखा आणि विष्णूसारखाच श्रीशंकर हा एक देव आहे असें ह्मटलेलें ज्याला आवडत नाहीं, त्याला माहेश्वर असें ह्मणावें. (७४) श्रीरुद्रांत ह्मटलें आहे कीं, शिखारहित असून जटा मुकुट यांनीं जे मंडित आहेत, ते माहेश्वर लोक सर्वांचे प्रभु

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दिनः ॥७४॥ पाराशरपुराणे ॥ सर्वं त्यक्त्वा यथा ज्ञानी मामेकं लब्धवान् प्रिये ॥ सर्वं त्यक्त्वा तथा चाहं त्वामेकां लब्धवान् मुदा ॥७५॥ स्कान्दे ॥ मुक्तिहेतुपरिज्ञानं तत्प्रसादेन केवलम् ॥ नैव विष्ण्वादिदेवानां प्रसादेन न संशयः ॥७६॥ मल्हुहणस्तोत्रे ॥ वृत्तम् ॥ ब्रह्मेन्द्रविष्णुसुरदानवलोकपालैरन्यैश्च दिव्यमुनिभिः परिपूजितं त्वाम् ॥ दृष्ट्वा यदत्र पुनरिच्छति दैवमन्यत्संसारिणो नरकहेतुरयं विमोहः ॥७७॥ आदित्यपुराणे ॥ ब्रह्मदक्षसंवादे ॥ यस्य पादरजःस्पर्शाद्ब्रह्मत्वं प्राप्तवानहम् ॥ शार्ङ्गिणापि तथा मूर्ध्ना धार्यते कः शिवात्परः ॥७८॥ पाराशरपुराणे ॥ राजाधिराजः सर्वेषां त्र्यंबकस्त्रिपुरान्तकः ॥ तस्यैवानुचरास्सर्वे ब्रह्मविष्ण्वादयस्सुराः ॥७९॥ वेदा ऊचुः ॥ ब्रह्मविष्ण्वेंद्रचंद्राद्या यस्य देवस्य किंकराः ॥ यस्य प्रसादाज्जीवन्ति स देवः पार्वती-

---

आहेत. (७५) पाराशरपुराणांत म्हटलें आहे कीं, शिव म्हणतात--पार्वती, तूं माझी फार आवडती आहेस; जसा ज्ञानी मनुष्य इतर दुसरे तिसरे सर्व सोडून देऊन माझा एकाचाच आश्रय करून मला येऊन मिळतो, त्याप्रमाणें मी दुसरे सर्व व्यवसाय सोडून देऊन तुला एकटीलाच संतोषानें वश झालों आहे. (७६) स्कन्दपुराणांत म्हटलें आहे कीं, मोक्षप्राप्तीस मूळकारण असणारें ज्ञान फक्त एका श्रीशंकराच्याच कृपेनें होतें; श्रीविष्णु, ब्रह्मदेव, इंद्र वगैरे अनेक देव आहेत, त्यांच्या कोणाच्याही कृपेनें होत नाहीं; ह्यांत संशय नाहीं. (७७) मल्हुहणस्तोत्रांत म्हटलें आहे कीं, हे परमेश्वरा, श्रीशिवा, ब्रह्मदेव, श्रीविष्णु, देव, दानव, आठ दिक्पाल, आणखी दुसरे असेच महान् महान् मुनि ज्या तुझी नेहमीं पूजा करितात; त्या तुझें दर्शन घेतल्यावर देखील संसारीलोक पुनः दुसऱ्या देवांचें दर्शन घेण्याची इच्छा करितात. हें त्यांचें शुद्ध वेडेपण असून तें नरकाचें साधन आहे. (७८) आदित्यपुराणांत दक्षप्रजापतीचें आणि ब्रह्मदेवाचें बोलणें झाल्याचें वर्णन आहे, त्यांत ब्रह्मदेवानें दक्षास म्हटलें आहे कीं, दक्षा, ज्या शंकराच्या पायाच्या धूलीचा मला स्पर्श झाल्यामुळें मला ब्रह्मपद मिळालें, विष्णु देखील ज्या शिवाची आज्ञा शिरसामान्य करितो, त्या शिवापेक्षां दुसरा श्रेष्ठ देव कोण आहे? कोणी नाहीं. (७९) पाराशरपुराणांत म्हटलें आहे कीं, श्रीशंकर हे सर्व प्राणिमात्रांचे, व देवदैत्यांचे मुख्य परमेश्वर आहेत. त्यांस तीन नेत्र असून त्यांनीं त्रिपुरांचा नाश केला. ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगैरे सर्व देव त्या श्रीशंकराचेच दास ( भक्त ) आहेत. (८०) वेद म्हणतात--ज्या परमेश्वर श्रीशंकराचे ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र, चंद्र वगैरे सर्व मुख्य मुख्य देव दास आहेत, आणि ते सर्व ज्या श्रीशिवाच्याच कृपेनें उपजीवन पावतात ( जिवंत राहतात );

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पतिः ॥८०॥ कालिकाखण्डे ॥ ब्रह्मविष्णुसुरेशाद्याः पशवः परिकीर्तिताः ॥ तेषां पतित्वाद्भूतेशः शिवः पशुपतिः स्मृतः ॥८१॥ व्यास उवाच ॥ एतस्मात्कारणाद्वत्स नास्त्यन्योऽभ्यधिकः शिवात् ॥ सत्यं सत्यं पुनस्सत्यं न देवः शंकरात्परः ॥८२॥ ईश्वर उवाच ॥ ज्ञानं विरागतैश्वर्यं तपस्सत्यं क्षमाधृतिः ॥ स्रष्टृत्वमात्मसंबोधो ह्यधिष्ठातृत्वमेव च ॥ अव्ययानि दशैतानि नित्यं तिष्ठन्ति शंकरे ॥८३॥ कालिकाखण्डे ॥ उमाकांतस्य देवस्य गुणैर्युक्तस्य कोटिशः ॥ ममर्दचरणौ ब्रह्मा पाणी विष्णुः समाहितः ॥८४॥ छत्रं शम्भोर्दधारेन्द्रो वायुर्मार्गं व्यशोधयत् ॥ अन्याश्च देवतास्सर्वा जयशब्दं तथाब्रुवन् ॥८५॥ ब्रह्मविष्ण्वाद्यो देवा ये केचित्स्थाणुजंगमाः ॥ उमाधिपस्य ते सर्वे बालक्रीडनका इव ॥८६॥ आदित्यपुराणे ॥ ब्रह्मविष्ण्वाद्यो देवा मुनयो मनवस्तथा ॥ सर्वे क्रीडनकास्तस्य देवदेवस्य शूलिनः ॥८७॥ शिवधर्मे ॥

---

तो पार्वतीपति श्रीशिव हा सर्व प्राणिमात्रांचा देव आहे. (८१) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव, श्रीविष्णु, इंद्र वगैरे सर्व देवांस पशु असें ह्मटलें आहे; आणि त्या सर्वांचा श्रीशिव हा पति ( मुख्य ) असल्यामुळें, त्या भूतपति श्रीशिवाला पशुपति असें ह्मणतात. (८२) व्यास ह्मणतात--मुला, ह्या कारणामुळेंच त्या शंकरापेक्षां दुसरा कोणताही देव श्रेष्ठ नाहीं. मी खरोखर पुनः अगदीं खरें सांगतों कीं, शंकरापेक्षां दुसरा कोणताही श्रेष्ठ देव नाहीं. (८३) ईश्वर ह्मणतात— ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, तपश्चर्या, खरेपण, समाधान ( शांति ), धैर्य, सृष्टि उत्पन्न करणें, आत्मज्ञान, आणि आपण स्वतः सर्व वस्तूंत व्यापून राहणें, हे अक्षय ( कधींही नाश न पावणारे ) दहा गुण शंकराचे अंगीं नेहमीं राहतात. (८४) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे कीं, पार्वतीपति श्रीशंकराचे अंगीं कोट्यावधि चांगले चांगले गुण आहेत. त्या शंकराचे ब्रह्मदेव पाय रगडतो आणि श्रीविष्णु हा हात चेपतो. (८५) इंद्र त्या श्रीशंकरावर छत्र धरितो, वायु त्याचा रस्ता स्वच्छ करितो; आणि दुसरे सर्व देव त्या श्रीशंकराचा जयजयकार करितात. (८६) ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगैरे जे मुख्य मुख्य देव आहेत, व जे स्थावरजंगम प्राणी आहेत, ते सर्व पार्वतीपति श्रीशंकराला लहान मुलांचीं खेळणीं असल्यासारखे आहेत. (८७) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, परमेश्वर श्रीशंकर हा सर्व देवांचा मुख्य देव आहे, त्याचे हातांत शूल आहे, ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगैरे देव, मुनीश्वर आणि मनु हे सर्व त्या शंकराचीं खेळणीं आहेत. (८८) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं, ज्या परमेश्वर श्रीशंकरानें वेदांचा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वृत्तम् ॥ अस्वीकृतस्वीकृतवेदराशिः अस्त्रीकृतस्त्रीकृतचक्रपाणिः॥ अस्वीकृतस्वीकृतदुष्टशिष्टः पायात्स वो दैवतसार्वभौमः ॥८८॥ मही शतांगो मधुकैटभारिः शरस्सुराणां शिखरी शरासः ॥ पुरत्रयं यस्य बभूव लक्ष्यं नमोऽस्तु धानुष्कवराय तुभ्यम् ॥८९॥ कालिकाखण्डे व्यासाष्टके ॥ एकेन दग्धं त्रिपुरं शरेण कामो ललाटाग्निहुताशनेन ॥ भिन्नोऽन्धकः शूलवरेण येन कस्तेनसार्द्धं कुरुते विरोधम् ॥९०॥ जलौघकल्लोलतरंगतुंगगंगा धृता येन जटाग्रभागे ॥ पादांबुजांगुष्ठनिपीडनेन पपात लंकाधिपतिर्विसंज्ञः ॥९१॥ वासिष्ठरामायणे ॥ वृत्तम् ॥ कालान्तकं कामदमप्रमेयं कैवल्यनाथं करुणाकरं विभुम् ॥ कामांगनाशं कमठांगधारिणं नमामि गंगाधरमादिदेवम् ॥९२॥ ईश्वर उवाच ॥ अनेकमुण्डकोटिभिरियं माला शिरोगता ॥ ब्रह्मणो हि क-

---

समुदाय स्वतः मुखपाठ असतां त्रिपुरवधाच्या वेळीं त्यांस ( वेदांस ) रथाचे घोडे केले, श्रीविष्णूस आपली बायको व त्रिपुरवधाच्या वेळीं बाण केलें, जो दुष्टांचें पारिपत्य करून सज्जनांचें रक्षण करितो, तो सर्व देवांचा मुख्य देव श्रीशंकर माझें रक्षण करो. (८९) ज्या श्रीशंकरानें त्रिपुरवधाच्या वेळीं पृथ्वीचा रथ केला, श्रीविष्णूचा बाण केला, मेरुपर्वताचें धनुष्य केलें व त्रिपुरावर नेम धरिला त्या उत्तम तऱ्हेनें धनुर्विद्या जाणणाऱ्या श्रीशंकराला नमस्कार असो. (९०) कालिकाखण्डांतील व्यासाष्टकांत ह्मटलें आहे कीं, ज्या शंकरानें एका बाणानें तिपुरांचा नाश केला, मस्तकावरील तिसऱ्या नेत्रांतील अग्नीनें मदनास जाळून टाकिलें, आपल्या हातांतील उत्तम प्रकारच्या शूलानें अंधकासुराचे तुकडे तुकडे केले, त्या श्रीशंकराबरोबर विरोध कोण करील? (९१) जिच्या पाण्याच्या प्रवाहांत मोठमोठ्या लाटा उसळतात, अशी गंगानदी ज्या श्रीशंकरांनीं आपल्या जटांच्या एका पुढील टोंकावर धारण केली; आणि ज्यानें आपल्या पायाच्या आंगठ्यानें दावून त्या महापराक्रमी रावणास मूर्छित करून जमिनीवर पाडिलें; त्या शंकराची बरोबरी कोणाच्यानें करवेल? (९२) वासिष्ठरामायणांत ह्मटलें आहे कीं, ज्या शंकरानें यमास शिक्षा केली, जो श्रीशंकर आपल्या भक्तांची इच्छा परिपूर्ण करितो, ज्या परमेश्वर श्रीशंकराची बरोबरी करणारा दुसरा देव नाहीं, जो शंकर आपले भक्तांस मोक्षप्राप्ति करून देतो, जो शंकर मोठा दयाळू असून समर्थ आहे, ज्यानें मदनाचें अंग जाळून टाकिलें, ज्यानें कासवाचें शरीर धारण केलें आणि मस्तकावर गंगा धारण केली त्या मुख्य देवास (श्रीशंकरास ) नमस्कार करितों. (९३) परमेश्वर ह्मणतात— पाराशरा ( व्यासा ), मी आपल्या मस्तकावर हजारों मुंडकीं ओवलेली जी रुंडमाळ घातली आहे ती

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पालानिविनष्टस्य युगेयुगे ॥९३॥ या अमूरपरा माला श्रीवाहस्तकटिस्थिताः ॥ नारायणस्य तनवो विनष्टस्य युगे युगे ॥९४॥ वृत्तम् ॥ महानाटके ॥ कल्पान्ते शमितत्रिविक्रममहाकंकालबद्धस्फुरच्छेषशूतनृसिंहपाणिनखरप्रोतादिकोलामिषः ॥ विश्वैकार्णवताविशेषमुदितौ तौ मत्स्यकूर्मावुभौ कर्षन् धीवरतां गतः स्यतु सतां मोहं महाभैरवः॥९५॥ पाणौ ब्रह्मकपालमुज्वलतरं स्कंधे मुरारेर्वपुः सर्वांगेषु तुषारहारधवला देवास्थिवृन्दस्रजः ॥ बिभ्रद्बीजमिवप्रसाधन धिया भूयोऽपि संभूतये पायाद्वः प्रलयावसानसमये कापालिकः शंकरः ॥९६॥ पूष्णे पुंड्रेक्षुकाण्डान् मणिगणखचितं कंकणं हव्यवाहे वाचे मंदारमाला मुकुटमपि तदा ब्रह्मणः पंचवक्त्रे ॥ दत्वा तान् व्रीडयन्तः प्रमथपरिषदो

---

युगायुगांत जन्मास येऊन मरण पावलेल्या ब्रह्मदेवांच्या कपाळांची माळा आहे. (९४) आणखी दुसऱ्या ह्या ज्या माळा मी आपल्या गळ्यांत घातलेल्या आहेत, आणि हातांत व कमरेस बांधलेल्या आहेत, त्या युगायुगांत जन्मास येऊन मरण पावलेल्या श्रीविष्णूंच्या शरीरांच्या आहेत. (९५) महानाटकांत म्हटलें आहे कीं, प्रलयकालीं त्रिविक्रमाचा संहार करून त्याच्या पाठीच्या हाडांत महाशेषाला बांधून त्या शेषाला सूत्र केलें, व नृसिंहाला मारून त्याचीं नखें घेऊन त्या सूत्राला बांधिलीं, नंतर नखांला आदिवराहाला मारून त्याचें मांस आमिष करून चिकटविलें होतें, अशा तऱ्हेनें सर्व साम्रुग्री तयार करून जग सर्व बुडून जिकडे तिकडे जो समुद्र दिसत होता त्यांत जे दोन मत्स्य कूर्म फिरत होते त्यांना धरावयाकरितां कोळ्याचें रूप घेऊन जो महाभैरव फिरतो तो ईश्वर सज्जनांच्या मोहांचा नाश करो. (९६) शंकरांनीं कापालिक वेष घेतला त्यावेळीं त्यांच्या हातांत फारच सुशोभित असें ब्रह्मकपाल होतें, खांद्यावर श्रीविष्णूचें शरीर होतें आणि सर्वांगावर बर्फाच्या माळांसारख्या पांढऱ्या शुभ्र दिसणाऱ्या देवांच्या हाडांच्या माळा होत्या; पुनः प्रलयकाल संपून सृष्टि उत्पन्न करावयाच्या वेळीं सृष्टि उत्पन्न करण्याकरितां अलंकाराच्या बुद्धीनें बीजाप्रमाणें जो धारण करितो, तो कापालिक वेष घेणारा श्रीशंकर तुमचें रक्षण करो. (९७) शंकरांनीं आपले सभेंत सर्व देव जमवून त्यांतील मुख्य मुख्य देवांस बक्षिसें वाटलीं; तेव्हां सूर्यास गोडगोड उंसाचे तुकडे दिले, अग्नीला अनेक रत्नें जडलेलें कंकण दिलें, सरस्वतीला पारिजाताच्या फुलांची माळा दिली, आणि ब्रह्मदेवाच्या पांच मस्तकांवर पांच मुकुट घातले; त्यावेळीं त्या देवांस लाजविणाऱ्या शिवगणांस "असा असा कोणाचा अपमान करू नका" असें सांगत हास-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मंटपे चंद्रमौलेर्नंदीशो वारयन् सस्मितमधुरमुखः पातु पर्यस्तवेत्रः ॥९७॥ सुभाषिते ॥ हीनाश्रयो न कर्तव्यः कर्तव्यो महदाश्रयः ॥ नागोऽपृच्छच्छिवासक्तो नागारे कुशलं किल ॥९८॥ सूतसंहितायाम् ॥ शिवस्याज्ञाबलाद्विष्णुर्जायते म्रियतेऽपि च ॥ ब्रह्मा सर्वजगत्कर्ता विराट् सम्राट् स्वराडपि ॥९९॥ शिवरहस्ये ॥ दिव्यवर्षसहस्रान्ते जठरात्तस्य ब्रह्मणः ॥ अधोद्वाराद्विनिष्क्रान्तो भवाम्यहमधोक्षजः ॥१००॥ स्कान्दे ॥ भृगुरुवाच ॥ मत्स्यकच्छपरूपस्त्वं मांसासृक्पूयभुग्भव ॥ तथा सूकररूपेण जगद्विष्ठाक्षयं कुरु ॥१०१॥ नरसिंहादिभिर्दोषैः कुत्सितैस्तामसैस्तथा ॥ अनेकदुःखबहुलैर्युक्तो भव चिरं हरे ॥१०२॥ शिवधर्मशास्त्रे ॥ अहं कर्ता ह्यहं कर्ता मत्तो नान्यो जगत्प्रभुः ॥ एवमाह हरिं ब्रह्मा ब्रह्माणं च हरिस्तथा ॥१०३॥ ऋग्वेदे ॥ ज्योतिर्लिंगं स्वकीयकर्तारं परमेश्वरमविदित्वा अहं कर्ता ह्यहंकर्तेति वदतोर्ब्रह्म-

मुख करून व हातांत वेताची छडी घेऊन शंकराच्या सभामंडपांत नंदिकेश्वर फिरत होता; तो आमचें रक्षण करो. (९८) मनुष्यानें आश्रय करणें झालें तर मोठ्याचाच करावा, हलकटांचा करूं नये. शिवाचे अंगावर अलंकाराप्रमाणें असणारा साप शिवाचें त्यास पाठबळ असल्यामुळें गरुडास तूं खुशाल आहेसना ? असें बेलाशक विचारतो, गरुड आपणास मारून खाईल ही कल्पना देखील त्याचे मनांत येत नाहीं. (९९) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, श्रीशंकराच्या आज्ञेच्या सामर्थ्यानें श्रीविष्णु जन्मासही येतो आणि मरणही पावतो. तसाच ब्रह्मदेवही श्रीशंकराच्या आज्ञेप्रमाणें सर्व जगाची उत्पत्ति करितो, विराट्स्वरूप धारण करितो आणि सार्वभौम राजाप्रमाणें आपण राज्य करितो. (१००) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, देवांचीं हजार वर्षें लोटल्यावर त्या ब्रह्मदेवाच्या पोटांतून अधोद्वारानें मी बाहेर पडलों, ह्मणून मला अधोक्षज असें ह्मणतात; असें श्रीविष्णु म्हणतात. (१०१) स्कन्दपुराणांत भृगुऋषीनें श्रीविष्णूस शाप दिल्याचें वर्णन आहे, भृगु ह्मणाले-श्रीविष्णो तूं मत्स्य आणि कच्छ (कासव) हें रूप घेऊन मांस, रक्त, पू हे दुर्गंधियुक्त पदार्थ भक्षण कर; तसेंच वराहाचें रूप घेऊन जगांतील सर्व विष्ठा नाहींशी करून टाक. (१०२) त्यानंतर नरसिंह वगैरे अनेक प्रकारचीं निंदा करण्यास योग्य असणारीं रागीट आणि अनेक प्रकारचीं दुःखें असणारीं दुसरीं रूपें घे. (१०३) शिवधर्मशास्त्रांत ह्मटलें आहे कीं, मी कर्ता आहें, मी कर्ता आहें, माझ्याखेरीज ह्या जगाचा दुसरा परमेश्वर नाहीं असें ब्रह्मदेव श्रीविष्णूस ह्मणाला; आणि पुनः श्रीविष्णु ब्रह्मदेवास ह्मणाला. (१०४) ऋग्वेदांत ह्मटलें आहे कीं, तेजोमय लिंग हें त्या दोघांस उत्पन्न करणारें आहे; त्या परमेश्वरास न जाणतां मी कर्ता आहें, मी कर्ता आहें, असें ह्मणणाऱ्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विष्णोस्तदीयवचनदोषेण पक्षिमृगत्वं गताविति कर्मविपाकशास्त्रवचनात् " अत्युत्कटैः पुण्यपापैरिहैव फलमश्नुते " इत्यवलेपदोषवशादेव तावुभौ तदानीमेव कोलमरालरूपौ जाताविति न वदन्ति ॥१०४॥ स्कान्दे ॥ ईशानसंहितायाम् ॥ अगस्त्य उवाच ॥ मूलं लिंगस्य मूर्धानं चोभौ द्रष्टुं समिच्छया ॥ दिव्यवर्षसहस्रं तु लिंगस्योर्ध्वमधस्तथा ॥१०५॥ गत्वा गत्वा परिश्रान्तावशक्तौ द्रष्टुमीशितुः ॥ पुनर्वर्षसहस्रेण नालमाप्तुं सुरोत्तमौ ॥१०६॥ कालिकाखण्डे ॥ शुकवत्तव विश्वेश क्रीडार्थं केवलं वयम् ॥ तवोन्मेषनिमेषाभ्यामस्माकं प्रलयोदयौ ॥१०७॥ दुर्वासा उवाच ॥ संभवोऽशेषलोकस्य यस्योच्छ्वासेन जायते ॥ निःश्वासकाले विप्रेंद्र संहारश्चापि धूर्जटेः ॥१०८॥ शिवधर्मसंहितायामुपमन्युरुवाच ॥ वृत्तम् ॥ पशुपतिवचनाद्भवामि सद्यः क्रिमिरथवा तरुरप्यनेकशाखः ॥ अपशुपतिवरप्रसादजा मे त्रिभुवनराज्यवि-

---

त्या ब्रह्मदेव आणि विष्णु या दोघांपैकीं, आपआपल्या बोलण्याच्या पापानेंच एकजण पक्षी झाला व एकजण पशु झाला. कर्मविपाकशास्त्रांत देखील असेंच सांगितलें आहे कीं, अतिशय पुण्य झालें किंवा अतिशय पाप झालें तर त्याचें फळ मनुष्यास ह्या लोकींच भोगावें लागतें, म्हणूनच ह्या गर्वाच्या बोलण्यामुळें त्या दोघांपैकीं तेव्हांच ब्रह्मदेव हंस झाला आणि श्रीविष्णु वराह झाला; असें लोक म्हणत नाहींत कांय? (१०५) स्कन्दपुराणांत ईशानसंहितेंत अगस्त्यानें म्हटलें आहे कीं, त्या तेजोमय लिंगाचें मूळ आणि मस्तक पाहण्यासाठीं ते दोघे श्रीविष्णु आणि ब्रह्मदेव यांपैकीं एकजण वर आकाशांत उडाला, आणि एकजण खालीं पाताळांत शिरला; आणि दोघांनींही देवांचीं एक हजार वर्षेंपर्यंत लिंगाचें मूळ आणि मस्तक शोधण्याचा प्रयत्न केला. (१०६) ते फिरून फिरून अगदीं थकून गेले; तरी आणखी पुनः त्या दोघांनीं एक हजार वर्षें पर्यंत तसाच शोध केला. परंतु त्या दोघांस लिंगाचा अंत म्हणून लागला नाहीं. (१०७) कालिकाखण्डांत म्हटलें आहे कीं, हे विश्वेश्वरा, आम्ही फक्त राघूसारखीं तुझीं खेळण्याचीं पांखरें आहोंत. तूं आपल्या डोळ्याच्या पापण्या उघडल्या म्हणजे आम्ही जन्मास येतों; आणि तूं आपले डोळे झांकलेस म्हणजे आमचा नाश होतो. (१०८) दुर्वासा म्हणाला---हे ब्राह्मणश्रेष्ठा, त्या परमेश्वर श्रीशंकराच्या श्वासानें सर्व जगाची उत्पत्ति होते, आणि श्वास बाहेर सोडल्यावरोबर सर्व जगाचा संहार होतो, (१०९) शिवधर्मसंहितेंत उपमन्यूनें म्हटलें आहे कीं, श्रीशंकराच्या आज्ञेप्रमाणें मी तत्काळ किडा होईन अथवा अनेक फांद्या असणारें झाड होईन. पशुपतीचा ( श्रीशंकराचा ) प्रसाद नसतां मला त्रैलोक्याचें राज्यैश्वर्य जरी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भूतिरन्यनिष्ठा ॥१०९॥ अपि कीटः पतंगो वा भवेयं शंकराज्ञया ॥ न तु शक्र त्वया दत्तं त्रैलोक्यमपि कामये ॥११०॥ शृणु धर्मादयश्चैव अव्यक्तादिचतुष्टयम् ॥ ब्रह्मादिस्तंबपर्यन्तं जगद्वै निर्गुणस्य तु ॥१११॥ गुणाः शिवस्य दुर्बुद्धे पादमूले व्यवस्थिताः ॥ स एव निर्गुणः सर्वे सगुणाश्च सुरासुराः ॥११२॥ देही नो निष्कलश्शंभुः कथं हि गुणवान् भवेत् ॥ त्रैगुण्यविषया देवाः सर्वे दैत्याश्च दुर्मते ॥ निस्त्रैगुण्यो महादेवो ह्यादिमध्यान्तवर्जितः ॥११३॥ वृत्तम् ॥ एकं स्थूलं सूक्ष्ममेकं सुसूक्ष्मं भव्यं शान्तं रौद्रमेकं वपुर्यत् ॥ तस्माद्राजंस्त्वादृशैर्बुद्धिहीनैर्ज्ञेयं सौम्यं निर्गुणं नाल्पवीर्यैः ॥११४॥ स्कान्दे ॥ नंदीश्वर उवाच ॥ महदादिविशेषान्तविकल्पस्यापि सुव्रत ॥ विष्णोः पितामहस्यापि मुनीनां च महामुने ॥ इंद्रस्य चैव देवानां तस्माद्वै पुष्टिवर्धनः ॥११५॥ सूतसंहि-

---

मिळालें तरी तें माझ्या उपयोगी नाहीं. (११०) शंकर मला जर आज्ञा करील तर मी शंकराच्या आज्ञेप्रमाणें किडा होईन अथवा पक्षी होईन. इंद्रा, त्या शंकराच्या आज्ञेखेरीज तूं मला त्रैलोक्याचें राज्य दिलेंस तरी त्याची मला इच्छा नाहीं. (१११) ऐक. हे सर्व धर्मादिक, अव्यक्तादि चतुष्टय, आणि ब्रह्मदेवापासून तों तहत एखाद्या खांबापर्यंत सर्व जग निर्गुणापासून उत्पन्न झालेलें आहे. (११२) हे दुष्टस्वभावाचे प्राण्या, हे सर्व गुण शिवाच्या पायाचे जागीं राहतात. तो शिव स्वतः निर्गुण आहे, आणि हे सर्व देवदैत्य सगुण आहेत. (११३) हा श्रीशंकर देहधारी नाहीं, तो निर्गुण (निष्कल) आहे, तो गुणवान् (देहधारी) कसा होईल? सत्व, रज, तमोगुणात्मक हे सर्व देवदैत्य आहेत, हे दुष्टबुद्धे, हे प्राणिमात्र सगुण आहेत आणि तो महादेव त्रिगुणरहित आहे (त्याला सत्वगुण, रजोगुण आणि तमोगुण हे मुळींच नाहींत); त्या महादेवाला जन्म नाहीं, तारुण्य नाहीं, आणि म्हातारपणही नाहीं. (११४) तें परमेश्वराचें स्वरूप एका दृष्टीनें पाहतां मोठें आहे; आणि एका दृष्टीनें पाहतां फार लहान आहे; इतकेंच नव्हे तर फारच लहान आहे. तें परमेश्वराचें स्वरूप दिसण्यांत फार शानदार असून तें शांतही आहे, आणि फार रागीटही आहे. ह्यासाठीं राजा, तुझ्यासारख्या बुद्धिहीन आणि अल्पसामर्थ्यवान् अशा लोकांस तें परमेश्वराचें सौम्य आणि निर्गुणस्वरूप मुळींच समजणार नाहीं. (११५) स्कंदपुराणांत म्हटलें आहे कीं, नंदीश्वर म्हणाला, हे बुद्धिमान् मुनीश्वरा, महत्तत्वापासून विशेषतत्वापर्यंत जितके कांहीं विकल्प आहेत त्या विकल्पांस, विष्णूस, ब्रह्मदेवास आणि मुनीश्वरांस, इंद्रास आणि इतर तेहतीस कोटि देवांस तो शंकरच सामर्थ्य देतो. (११६) सूतसंहितेंत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तायाम् ॥ ब्रह्मणश्च तथा विष्णोर्देशस्य मशकस्य च ॥ प्रवृत्तेश्च निवृत्तेश्च हेतुरिच्छा पिनाकिनः ॥११६॥ ब्रह्मणस्तम्भभावो वा स्तंभस्य ब्रह्मभावता ॥ स्वेच्छया विदधानस्य नातिभारः पिनाकिनः ॥११७॥ आदित्यपुराणे ॥ असंख्याता नसंक्षेपाः प्रधानाच्चान्वधिष्ठिताः ॥ असंख्याताश्च कालाश्च ह्यसंख्यताः पितामहाः ॥ असंख्याता हि हरयो नित्यएको महेश्वरः ॥११८॥ स्कान्दे ॥ कालिकाखण्डे ॥ विष्णुरुवाच ॥ अवलेपेन दुर्बुद्धे त्वया दुर्भाषितं महत् ॥ ममापि नाथमाक्षिप्य शिवं मां यत्प्रशंससि ॥११९॥ अत्र मे वचनं व्यास शृणु मूढ यथार्थवत्॥ यच्छ्रुत्वा सर्वभूतानां शिव एव भवेन्मतिः ॥१२०॥ कर्ताहं सर्वजगतां मम कर्ता महेश्वरः ॥ तस्य देवाधिदेवस्य कर्ता कोऽपि न विद्यते ॥१२१॥ यज्ञकर्ता च देवेंद्रो वेदकर्ता च वाक्पतिः ॥ अहमेव जगत्कर्ता ममकर्ता महेश्वरः ॥१२२॥ तस्य देवाधिदेवस्य कर्ता कोऽपि न विद्यते॥

---

ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेवाची श्रीविष्णूची आणि फार काय एखाद्या लहानसहान गांधीलमाशीची देखील उत्पत्ति होणें, आणि त्यांचा संहार होणें, ह्या गोष्टी सर्व शंकराच्या इच्छेनेंच घडतात. शंकराच्या इच्छेखेरीज कांहींएक होत नाहीं. (११७) ब्रह्मदेवाला खांब करणें, आणि खांबाला ब्रह्मदेव करणें, ह्या गोष्टी अगदीं शंकराच्या मर्जीवर अवलंबून आहेत. असें करण्यामध्यें त्या शंकराला फारसे प्रयास आहेत असें मुळींच नाहीं. (११८) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, प्रधानपुरुषाच्या अनुरोधानें वागणारे मुख्यमुख्य पुरुष अनेक होऊन गेले. त्यांची गणती देखील नाहीं. काळ अनेक झाले, ब्रह्मदेव अनेक झाले, फार काय, परंतु श्रीविष्णु देखील आजपर्यंत अनेक होऊन गेले. नित्य असा कायतो एक महेश्वर (श्रीशिव) मात्र आहे. (११९) स्कन्दपुराणांत कालिकाखण्डांत व्यासास उद्देशून श्रीविष्णूंनीं ह्मटलें आहे कीं, हे दुष्टबुद्धे व्यासा, श्रीशंकर हा माझा देखील ईश्वर आहे. त्याचा तिरस्कार करून गर्वानें फुगून जाऊन तूं माझी प्रशंसा करितोस; हें फार वाईट करतोस. तुझें बोलणें चांगलें नव्हे. (१२०) व्यासा, तूं अगदीं मूर्ख आहेस, शिव थोर आहे किंवा मी थोर आहें, ह्याविषयीं खरी स्थिति काय आहे ती मी तुला सांगतों, ऐक. ती ऐकिली ह्मणजे सर्व प्राणिमात्रांची शिवावरच भक्ति जडेल. (१२१) मी सर्व जगाचा कर्ता आहें, तरी माझा कर्ता परमेश्वर श्रीशंकर आहे, तो सर्व देवांचा मुख्य देव आहे. त्याचा कर्ता कोणी नाहीं. (१२२) इंद्र हा यज्ञांचा कर्ता आहे; बृहस्पति हा वेदांचा कर्ता आहे, सर्व त्रैलोक्याचा कर्ता मी (श्रीविष्णु) असून माझा कर्ता परमेश्वर श्रीशंकर आहे. (१२३) त्या देवाधिदेव श्रीशंकराचा कर्ता कोणीच नाहीं; सर्व देव-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

देवतानामहं देवो देवोऽस्माकं महेश्वरः ॥१२३॥ शिवस्य पूज्यते लिंगं सर्वैर्देवासुरैर्नरैः ॥ शिवेन पूजितः को वा वदन्तु प्रतिवादिनः ॥१२४॥ स्वनाम्ना ब्रह्मणा लिंगं मया कृष्णेश्वरं मुने ॥ सर्वापेक्षितसिद्ध्यर्थं वाराणस्यां प्रतिष्ठितम् ॥१२५॥ विंबागमे ॥ द्वारावत्यां च कूर्मेशं लंकायां मच्छकेश्वरम् ॥ वाराहेशं वृद्धगिरौ काश्यां वौद्धेश्वरं तथा ॥१२६॥ तीर्थे कापिलसंज्ञेऽस्मिन् परशुरामेश्वरं तथा ॥ महाक्षेत्रेऽपि वामेशं वामनेन प्रतिष्ठितम् ॥१२७॥ कृष्णेश्वरं हिमगिरौ रामेशं सेतुबन्धने ॥ अहोबले नृसिंहेशं प्रतिष्ठाप्य हरिः स्वयम् ॥ पूजयामास सद्भक्त्या ह्यवतारनिवृत्तये ॥१२८॥ लैंग्ये ॥ पद्मपुष्पैः सहस्रैश्च पादावभ्यर्च्य भक्तितः ॥ पुरतः परमेशस्य स्तुतवान् मधुसूदनः ॥१२९॥ आदित्यपुराणे॥ एवं नाम्नां सहस्रेण तुष्टाव गिरिजापतिम् ॥ संपूज्य परया भक्त्या

---

तांचा मी कर्ता आहें, आणि माझा कर्ता महेश्वर आहे. (१२४) सर्व देव, दैत्य, आणि मनुष्य, हे शिवाच्या लिंगाची पूजा करितात. शिवानें कोणत्या देवाची पूजा केली हे माझ्याशीं विरुद्ध असणारे कोणतेही लोक सांगोत; शिवानें कोणाचीच पूजा केली नाहीं. कां तर त्यानें पूजा करावी असा त्याचेपेक्षां श्रेष्ठ देव दुसरा नाहींच. तोच सर्व देवांचा देव आहे. (१२५) मुनीश्वरा, व्यासा, वाराणशीक्षेत्रांत ब्रह्मदेवानें स्वतः आपल्या नांवानें ब्रह्मेश्वर नांवाचें लिंग स्थापन केलें. माझ्या मनांतील सर्व कामना पुरविणारें कृष्णेश्वर नांवाचें लिंग मीं स्वतः स्थापन केलें. (१२६) विंबागमांत ह्मटलें आहे कीं, द्वारकेंत कूर्मेश्वर नांवाचें लिंग आहे, लंकेंत मच्छकेश्वर नांवाचें लिंग आहे, वृद्धपर्वतावर वाराहेश्वर नांवाचें लिंग आहे, तसेंच काशीमध्यें वौद्धेश्वर नांवाचें लिंग आहे. (१२७) कपिल नांवाच्या ह्या तीर्थांत परशुरामेश्वर नांवाचें तीर्थ आहे. महाक्षेत्रांत देखील वामेश नांवाचें लिंग वामनानें स्थापन केलें आहे. (१२८) हिमालयपर्वतावर कृष्णेश्वर नांवाचें लिंग आहे, सेतुबंधाचे ठिकाणीं रामेश्वर नांवाचें लिंग आहे. अहोबलावर नृसिंहेश्वर नांवाचें शिवलिंग आहे. ह्या सर्व लिंगांची विष्णूनें स्वतः प्रतिष्ठा केली असून, आतां आपणास पुनः अवतार घ्यावा लागूं नये ह्मणून तो भक्तिपूर्वक शिवलिंगाची पूजा करीत असतो. (१२९) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, श्रीकृष्णानें परमेश्वर श्रीशंकराच्या पायांवर भक्तिभावानें हजारों कमळें व फुलें वाहून श्रीशंकराची स्तुति केली. (१३०) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, ह्याप्रमाणें शिवाचीं हजार नांवें घेऊन कृष्णानें शिवास संतुष्ट केलें,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पुण्डरीकेण च क्रमात् ॥१३०॥ लैंग्ये ॥ विष्णुरुवाच ॥ महादेवाय देवानामीश्वराय नमो नमः ॥१३१॥ गंगाधरलीलायाम् ॥ महादेवो महाभीमो महाभैरवविग्रहः ॥ महाशक्तिर्महादीप्तिर्महाकीर्तिर्महामतिः ॥ महाग्रासो महाभासो महोल्लासो महारवः ॥१३२॥ मुकुटागमे ॥ उग्रोऽसि त्वं महादेव भीमेशानस्त्वमुच्यसे ॥ विश्वतश्चक्षुरित्यादि वेदैस्त्वं पठ्यसे विभो ॥१३३॥ आदित्यपुराणे ॥ जिज्ञासार्थं हरेर्भक्तिं कमलेषु शिवः स्वयम् ॥ तत्रैकं गोपयामास कमलं मुनिपुंगवाः ॥१३४॥ लैंग्ये॥ एकं न्यूनं सहस्राणां पुष्कराणां तु पुष्करम् ॥ नारायणः स्वकं नेत्रमेकमुध्दृत्य वै ततः ॥१३५॥ आदित्यपुराणे ॥ हृते पुष्पे तथा विष्णुश्चिन्तयन् किमिदंत्विति॥ज्ञात्वात्मनेत्रमुध्दृत्य पूजयामास शंकरम्॥१३६॥लैंग्ये॥ तदाप्रभृति तं प्राहुः पद्माक्षमिति सुव्रताः॥दत्तवान्नयनं चक्रं विष्णवे

---

व भक्तिभावानें हजार कमलें वाहून त्यानें शिवाची पूजा केली. (१३१) लिंगपुराणांत झटलें आहे कीं, विष्णु झणाला, महादेवा, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो. (१३२) गंगाधरलीलेंत झटलें आहे कीं, महादेवाला महादेव, महाभीम, महाभैरवविग्रह (प्रळयकाळाच्या वेळीं महाभैरवाचें स्वरूप घेणारा), महाशक्ति, महादीप्ति, महाकीर्ति, महामति, महाग्रास, महाभास, महोल्लास आणि महारव अशीं अनेक नांवें आहेत. (१३३) मुकुटागमांत झटलें आहे कीं, हे महादेवा तूं उग्र आहेस, तुला भीम, ईशान असेंही म्हणतात. हे परमेश्वरा, तूं विश्वतश्चक्षु (सर्व कांहीं पहाणारा) आहेस; असें वेदांनीं तुला झटलें आहे. (१३४) आदित्यपुराणांत झटलें आहे कीं, विष्णूची भक्ति कशी काय आहे ती पाहण्याकरितां हे मुनीश्वरहो, त्या विष्णूनें पूजेकरितां आणलेल्या हजार कमलांपैकीं एक कमल शिवांनीं स्वतः नाहींसें केलें. (१३५) लिंगपुराणांत झटलें आहे कीं, विष्णूनें पाहिलें तों आपण शिवपूजेकरितां एक हजार कमळें आणलीं असतां येथें पाहावें तों एक कमीच आहे; मग तत्काळ त्यानें आपला एक डोळा काढून त्या कमी पडलेल्या कमळाकरितां कमळ झणून वाहिला. (१३६) आदित्यपुराणांत झटलें आहे कीं, पुनः शंकराचे पूजेकरितां श्रीविष्णूंनीं हजार कमळें आणलीं; त्यांत देखील एक कमळाचें फूल कमी आहे असें पाहतांच, व असें होण्याचें कारण काय आहे तें समजतांच, श्रीविष्णूंनीं आपला एक डोळा उपटून काढून तो शिवास कमळाप्रमाणें वाहिला. (१३७) लिंगपुराणांत झटलें आहे कीं, हे सदाचारी मुनीश्वरहो, तेव्हांपासून त्या श्रीविष्णूला पद्माक्ष असें नांव पडलें. (लोक त्यास पद्माक्ष असें झणूं लागले). श्रीशिवांनीं त्या विष्णूचा तो डोळा पूर्ववत् केला आणि त्यावर प्रसन्न होऊन

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नीललोहितः ॥१३७॥ तात्पर्यसंग्रहे ॥ वृत्तम् ॥ त्वं ब्राह्मणस्त्वदुपधावनमेव कार्यं तद्ब्राह्मणैस्त्वदितरे न भवन्त्युपास्याः ॥ अब्राह्मणानवरवर्णनिषेवणेन संभावयामि यदि नः प्रपदं प्रमाणम् ॥१३८॥ पितामहस्तु वैश्यः स्यात्क्षत्रियः परमो हरिः ॥ ब्राह्मणो भगवान्रुद्रस्सर्वेषामुत्तमोत्तमः ॥१३९॥ विष्णुरुवाच ॥ तस्मात्तं शरणं याहि जीवितं मे यदिच्छसि ॥ इत्युक्त्वान्तर्दधे विष्णुर्व्यासोऽपि भयविह्वलः ॥१४०॥ जगाम शरणं देवं सर्वभावेन शंकरम् ॥ संत्यज्य तृणवद्देवान् ब्रह्मविष्ण्वादिकांस्तथा ॥१४१॥ व्यास उवाच ॥ वृत्तम् ॥ ब्रह्मात्र लिंगे हरिरत्र जातः सुरासुराश्चेदमिहार्चयन्ति ॥ तथापि मूढा न विचारयंति को वाधिकोऽप्यस्ति समो हरस्य ॥१४२॥ स्कान्दे ॥ उत्पत्तिस्थितिसं-

---

त्यास सुदर्शनचक्र दिलें. (१३८) तात्पर्यसंग्रहांत म्हटलें आहे कीं, परमेश्वरा, श्रीशिवा तूं ब्राह्मण आहेस, तुझेंच आराधन केलें पाहिजे. ब्राह्मणांनीं शिवाखेरीज (तुजखेरीज) दुसऱ्या कोणाचेंही आराधन करूं नये. कां तर, श्रेष्ठवंशांत जन्मलेल्या ब्राह्मणानें ब्राह्मण नसणाऱ्या कोणत्याही देवाचें आराधन करूं नये. व अब्राह्मण अशा देवांचें आराधन कोण करतील त्यांना अब्राह्मणाप्रमाणें समजतों, याविषयीं प्रपदमंत्रच प्रमाण आहे. सारांश, परमेश्वर आम्हांस आराधन करण्यास तूं एकच योग्य दिसतोस, ह्या गोष्टीस तुझें चरणकमलच साक्ष आहेत. (१३९) ब्रह्मदेव हा वैश्य आहे, तो श्रेष्ठ श्रीकृष्ण क्षत्रिय आहे, आणि हा परमेश्वर भगवान् श्रीशिव ब्राह्मण आहे, हा सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे. (१४०) विष्णु म्हणाला— ह्यासाठीं हे वेदव्यासा, मी जिवंत रहावें असें जर तुला वाटत असेल तर त्या शंकरास शरण जा. इतकें सांगून श्रीविष्णु तत्काळ गुप्त झाले; आणि विष्णूचें तें बोलणें ऐकून, व्यासही अगदीं घाबरून गेले. (१४१) आणि श्रीविष्णूच्या सांगण्याप्रमाणें मनोभावानें ते देवाधिदेव श्रीशंकरास शरण गेले. आणि त्यांनीं ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगैरे देवांस कसपटासारखे मानिलें. शंकर मात्र सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहेत, अशी त्यांची खात्री झाली. (१४२) व्यास म्हणाले, सर्व देवहो, आणि सर्व मुनीश्वरहो, मी तुम्हांस सांगतों तें ऐका. ह्या शिवाच्या लिंगापासूनच ब्रह्मदेव उत्पन्न झाला, आणि विष्णु देखील ह्या लिंगापासूनच उत्पन्न झाला. सर्व देव आणि दैत्य तरी ह्या लिंगाचीच पूजा करितात; तरी पण मूर्ख लोक ह्या गोष्टीचा विचार करीत नाहींत. ह्या महादेवाची बरोबरी करील असा दुसरा देव कोणता आहे? सांगा बरें ! (१४३) स्कन्दपुराणांत म्हटलें आहे कीं, शिव म्हणाले, मी सृष्टि उत्पन्न करितों, मी जगाचें रक्षण करितों

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

हारकारकोऽहं हरीश्वरः ॥ मोक्षदस्सर्वजन्तूनां सर्वेशः सर्वशक्तिमान् ॥१४३॥ यज्ञवैभवखण्डे ॥ स्कान्दे ॥ आदाने च तथा दाने न स्वतंत्रो महा हरिः ॥ तथैवाहं सुरश्रेष्ठाः सत्यमेव मयोदितम् ॥१४४॥ विष्णुना च परेणापि महादेवं घृणानिधिम् ॥ विना जन्तून्समुद्धर्तुं शक्यते न हि सत्तमाः ॥१४५॥ ईश्वर उवाच ॥ तस्मात्त्वं शरणं गच्छ यदीच्छसि परं पदम् ॥ नान्ये मुक्तिप्रदा देवाः कल्पकोटिशतैरपि ॥१४६॥ फलं येऽन्ये प्रयच्छन्ति भक्तानां त्रिदशाः क्वचित् ॥ तेऽप्याराध्य महादेवं तृणबिंदोऽन्यथा न हि ॥१४७॥ ईश्वर उवाच ॥ योऽपि त्वया सदा विष्णुः स्तूयते नियतात्मना ॥ पश्यासौ सर्वकार्याणि त्यक्त्वा मामेव सेवते ॥१४८॥ शिवसंकल्पोपनिषदि ॥योऽसौ सर्वेषु वेदेषु पठ्यते ह्यज ईश्वरः ॥ अकायो निर्मलो ह्यात्मा तन्मे मनः शिव-

---

आणि जगाचा संहार देखील मीच करितों; मी विष्णूपेक्षां देखील श्रेष्ठ आहें. मी सर्व प्राणिमात्रांस मोक्षप्राप्ति करून देतों. मी सर्व प्राणिमात्रांचा ईश्वर आहें, आणि सर्व प्राणिमात्रांपेक्षां जास्त सामर्थ्यवान् आहें. (१४४) यज्ञवैभवखण्डांत स्कन्दपुराणांत ब्रह्मदेवानें ह्मटलें आहे कीं, एखाद्यापासून अमुक एक घेण्याला किंवा त्याला अमुक एक वस्तु बाक्षिस देण्याला श्रीविष्णूला स्वतंत्रता ( मुखत्यारी ) नाहीं. माझीही तीच स्थिति आहे, देवहो, मी तुह्मांस सांगितलेली ही गोष्ट अगदीं खरी आहे. ह्यांत काडीमात्र खोटें नाहीं. (१४५) हे सज्जनहो, विष्णु असो किंवा दुसरा कोणताही देव असो, एका दयाळू श्रीशंकरावांचून प्राणिमात्रांचा उद्धार करण्याला कोणी समर्थ नाहीं. (१४६) ईश्वर ह्मणाले, ह्यासाठीं तुला जर उत्तम पद ( मोक्ष ) आपणास मिळावें असें वाटत असेल, तर त्या श्रीशंकराला शरण जा. दुसरे आणखी कोट्यावधि देव आहेत; परंतु मोक्ष प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य फक्त एका श्रीशंकरालाच आहे; इतर देवास नाहीं. (१४७) इतर देवांची आराधना केली तर ते आपल्या भक्तांस इच्छिलेलें फळ देतात, ही गोष्ट खरी आहे; परंतु ते देखील श्रीशिवाची आराधना करून त्यास प्रसन्न करून घेऊन त्याकडून आपल्या भक्तांची इच्छा पुरवितात. हे तृणबिंदो, ह्यांत कांहीं खोटें नाहीं. (१४८) ईश्वर ह्मणाले, वेदव्यासा, तूं एकाग्रनिष्ठेनें ज्या श्रीविष्णूची आराधना करितोस, तो विष्णु देखील आपले दुसरे सर्व व्यवसाय सोडून माझेंच आराधन करितो; हें तूं प्रत्यक्ष पहा. (१४९) शिवसंकल्पोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, सर्व वेदांत ज्या ह्या परमेश्वराला "अज" असें ह्मटलें आहे, ज्याला शरीर नाहीं, जो अतिशय निर्मळ आहे, ज्याला

CC-0 Sangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

संकल्पमस्तु ॥१४९॥ सूतगीतायाम् ॥ देवास्सर्वे मुनिश्रेष्ठाः शिवस्यामिततेजसः ॥ अंबिकायाः पतेश्शंभोः प्रत्यक्षं करविल्ववत् ॥१५०॥ ईश्वर उवाच ॥ अव्यक्तान्मम लिंगात्तु ब्रह्मविष्णुपुरस्सरम् ॥ चराचरमिदं सर्वं जगज्जातं न संशयः ॥१५१॥ यजुर्वेदे ॥ सोमः पवते जनिता मतीनां जनिता दिवो जनिता पृथिव्याः जनिता अग्नेर्जनिता सूर्यस्य जनिता इंद्रस्य जनिताथ विष्णोः ॥१५२॥ आदित्यपुराणे ॥ उमया सहितो देवः सोम इत्युच्यते बुधैः ॥ स एव कारणं नान्यो विष्णोरपि च वै श्रुतिः ॥१५३॥ कालिकाखण्डे ॥ द्यावापृथिव्योरिंद्राग्न्योर्वियतस्तु यमस्य च ॥ वरुणस्य शशांकस्य जनिता परमेश्वरः ॥१५४॥ वेदमाता च गायत्री मंत्रमाता षडक्षरी ॥ सर्वदेवपिता शंभुर्भर्गो देवस्य धीमहि ॥१५५॥ स्कान्दे ॥ पिता यस्सर्वलोकानां विधेर्विष्णोश्च यः

---

आत्मा असें ह्मणतात, त्या श्रीशिवामध्यें माझें मन तल्लीन होऊन जावो. (१५०) सूतगीतेंत ह्मटलें आहे कीं, हे मुनीश्वरहो, शिवाचें सामर्थ्य अलौकिक आहे. हे इतर सर्व देव त्या पार्वतीपति शंकरानें प्रत्यक्ष हातांत घेतलेल्या बेलफळासारखे आहेत. (१५१) ईश्वर ह्मणतात, माझें लिंग अव्यक्त (कोणास न दिसणारें) आहे. माझ्या ह्या लिंगाचा अंत कोणासच लागत नाहीं. ह्या माझ्या लिंगापासून ब्रह्मदेव, श्रीविष्णु, वगैरे मुख्य मुख्य देव उत्पन्न झाले. हें सर्व स्थावरजंगम विश्व देखील लिंगापासूनच उत्पन्न झालें. ह्यांत कांहीं संशय नाहीं. (१५२) यजुर्वेदांत ह्मटलें आहे कीं, पार्वतीपति श्रीशंकर हा विजयी असो; (तो आह्मांस पवित्र करो); त्याचेपासून बुद्धि उत्पन्न झाल्या, आकाश उत्पन्न झालें, पृथ्वी उत्पन्न झाली, अग्नि उत्पन्न झाला, सूर्य उत्पन्न झाला, इंद्र उत्पन्न झाला, फार काय, परंतु श्रीविष्णु देखील शिवापासूनच उत्पन्न झाला, सर्वांचा उत्पन्नकर्ता श्रीशिव आहे. (१५३) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, उमा ह्मणजे पार्वती, तीसह असणारा ह्मणून शंकरास सोम असें नांव विद्वान् लोकांनीं दिलेलें आहे. त्या श्रीविष्णूचा देखील उत्पन्नकर्ता श्रीशिवच आहे, दुसरा कोणी नाहीं; असें वेद सांगतो. (१५४) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे कीं, स्वर्गाचा, पृथ्वीचा, इंद्राचा, अग्नीचा, आकाशाचा, यमाचा, वरुणाचा, आणि चंद्राचा उत्पन्नकर्ता परमेश्वर श्रीशंकरच आहे. (१५५) गायत्रीमंत्र हा सर्व देवांची माता आहे. त्या मंत्राची षडक्षरीमंत्र ही माता आहे. सर्व देवांचा श्रीशंकर हा पिता आहे. तो सूर्यासारखा तेजस्वी आहे. त्या देवाचें मी आराधन करितों. (१५६) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं जो श्रीशंकर सर्व जगाचा पिता

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पिता ॥ स शिवस्सर्वलोकानां कृपां चक्रे तयोरपि ॥१५६॥ मार्कण्डेयपुराणे ॥ वामदक्षिणपार्श्वे तु संजातौ हि विवादिनौ ॥ यस्य देवस्य तं वंदे सर्वकारणकारणम् ॥१५७॥ ब्रह्मोवाच ॥ वृत्तम् ॥ मायाबलेनैव हरिं शिवेन समानमाहुः पुरुषाधमाश्च ॥ मोहेन केचिन्मम साम्यमाहुर्माया तु शैवी खलु दुस्तरेयम् ॥१५८॥ ग्रन्थान्तरे॥ तन्मायाप्रहृतः प्राज्ञो न जाने त्वां महेश्वर॥ मम कर्ता त्वमेवेश कर्ता विष्णुस्त्वमेव च ॥१५९॥ वृत्तम् ॥ खद्योतो यदि चण्डभानुसदृशस्तुल्यो हरिश्शंभुना किं काष्ठं हरिचंदनेन सदृशं तुल्योऽहमीशेन च ॥ अज्ञानं यदि वेदनेन सदृशं देवैश्च तुल्या जनाः किं वक्ष्ये सुरपुंगवा हि मनसो मोहस्य दुश्चेष्टितम् ॥१६०॥ आदित्यपुराणे ॥ स एवैको न चानेको न द्विरूपः कदा च

---

आहे, जो ब्रह्मदेवाचा आणि श्रीविष्णूचा पिता आहे, तो श्रीशंकर सर्व लोकांवर कृपा करो; तशीच त्या दोघांवरही कृपा करो. (१५७) मार्कण्डेयपुराणांत ह्मटलें आहे कीं, मी सर्वांपेक्षां श्रेष्ठ, मी सर्वांपेक्षां श्रेष्ठ, असा एकमेकांत परस्पर कलह करणारे ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु ज्या श्रीशंकराच्या अनुक्रमानें उजव्या आणि डाव्या अंगापासून जन्मले; तो देव सर्व कारणांचा कारण आहे. त्या शिवाला मी नमस्कार करितों. (१५८) ब्रह्मदेव ह्मणाला, कितीएक क्षुद्रबुद्धीचे अज्ञान लोक त्या शिवमायेमुळें; वेडावून गेले असल्यानें शिवाची आणि विष्णूची बरोबरी करितात; कितीएक अज्ञानपणानें माझी ( ब्रह्मदेवाची ) आणि शिवाची बरोबरी करितात; शिवाची योग्यता काय आणि विष्णूची योग्यता काय हें त्यांस समजत नाहीं; कां तर शिवमाया ही फार गहन आहे, तिचें यथार्थ ज्ञान कोणासच होत नाहीं. (१५९) इतर ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, हे शंकरा तुझ्या मायेनें मला अगदीं भांबावून सोडिलें आहे, त्यामुळें मी अगदीं वेडा झालों आहें. हे महेश्वरा, त्यामुळें मी तुला यथार्थ रीतीनें जाणूं शकत नाहीं. हे परमेश्वरा, तूं माझा उत्पन्नकर्ता आहेस, आणि विष्णूही पण तूंच आहेस. (१६०) काजवा जर सूर्याची बरोबरी करूं शकेल, तर विष्णु श्रीशंकराची बरोबरी करील. इतर झाडांचीं लांकडें जर सुगंधाचे कामांत चंदनाच्या झाडाची बरोबरी करूं शकतील, तर माझ्यानें ( ब्रह्मदेवाच्यानें ) श्रीशंकराची बरोबरी करवेल. अज्ञानपणा जर शहाणपणाची बरोबरी करील तर देवांची बरोबरी मनुष्यें करूं शकतील. हे देवश्रेष्ठहो, ह्या मनाचें आणि अज्ञानाचें दुर्वर्तन तुह्मांस काय काय ह्मणून सांगूं? (१६१) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, श्रीशंकर हा एकच आहे. तो अनेक नाहीं, किंवा त्याचीं दोन रूपेंही कधीं होत नाहींत. त्या श्रीशंक-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नः॥ न तस्मादधिकः कश्चिन्नाणीयानपि कश्चन ॥१६१॥ वेदा ऊचुः ॥ न यथा कूर्मरोमाणि शृंगं न नरमस्तके ॥ न यथास्ति वियत्पुष्पं न तथास्ति हरात्परः ॥१६२॥ विश्वतश्चक्षुरीशोऽयं त्रिशूली विश्वतोमुखः ॥ जनकः सर्वभूतानामेक एव महेश्वरः ॥१६३॥ न जानन्ति परं भावं यस्य ब्रह्मादयः सुराः ॥ अद्यापि न वयं विद्मस्सदेवस्त्रिपुरांतकः ॥१६४॥ स्कन्दपुराणे ॥ सूतसंहितायाम् ॥ यज्ञवैभवखण्डे ॥ देवदेवस्य रुद्रस्य स्वरूपं तस्य वैभवम् ॥ को वा जानाति नास्त्येव स्वयं जानाति वा नवा ॥१६५॥ नास्त्येवातो महेशानात्कश्चित्तुल्योऽधिकोऽपि वा ॥ कोटिकोट्यायुषा कोटिकोटिजिव्हेन सर्वदा ॥१६६॥ महिम्ने ॥ वृत्तम् ॥ असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिन्धुपात्रे सुरतरुवरशाखालेखनी पत्रमुर्वी॥ लिखति यदि गृहीत्वा शारदा सार्वकालं तदपि तव गुणानामीश

---

रापेक्षां जास्त कोणी नाहीं, आणि कमीही कोणी नाहीं. (१६२) वेद ह्मणाले, कासवाचे अंगावर जसे केश नाहींत, मनुष्याच्या डोक्यावर जसें शिंग नाहीं, आणि आकाशाला जसें फूल नाहीं, तसाच महादेवापेक्षां श्रेष्ठ देव दुसरा नाहीं. (१६३) ह्या परमेश्वर श्रीशंकराला चोहोंकडे डोळे आहेत, ह्याच्या हातांत त्रिशूल आहे, ह्याला चोहोंकडे तोंडें आहेत, तो सर्व प्राणिमात्रांचा पिता आहे, आणि जगामध्यें त्याला एकालाच महेश्वर असें नांव आहे. (१६४) ज्याचा यथार्थ अभिप्राय आह्मां ब्रह्मादिक देवांस देखील अद्याप समजत नाहीं, तोच हा त्रिपुरांचा नाश करणारा श्रीशंकर आहे. (१६५) स्कन्दपुराणांत सूतसंहितेंत यज्ञवैभवखण्डांत ह्मटलें आहे कीं, श्रीशंकर हा सर्व देवांचा मुख्य देव आहे, त्याचें स्वरूप आणि ऐश्वर्य कोणास समजणार ? त्याचें स्वरूप आणि ऐश्वर्य जाणणारा कोणी नाहींच. त्याचा तो स्वतः जाणत असेल तर मात्र जाणत असेल. (१६६) ह्यासाठीं ह्या शंकराची बरोबरी करील असा देव किंवा ह्या शंकरापेक्षां श्रेष्ठ असा देव ह्या जगांत मुळीं नाहींच. एखाद्याला हजारों कोटि वर्षे आयुष्य असेल, व हजारों कोटि त्यास जिव्हा असतील, आणि तो अक्षय शिवाच्या गुणांची गणती करण्याचा प्रयत्न करील; तरी त्याच्याकडून देखील शिवगुणांची गणना होणें शक्य नाहीं. (१६७) ह्याच अर्थाचें महिम्नस्तोत्रांत वाक्य आहे तें असें–हे परमेश्वरा, श्रीशंकरा, प्रत्यक्ष सरस्वतीनें जरी आपले मनांत आणलें कीं, आपण शिवाच्या गुणांची गणना करावी; आणि ह्या उद्देशानें ती कज्जलगिरी एवढा काजळाचा ढीग, समुद्राची दौत, कल्पवृक्षाच्या मोठ्या थोरल्या फांदीची लेखणी, आणि पृथ्वीचा कागद करून नेहमीं जरी लिहीत बसली;

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पारं न याति ॥१६७॥ आदित्यपुराणे ॥ मनुरुवाच ॥ यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ॥ भर्गाद्विश्वस्य भरणाद्विश्वयोनेरुमापतेः ॥१६८॥ स्कान्दे ॥ आघ्रायाघ्राय विंदन्ति वेदश्वानः शनैःशनैः ॥ यत्पदानि महारण्ये तं वंदे शबरेश्वरम् ॥१६९॥ रुद्रस्य ब्रह्मविष्णुभ्यां साम्यं वांछन्ति ये जनाः ॥ तेषां वंशस्य सांकर्यमस्तीति मम निश्चयः ॥१७०॥ शिवं ब्रह्मादिभिस्तुल्यं शिवां ब्राम्ह्यादिशक्तिभिः ॥ स्वगुरुं प्राकृतैः सार्धं ये स्मरन्ति वदन्ति वा ॥ तेषां पापान्यनश्यंति श्रीमत्पंचनदाश्रयात् ॥१७१॥ शिवं ब्रह्मादिभिस्तुल्यं स्वगुरुं प्राकृतैः समम् ॥ शिवविद्यामवेदार्थं मनुते यस्तु मानवः ॥ स पापी दुर्मदः क्रूरः श्वपचः श्वपचाधमः ॥१७२॥ यो महादेवमन्येन हीनदेवेन दुर्मतिः ॥ सकृ-

---

तरी तिला देखील तुझ्या गुणांचा अंत लागणार नाहीं, मग इतरांस काय लागणार! (१६८) आदित्यपुराणांत मनूनें ह्मटलें आहे कीं, भर्ग (श्रीशंकर) हा त्रैलोक्याचें रक्षण करणारा आहे, त्यापासून सर्व त्रैलोक्य उत्पन्न झालें, तो पार्वतीचा पति आहे, त्याचें यथार्थ रीतीनें वर्णन करण्यास वाचा आणि मन हीं दोन्हीही समर्थ नाहींत. त्या शिवाचे गुणांचा अन्त न लागल्यामुळें मन आणि वाचा ही परत फिरतात. (१६९) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, अर्जुनाचें सत्व पाहण्यासाठीं श्रीशिव शबरांचा (भिल्लाचा) वेष घेऊन भयंकर हिमालयावरील अरण्यांत फिरूं लागले. तेव्हां वेद हे कुत्रे होऊन जागोजाग शंकराचीं पावलें जेथें उमटलीं होतीं तेथें वारंवार वारंवार हुंगून त्यांची गोडी घेऊं लागले. त्या शबर (भिल्ल) राजास (शिवास मी नमस्कार करितों.) (१७०) जे लोक श्रीशंकराचें आणि ब्रह्मदेवाचें व विष्णूचें सारखेपण आहे असें मानतात, त्यांच्या वंशांत दुराचाराची कांहींतरी भेसळ आहे असी माझी खात्री आहे. (१७१) जे लोक शिवाला ब्रह्मदेवासारखें आणि विष्णूसारखें समजतात, तसेंच पार्वतीला सरस्वतीसारखें आणि लक्ष्मीसारखें समजतात, किंवा ह्मणतात, व आपले गुरूस इतर सामान्य लोकांसारखें मानतात त्या लोकांनीं पंचनदाचीं स्नानें केलीं, तरी त्यांच्या पापांची शुद्धता होणार नाहीं. (१७२) जो मनुष्य शिवाला ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु ह्यांसारखें मानतो, आपल्या गुरूला इतर लोकांसारखे मानतो, आणि शिवविद्येलाही वेदास अनुसरून नाहीं असें मानतो, तो पातकी समजावा; तो गर्वानें फुगला आहे असें समजावें; तो फार क्रूर आहे, तो प्रत्यक्ष चांडाल आहे; इतकेंच नव्हे तर चांडालाहून चांडाळ आहे, असें समजावें. (१७३) जो दुष्टबुद्धीचा मनुष्य श्रीशंकराची इतर साधारण देवांशीं तुलना करितो, CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्साधारणं ब्रूते सोऽन्त्यजो नान्त्यजोऽन्त्यजः ॥१७३॥ विष्ण्वादिदेवतानां वा विश्वाधिक्यं वदन्ति ये ॥ अधोमुखोर्ध्वपादास्ते यास्यंति नरकार्णवम् ॥१७४॥ यथास्यापानयोस्साम्यं छिद्रत्वेऽपि न विद्यते ॥ तथैकत्वेऽपि सर्वेषां रुद्रसाम्यं न विद्यते ॥१७५॥ महापापवतां सर्वजन्मकोटिषु सुव्रताः ॥ विष्णुर्विश्वाधिको भाति नारकास्ते न संशयः ॥१७६॥ रुद्रस्य ब्रह्मविष्णुभ्यामाधिक्यं प्रवदन्ति ये ॥ तेषां वंशस्य वैशिष्ट्यमस्तीति मम निश्चयः ॥१७७॥ स्कन्दपुराणे सूतसंहितायाम् ॥ अनेकजन्मशुद्धानां श्रौतस्मार्तानुवर्तिनाम् ॥ हरः श्रेष्ठो हरेस्साक्षादिति बुद्धिः प्रजायते ॥१७८॥ ब्रह्मोवाच ॥ अयमेव हि सत्यार्थो नापरः परमास्तिकाः॥ विश्वासार्थं शिवं स्पृष्ट्वा तीव्रं शपथयाम्यहम् ॥१७९॥ व्यास उवाच॥ तस्माद्वेदोपदिष्टार्थो यथार्थो नास्ति संशयः ॥ सत्यं सत्यं पुनस्सत्यमु-

---

तो महार समजावा; इतकेंच नाहीं तर महारापेक्षां देखील महार समजावा. (१७४) जे लोक विष्णु वगैरे देवांचें ह्या जगांत अलौकिक सामर्थ्य आहे असें मानतात, व श्रीशंकर विष्णूपेक्षां कमी योग्यतेचा आहे असें मानतात, ते लोक खालीं डोकें वर पाय असे होऊन नरकसमुद्रांत जातात. (१७५) जसें तोंडाचेंही भोंक आणि गांडीचेंही भोंकच आहे, ह्मणून गांडतोंडाची योग्यता सारखी होत नाहीं; तसेंच इतर ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र, वगैरे देवांस देव हा शब्द लागत असला, तरी त्यांचें आणि शंकराचें सारखेपण होत नाहीं. शंकर हा सर्व देवांपेक्षां श्रेष्ठच आहे. (१७६) हे सदाचारी ब्राह्मणहो, ज्या मनुष्यांनीं अनेक जन्मांत पापेंच संग्रह केलीं, त्यांस श्रीशंकरापेक्षां विष्णु श्रेष्ठ आहे असें वाटतें; ते प्रत्यक्ष नारकी जीव आहेत ह्यांत संशय नाहीं. (१७७) जे लोक ब्रह्मदेवापेक्षां आणि श्रीविष्णूपेक्षां श्रीशंकर श्रेष्ठ आहे असें मानतात, त्यांचा वंश श्रेष्ठ आहे; अशी माझी समजूत आहे. (१७८) स्कन्दपुराणांत सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जे अनेक जन्मांत पवित्राचरण करून शुद्ध झाले आहेत, जे लोक श्रुति स्मृति ह्यांस अनुसरून वागतात, त्या लोकांस श्रीविष्णूपेक्षां महादेव श्रेष्ठ आहे अशी बुद्धि होते. इतरांस होत नाहीं. (१७९) ब्रह्मदेव ह्मणाला, हे भाविक लोकहो, हीच गोष्ट खरी आहे. ह्याखेरीज दुसरें कांहीं नाहीं. (शिव हाच सर्व देवांत श्रेष्ठ आहे, शिवाखेरीज श्रेष्ठ कोणी नाहीं). ह्या गोष्टीवर तुमचा विश्वास बसण्यासाठीं मी शिवाचीच शपथ करितों. (१८०) व्यास ह्मणतात, ह्यासाठीं वेदानें सांगितलेली गोष्ट अगदीं खरी आहे. ह्यांत शंका नाहीं. हें अगदीं खरें आहे, हें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ध्दत्य भुजमुच्यते ॥१८०॥ ग्रन्थान्तरे ॥ रुद्रस्य ब्रह्मविष्णुभ्यां नाधिक्यं प्रवदंति ये ॥ हन्यात्तानविचारेण हंतुर्दोषो न कश्चन ॥१८१॥ उपमन्युरुवाच ॥ श्रुत्वा निंदां शिवस्याथ तत्क्षणादेव यस्त्यजेत् ॥ स्वदेहं तं निहत्याशु रुद्रलोकं स गच्छति ॥१८२॥ लैंग्ये ॥ बहुनात्र किमुक्तेन वृथा दानं वृथा तपः ॥ वृथा यज्ञो वृथा होमः शिवनिंदारतस्य तु ॥१८३॥ ग्रन्थान्तरे ॥ तस्करं पारदार्यं स्यादन्यदेवस्य पूजनम् ॥ अनृतं निष्ठुरं निंदा चेति चंडाललक्षणम् ॥१८४॥ शातातपस्मृतौ ॥ अंगेषु नांकयेद्विप्रो देवतायुधलांछनैः ॥ अंकयेद्यदि वा मोहात्पतितः स न संशयः ॥१८५॥ मानवपुराणे ॥ आयुधैः शंखचक्राद्यैर्न दहेच्च कदा च न ॥ मनुष्याणां च नाम्ना तु न लिखेच्चोरसि भ्रमात् ॥१८६॥ यमस्मृतौ ॥ नांकयेन्न दहेद्गात्रं देवतायुधलांछनैः ॥ दहनाल्लेखनाद्विप्रो पातित्यं याति

---

अगदीं खरें आहे, असें मी तुह्मांस हात वर उचलून खात्रीनें सांगतों. (१८१) इतर ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, जे लोक श्रीशंकर हा ब्रह्मदेवापेक्षां आणि श्रीविष्णुपेक्षां श्रेष्ठ नाहीं असें ह्मणतात; त्या लोकांस कांहींएक विचार न करितां मारून टाकावें. त्यांस मारणाराला कोणताही दोष लागणार नाहीं. (१८२) उपमन्यु ह्मणाला, जो कोणी मनुष्य शिवाची निंदा ऐकल्यावरोवर तत्काळ तेथून उठून त्या निंदकास मारून टाकून आपला आत्मघात करून घेईल, तो लागलाच कैलासलोकास जाईल. (१८३) लिंग पुराणांत ह्मटलें आहे कीं, फार सांगण्यांत काय अर्थ आहे? जो मनुष्य नेहमीं शिवाची निंदा करितो त्याचें दान व्यर्थ आहे, त्याचें तप व्यर्थ आहे, त्याचा यज्ञ व्यर्थ आहे व त्याचा होम व्यर्थ आहे. (१८४) इतर ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, चोरी करणें, दुसऱ्याचे बायकोबरोबर व्यभिचार करणें, शिवाखेरीज इतर देवांचें पूजन करणें, खोटें बोलणें, कठोर बोलणें, आणि निंदा करणें, हीं चांडालाचीं लक्षणें आहेत. (१८५) शातातपस्मृतींत ह्मटलें आहे कीं, ब्राह्मणानें आपल्या अंगावर शंख, चक्र वगैरे देवांच्या आयुधांचे ठसे मारून घेऊं नयेत; जर कोणी ब्राह्मण अज्ञानपणानें असे ठसे आपल्या अंगावर मारून घेईल तर तो पतित समजावा. ह्यांत संशय नाहीं. (१८६) मानवपुराणांत ह्मटलें आहे कीं, शंख, चक्र, वगैरे देवांच्या आयुधांच्या मुद्रांनीं आपलें शरीर कधींही जाळून घेऊं नये, व अज्ञानपणानें आपल्या उरावर मनुष्यांचीं नांवेंही गोंदून घेऊं नयेत. (१८७) यमस्मृतींत ह्मटलें आहे कीं, देवांच्या शंखचक्र वगैरे आयुधांच्या मुद्रा आपल्या अंगावर कधींही मारून घेऊं नयेत; आणि त्याकरितां आपलें शरीर कधींहीं भाजून घेऊं नये. जर कोणी ब्राह्मण देवांच्या आयुधांच्या मुद्रा आपल्या शरीरावर मारून घेऊन आपलें शरीर भाजून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तत्क्षणात् ॥१८७॥ बोधायनस्मृतौ ॥ नांकयेन्न दहेद्देहं दहेच्चेत्कामकारतः ॥ नाधिकुर्वन्ति दग्धांगान् श्रौतार्थेषु च कर्मसु ॥१८८॥ सूतसंहितायाम् ॥ स्वदेहे परदेहे वा न कुर्यादंकनं नरः ॥ यदि कुर्याच्च चक्राद्यैः पतितः स न संशयः ॥१८९॥ मानवपुराणे ॥ दग्धांगा लिखितांगाश्च न संभाष्या द्विजातयः ॥ न दर्शनीयास्तान् राजा देशाच्छीघ्रं प्रवासयेत् ॥१९०॥ दधीचिरुवाच ॥ अंगेषु चांकिता यूयं शंखचक्रांकुशादिभिः ॥ भवेत श्रद्धया सार्धं वेदबाह्या द्विजाधमाः ॥१९१॥ गौतम उवाच॥शंखचक्रगदाचापदण्डपाशांकुशादिभिः॥अंकिताः श्रद्धया यूयं भवेयुर्ब्राह्मणाधमाः ॥१९२॥ शिवरहस्ये ॥ पापानामपि बाहुल्याद्दधीचस्य च शापतः ॥ गौतमस्य मुनेः शापाच्छ्रौतलिंगं न रोचते॥१९३॥ स्कान्दे॥

---

घेईल तर तो तत्काळ पतित होईल. (१८८) बौधायनस्मृतींत म्हटलें आहे कीं, शरीरावर मुद्रा मारूं नयेत, आणि त्याकरितां आपलें शरीरही भाजून घेऊं नये. जर कोणी जाळून घेईल तर त्यानें तें कृत्य शोभेकरितां मनाच्या आवडीप्रमाणें केलें म्हणावें. शंखचक्रादि चिन्हांनीं शरीरावर मुद्रा मारून घेणाऱ्याला श्रौतस्मार्तकर्मामध्यें जास्त महत्व मिळत नाहीं. श्रौतस्मार्तकर्मे करण्याचा त्याला अधिकार पोंचत नाहीं. (१८९) सूतसंहितेंत म्हटलें आहे कीं, मनुष्यानें आपल्या शरीरावर किंवा दुसऱ्याच्या शरीरावर शंखचक्र वगैरे देवांच्या आयुधांच्या खुणा कधींही करूं नयेत. जर तो आपल्या अंगावर किंवा परक्याच्या अंगावर शंखचक्र वगैरे मुद्रा मारील, तर तो पतित आहे असें समजावें. ह्यांत संशय नाहीं. (१९०) मानवपुराणांत म्हटलें आहे कीं, ज्या ब्राह्मणांनीं आपल्या अंगावर शंखचक्र वगैरे मुद्रा मारून घेऊन आपलीं शरीरें भाजून घेतलीं आहेत, त्या ब्राह्मणांचें तोंड पाहूं नये. अशा ब्राम्हणांस राजानें आपल्या देशांतून लागलेंच हांकून लावावें. (१९१) दधीचीनें म्हटलें आहे कीं, हे ब्राह्मणहो, तुह्मी आपल्या अंगावर शंख, चक्र, गदा, वगैरे श्रीविष्णूच्या आयुधांच्या मुद्रा लाविलेल्या आहेत, आणि अशा मुद्रा लावण्यावर तुमचा मोठा विश्वास आहे. पण तुह्मांस सांगतों कीं, तुह्मी वेदबाह्य आहां, तुह्मी नीच ब्राह्मण आहां. (१९२) गौतम म्हणतात, हे ब्राह्मणहो, तुह्मी आपल्या अंगावर शंख, चक्र, गदा, धनुष्य, दंड, पाश, अंकुश वगैरे देवांच्या आयुधांच्या मुद्रा लावून श्रद्धेनें घ्याल, तर तुह्मी अत्यंत नीच ब्राह्मण समजले जाल. (१९३) शिवरहस्यांत म्हटलें आहे कीं, ब्राम्हण लोक हे अतिशय पातकी आहेत. त्यांस दधीची ऋषीचा शाप असून, आणखी गौतम मुनीचाही शाप आहे. त्यामुळें त्यांस वेदधर्मप्रणीत लिंग आवडत नाहीं. (१९४) स्कन्दपुराणांत म्हटलें आहे कीं, ब्राह्मणानें ममतीखातर कां होईना परंतु ऊर्ध्वपुंड्र

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ऊर्ध्वपुंड्रं द्विजः कुर्याल्लीलयापि कदाचन ॥ तदाकारेण शस्त्रेण भिद्यते यमकिंकरैः ॥१९४॥ पाराशरपुराणे ॥ ऊर्ध्वपुंड्रं च शूलं च वर्तुलं चार्धचंद्रकम् ॥ ललाटे धारयिष्यंति मनुष्याः पापकर्मिणः ॥१९५॥ गारुडपुराणे ॥ स्रष्टा सृष्टिच्छलेनाह त्रिपुण्ड्रस्य प्रशस्तताम् ॥ ससर्ज च ललाटं हि तिर्यगूर्ध्वं न वर्तुलम् ॥१९६॥ धिक्भस्मरहितं फालं धिक्ग्राममशिवालयम् ॥ धिगनीशार्चनं जन्म धिग्विद्यामशिवाश्रयाम् ॥१९७॥ गोपीमलिनधारी च शिवं चापि स्पृशेद्द्विजः ॥ स चैकविंशति कुलमक्षयं नरकं व्रजेत् ॥१९८॥ बोधायनशाखायाम् ॥ अभावे वा तथा विप्रो लौकिकाग्नेस्तदाहरेत् ॥ भस्मनैव प्रकुर्वीत न कुर्यान्मृत्तिकादिभिः ॥१९९॥ क्रियासारे ॥ येषां वपुर्मनुष्याणां त्रिपुंड्रेण विना स्थितम् ॥ स्मशानसदृशं तस्मान्न दृशं पुण्यकृज्जनैः ॥२००॥ कूर्मपुराणे ॥ त्रिपुंड्रं

---

कधींही करूं नये. जर तो ऊर्ध्वपुंड्र करील, तर त्या मनुष्यास यमाचे दूत त्या ऊर्ध्वपुंड्राच्या आकाराच्या शस्त्रानें चराचर कापितात. (१९५) पाराशरपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे पातकी लोक आहेत, ते आपल्या कपाळावर ऊर्ध्वपुंड्र, शूल, वर्तुल आणि अर्धचंद्राचे आकाराचें त्रिपुंड्र लावितात; इतर कोणी लावीत नाहींत. (१९६) गारुडपुराणांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्याच्या मिषानेंच भस्मत्रिपुंड्राची योग्यता किती मोठी आहे ती सांगितली आहे; कां तर ज्या कपाळावर भस्माचें त्रिपुंड्र करावयाचें तें कपाळ त्यानें भस्म लावण्याचे उपयोगीं पडण्यासारखें मुद्दाम आडवेंच केलें आहे. वांकडें, उभें किंवा वाटोळें त्यानें केलें नाहीं. (१९७) ज्या कपाळावर भस्माचा त्रिपुंड्र नसेल, त्या कपाळाला धिक्कार असो; ज्या गांवांत शिवाचें मंदिर नसेल, त्या गांवास धिक्कार असो; ज्या जन्मांत आपले हातून शिवपूजा झाली नसेल, त्या जन्मास धिक्कार असो; आणि ज्या विद्येच्यायोगानें शिवज्ञान संपादन होत नसेल, त्या विद्येस धिक्कार असो. (१९८) गोपीचंदनाला गोपींची विष्ठा असें कितीएक मानतात. तें गोपीचंदन कपाळास लावून जर कोणी ब्राह्मण शिवलिंगास जाऊन स्पर्श करील, तर तो एकवीस कुळांसुद्धां अक्षय नरकांत जाऊन पडेल. (१९९) बोधायनशाखेंत ह्मटलें आहे कीं, शुद्धभस्म जर मिळालेंच नाहीं तर ब्राह्मणानें आपण नित्य स्वयंपाक करितों, त्या विस्तवांतील भस्म घेऊन तें भस्म आपल्या कपाळास लावावें. परंतु भस्म मिळालें नाहीं ह्मणून माती घेऊन आपले कपाळास लाऊं नये. (२००) क्रियासारांत ह्मटलें आहे कीं, ज्या मनुष्यांचे शरीरावर भस्माचें त्रिपुंड्र केलेले नसतील, त्यांचें तें शरीर स्मशानासारखें आहे; असें समजावें. त्या मनुष्यांचें तोंड देखील पुण्यवानानें पाहूं नये. (२०१) कूर्मपुराणांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ब्राह्मणो विद्वान् मनसापि न लंघयेत् ॥ श्रुत्या विधीयते तस्मात्तस्यागी पतितो भवेत् ॥२०१॥ वेदस्याध्ययने शूद्रो नाधिकारी यथा भवेत् ॥ त्रिपुंड्रेण विना विप्रो नाधिकारी शिवार्चने ॥२०२॥ त्रिपुंड्रधारणं मुक्त्वा मुक्तिमिच्छति यः पुमान् ॥ विषपानेन नित्यत्वं कुरुते स्वात्मनो हि सः ॥२०३॥ वासिष्ठरामायणे ॥ अहोनु चित्रं यत्सत्यं भस्म तद्विस्मृतं धृतम् ॥ यदसत्यं मृदा धार्यं तत्परं परिवल्गतः ॥२०४॥ भीमागमे ॥ कृतं स्यादकृतं तेन श्रुतमप्यश्रुतं भवेत् ॥ अधीतमनधीतं स्यात्रिपुण्ड्रं यो न धारयेत् ॥२०५॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ विप्राणां वेदविदुषां वेदान्तज्ञानवेदिनाम् ॥ सितेन भस्मना कार्यं त्रिपुंड्रमिति पद्मभूः ॥२०६॥ मानवपुराणे ॥ मुखे मंत्रं हृदि ध्यानं मस्तके लिंगधारणम् ॥ शिखासूत्रं जटाभस्म इत्येतद्ब्रह्मलक्षणम् ॥२०७॥ फाले त्रिपुंड्रकं यस्य

---

ह्मटलें आहे कीं, विद्वान ब्राह्मणानें भस्म त्रिपुंड्राचा अपमान मनानें देखील करूं नये. कारण भस्म धारण करावें असें प्रत्यक्ष वेदांत सांगितलेलें आहे. ह्मणून जो कोणी भस्म न लावील तो पतित आहे, असें समजावें. (२०२) वेदाचें अध्ययन करण्याचा अधिकार ब्राह्मणाखेरीज शूद्रास जसा पोंचत नाहीं; तसाच ब्राह्मणानें भस्माचें त्रिपुंड्र आपले मस्तकास लाविल्याखेरीज त्यास शिवाची पूजा करण्याचा अधिकार पोचत नाहीं. (२०३) जो पुरुष भस्म धारण केल्याखेरीज आपणास मोक्षप्राप्ति व्हावी अशी इच्छा करितो; तो विष पिऊन अमृत प्याल्याप्रमाणें आपण अमर झालों, असें समजणाराप्रमाणें मूर्ख होय. (२०४) वासिष्ठरामायणांत ह्मटलें आहे कीं, अहो काय आश्चर्य आहे पहा! जें खरें भस्म आहे तें लावावयाचें विसरलों; आणि जें खरें भस्म नव्हें, तें मातीचें भस्म घेऊन लावून, भस्म लाविलें म्हणून प्रौढी मिरवितों. (२०५) भीमागमांत ह्मटलें आहे कीं, ज्या मनुष्यानें भस्माचें त्रिपुंड्र धारण केलें नाहीं, त्यानें सत्कर्म केलें तरी तें केलें नसल्यासारखें आहे; त्यानें शास्त्र ऐकिलें असलें तरी न ऐकिल्यासारखेंच आहे; त्यानें वेदपठन केलें तरी वेदपठन केलें नसल्यासारखें आहे; कांतर भस्मधारण केल्यांशिवाय कोणतेंही सत्कर्म करून न केल्यासारखेंच आहे. (२०६) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव ह्मणतात—जे ब्राह्मण वेद चांगल्या तऱ्हेनें जाणतात, ज्यांस वेदांताचें ज्ञान आहे, त्यांनीं पांढऱ्या शुभ्र भस्माचा त्रिपुंड्र करावा. (२०७) मानवपुराणांत ह्मटलें आहे कीं, तोंडानें शिवपंचाक्षरीमंत्राचा जप करणें, मनामध्यें शिवाचें ध्यान करणें, मस्तकावर शिवलिंग धारण करणें, डोकीवर शिखा, गळ्यांत सूत्र (शिवदोरा), जटा, आणि भस्मत्रिपुंड्र धारण करणें हीं ब्राह्मणाचीं लक्षणें होत. (२०८) ज्या मनुष्याचे कपा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गले रुद्राक्षमालिका ॥ वक्त्रे षडक्षरीमंत्रस्सरुद्रो नात्र संशयः ॥२०८॥ त्रिपुंड्रधृग्विप्रवरो यो रुद्राक्षधरः शुचिः ॥ स पंक्तिपावनः श्राद्धे पूज्यो विप्रैः सुरैरपि ॥२०९॥ स्कान्दे ॥ प्रसादमन्यदेवस्य भुक्तं तत्किल्बिषं भवेत् ॥ शिवस्यैव तु नैवेद्यं भक्त्या धार्यं द्विजातिभिः ॥२१०॥ चतुर्वेदधरो विप्रः सर्वशास्त्रविशारदः ॥ शिवज्ञानं न जानाति दर्वी पाकरसं यथा ॥२११॥ वृत्तम् ॥ संगीतसाहित्यरसानभिज्ञस्साक्षात्पशुः पुच्छविषाणशून्यः ॥ किं कारणं भक्षति नो तृणानि पुराकृतं पुण्यनयेन बद्धः ॥२१२॥ वायवीयसंहितायाम् ॥ चतुर्वेदधरो विप्रः शिवभक्तिविवर्जितः ॥ वेदभारभराक्रांतः स वै ब्राह्मणगर्दभः ॥२१३॥ यश्चतुर्वेदविन्नित्यं शिवभक्तिविवर्जितः ॥ सकृत्संभाषणं तेन न कुर्यादु-

---

ळावर भस्माचें त्रिपुंड्र आहे, गळ्यांत रुद्राक्षांची माळा आहे आणि जो तोंडानें नेहमीं षडक्षरीमंत्राचा जप करितो; तो मनुष्य प्रत्यक्ष रुद्र आहे ह्यांत संशय नाहीं. (२०९) ज्या ब्राह्मणश्रेष्ठानें कपाळाला भस्माचें त्रिपुंड्र लाविलें आहे, गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा घातल्या आहेत, ज्याचें वर्तन निर्दोष आहे, तो पंक्तिपावन ( सर्वांस पवित्र करणारा ) होय; तो श्राद्धास योग्य आहे. फार काय परंतु तो ब्राह्मणास व देवांस वंद्य आहे. (२१०) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, ब्राह्मणांनीं इतर देवांचा नैवेद्य भक्षण केला असतां त्यांस पाप लागतें. शिवाचा नैवेद्यच ब्राह्मणांनीं भक्तिभावानें भक्षण करावा; इतर देवांचा करूं नये. (२११) जो ब्राह्मण चार वेद चांगल्या तऱ्हेनें शिकलेला आहे, व सर्व शास्त्रांत पारंगत आहे; तरी पण ज्यास शिवज्ञान समजत नसेल तो स्वयंपाकाच्या पळी सारखा समजावा. त्या पळीला जशी पदार्थांची चव घेतां येत नाहीं: तसेंच त्या मनुष्यालाही मोक्षप्राप्तीचें सुख घेतां येत नाहीं. (२१२) ज्या मनुष्याला गायनाची अभिरुचि नाहीं आणि साहित्य शास्त्राचीही अभिरुचि नाहीं; तो मनुष्य शिंगें आणि शेपूट नसणारें जनावरच समजावा. तो इतर जनावराप्रमाणें गवत खात नाहीं. कांतर त्यानें गवत खाऊं नये अन्न खावें इतकें पुण्य त्याकडून झालें आहे इतकेंच. (२१३) वायवीयसंहितेंत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य चार वेद चांगल्या तऱ्हेनें शिकलेला आहे परंतु त्याचे अंगीं शिवभक्ति नाहीं; तो वेदाच्या ओझ्याखालीं दडपून गेलेला गाढवासारखा ब्राह्मण ( ब्राह्मणगर्दभ ) आहे, असें समजावें. (२१४) जो कोणी ब्राह्मण चार वेद चांगल्या तऱ्हेनें शिकलेला आहे, आणि जो नेहमीं वेदपठनांतच आपला कालक्षेप करितो; तो जर शिवभक्ति करणारा नसेल, तर त्यापासून उपजीवन पावणाऱ्यानें ( त्यानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पर्जीविना ॥२१४॥ स्कंदपुराणे ॥ एकदंडित्रिदंड्याद्या एकभक्ता हरे त्वयि ॥ तेऽद्य पाषंडिनस्संतु दृष्ट्या च नरकप्रदाः ॥२१५॥ ये नरा भोजयिष्यन्ति संभाष्यन्ति नमंति तान् ॥ तेऽपि स्थास्यन्ति नरके यावदाभूतसंप्लवः ॥२१६॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ न प्रदोषे हरिं पश्येद्यदि पश्येत्प्रमादतः ॥ चत्वारि तस्य नश्यन्ति ह्यायुः प्रज्ञा यशो बलम् ॥२१७॥ न प्रदोषे हरिं पश्येत्त्रयोदश्यां विशेषतः ॥ यदि प्रमादात्पश्येत द्वादशाब्दवृषक्षयः ॥२१८॥ मानवपुराणे ॥ नारायणादिनामानि विसृज्य न विचारतः ॥ जपेच्छिवादिनामानि सद्यो मुक्तिं य (दी) इच्छति ॥२१९॥ लैंग्ये ॥ यः प्रातर्देवदेवेशं शिवलिंगस्वरूपिणम् ॥ पश्येत्स याति सर्वस्मादधिकां गतिमुत्तमाम् ॥२२०॥ मध्यान्हे च महादेवं दृष्ट्वा यज्ञफलं भवेत् ॥ सायान्हे सर्वयज्ञानां फलं प्राप्य विमुच्यते ॥२२१॥

---

घरीं चाकरी करणाऱ्यानें ) देखील त्याजबरोबर बोलूं नये. (२१५) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, हे विष्णो, तुझी एकाग्रमनानें भक्ति करणारे मनुष्य एकदंडी सन्याशी असोत, किंवा त्रिदंडी सन्याशी असोत; ते सर्व आतां पाखंडी ( नास्तिक ) मानले जातात, त्यांचें दर्शन झालें तरी दर्शन घेणारा नरकास जातो. (२१६) त्या एकदंडी सन्याशास आणि त्रिदंडी सन्याशास जे लोक जेऊं घालतात, त्यांचे बरोबर बोलतात, व त्यांस नमस्कार करितात; ते देखील महाप्रलय होईपर्यंत नरकांत जाऊन पडतात (२१७) प्रदोषकाळाच्यावेळीं श्रीविष्णूचें कधींही दर्शन घेऊं नये. जर कोणी नकळत ( अज्ञानपणानें ) चुकून विष्णूचें दर्शन घेईल तर त्याचे आयुष्याचा, बुद्धीचा, यशाचा, आणि शक्तीचा नाश होतो. (२१८) प्रदोषकाळीं तर विष्णूचें दर्शन घेऊं नये, परंतु त्रयोदशीच्या दिवशीं तर मुळींच घेऊं नये; जे कोणी चुकून सहज रीतीनें श्रीविष्णूचें दर्शन घेतील, त्यांच्या बारा वर्षांच्या पुण्याचा नाश होतो. (२१९) मानव पुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य आपणास मोक्षप्राप्ति व्हावी असें इच्छीत असेल, त्यानें नारायण वगैरे देवांचीं नांवें न घेतां आणि मनांत कोणताही विचार न करितां, शिवाचीं नांवें घ्यावीं ह्मणजे त्यास निःसंशय मोक्षप्राप्ति होईल. (२२०) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य सकाळच्या प्रहरीं लिंगस्वरूप असणाऱ्या देवाधिदेव श्रीशंकराचें दर्शन घेतो, त्याला सर्व पुण्यकर्मांनीं मिळणाऱ्या गतीपेक्षां उत्तम गति मिळते. (२२१) दोन प्रहरच्या वेळीं शंकराचें दर्शन घेतलें असतां, दर्शन घेणाऱ्यास यज्ञ केल्याचें श्रेय मिळतें; आणि सायंकाळच्या वेळीं शिवाचें दर्शन घेतलें असतां, दर्शन घेणाऱ्यास

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रदोषे शंकरं दृष्ट्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥ मानसैर्वाचिकैः पापैः कायिकैश्च महत्तरैः ॥२२२॥ कूर्मपुराणे ॥ त्रयोदश्यां तथा रात्रौ सोपहारस्त्रिलोचनः ॥ दृष्टश्चेत्प्रथमे यामे मुच्यते सर्वपातकैः ॥२२३॥ ग्रन्थांतरे ॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं नित्यमेव च ॥ यः पश्यति विरूपाक्षं सर्वपापाद्विशुध्यते ॥२२४॥ गंगापुष्करकेदारनैमिषादिष्वनेकशः ॥ तीर्थस्नानेन यत्पुण्यं शिवं दृष्ट्वैव लभ्यते ॥२२५॥ अचिन्त्यविश्वसादाख्ये ॥ शिवस्य दर्शनं स्पर्शं जन्मरोगनिकृंतनम् ॥ शिवदर्शनमप्याहुः सुलभं ज्ञानचक्षुषः ॥२२६॥ लैंगे ॥ लिंगस्य दर्शनादेव निर्मलः पापवर्जितः ॥ शुद्धस्फटिकसंकाशः शुद्धचामीकरोपमः ॥ शुध्ददेहो भवेद्देवि नरो मेऽभ्यर्चने रतः ॥२२७॥ ग्रन्थान्तरे ॥ अभक्ष्यभक्षको वापि ब्रह्महा यदि मातृहा ॥ पितृहा बालघाती च गो-

---

यज्ञ केल्याचें श्रेय मिळून तो मुक्त होतो. (२२२) प्रदोषकाळीं श्रीशिवाचें दर्शन घेतलें असतां, मनुष्याच्या हातून कायिक, वाचिक आणि मानसिक अशीं तीन प्रकारचीं जीं अघोर अघोर पातकें घडलीं असतील त्या सर्व पापांपासून शिवदर्शन घेणारा मुक्त होतो. (२२३) कूर्मपुराणांत झटलें आहे कीं, त्रयोदशीच्या रात्रीं पहिल्या प्रहरीं यथाविधीनें श्रीशिवाचें पूजन करून दर्शन घेतलें असतां, शिवदर्शन घेणारा मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो. (२२४) इतर ग्रंथांत झटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य दररोज नियमानें एक वेळ किंवा दोन वेळ किंवा तीन वेळ शिवाचें दर्शन घेतो, तो मनुष्य सर्व प्रकारच्या पापांपासून मुक्त होतो. (२२५) गंगा नदींत, पुष्कर तीर्थांत, केदार तीर्थांत, नैमिषारण्यांत वगैरे पवित्र तीर्थस्थानांत अनेक वेळ स्नानें केलीं, तर जें कांहीं पुण्य लागतें; तें पुण्य एक वेळ शिवाचें दर्शन घेतलें असतां लागतें. (२२६) अचिंत्यविश्वसादाख्य ग्रंथांत लिहिलें आहे कीं, श्रीशिवाचें दर्शन घेणें, आणि श्रीशिवलिंगास स्पर्श करणें, ह्या दोन गोष्टी जन्ममरणरूप रोग दूर करितात. जे ज्ञानदृष्टी लोक आहेत, ते ह्मणतात कीं, शिवाचें दर्शन घेणें फारच सुखकारक आहे (२२७) लिंगपुराणांत झटलें आहे कीं, शिवलिंगाचें दर्शन घेतल्याबरोबरच दर्शन घेणारा मनुष्य पातकापासून मुक्त होऊन शुद्ध स्फटिक मण्याप्रमाणें किंवा शंभर नंबरी सोन्याप्रमाणें शोभूं लागतो. हे देवी माझ्या पूजेंत जो रत असेल तो शुद्धदेही ( पाप रहित ) होतो. (२२८) इतर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, कोणी मनुष्य अभक्ष्य भक्षण करणारा असो, ब्रह्मघातकी असो, मातृघातकी असो, पितृघातकी असो, बालघातकी असो, गुरुख्याची हत्या करणारा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पत्नीशूद्रघातकः ॥२२८॥ वक्ता च परदोषस्य परस्य गुणदूषकः ॥ कृपणोऽकृतवादी च मणिरत्नापहारकः ॥ सर्वपापमयः पुत्र मुच्यते लिंगदर्शनात् ॥२२९॥ जातिस्मरत्वमैश्वर्यं विद्यां ज्ञानं प्रजास्सुखम् ॥ अज्ञानाद्वा भयाद्वापि दृष्ट्वा प्राप्नोति शंकरम् ॥२३०॥ लैंगे ॥ करांगन्यासंशुद्धिश्च देहशुद्धिस्तथैव च ॥ सर्वशुद्धिर्भवेन्नित्यं लिंगस्पर्शनदर्शनात् ॥२३१॥ ईश्वर उवाच ॥ दुर्लभं प्राप्य मानुष्यं येऽर्चयन्ति सदाशिवम् ॥ तेषां हि सफलं जन्म कृतार्थास्ते नरोत्तमाः ॥२३२॥ स्कान्दे ॥ शिवार्चकपदद्वन्द्वमर्चयेद्धारयेदपि ॥ शिवनाम सदा ध्यायेज्जपेद्विप्रस्य लक्षणम् ॥२३३॥ सूतसंहितायाम् ॥ वृत्तम् ॥ अथो महादेवशिवादिशब्दं परं मुदा नित्यमतंद्रितश्च ॥ विहाय नारायणनामपूर्वकं जपेदशे-

---

असो, बायकोची हत्या करणारा असो. शूद्राची हत्या करणारा असो, (२२९) लोकांचे दोष उघड रीतींनें सर्वांस बोलून दाखविणारा असो, दुसऱ्याच्या गुणाची मुद्दाम निंदा करणारा असो, कितीही कृपण असो, आपल्या हातून कोणतीही गोष्ट न होता ती मीं केली अशी प्रौढी मिरविणारा असो, रत्नांची व अलंकारांची चोरी करणारा असो, फार काय परंतु तो सर्व प्रकारचीं पातकें करणारा असला, तरी मुला षडानना, तो शिवलिंगाचें दर्शन घेईल तर तो तत्काळ मुक्त होईल. (२३०) जर कोणी मनुष्यानें अज्ञानपणानें ( न कळत सहज ) किंवा भयानें कां होईना शिवाचें दर्शन घेतलें तर त्या दर्शन घेणाऱ्या मनुष्यास पूर्व जन्माचें स्मरण, संपत्ति, विद्या, ज्ञान, संतति, आणि सुख, ह्यांची प्राप्ति होते. (२३१) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवलिंगास स्पर्श केला, किंवा शिवलिंगाचें दर्शन घेतलें; तर त्या दर्शन घेणाऱ्या किंवा स्पर्श करणाऱ्या मनुष्याची हस्तन्यासाची शुद्धि होते. अंगन्यासाची शुद्धि होते, देहाची शुद्धि होते, फार काय परंतु नेहमीं त्याची सर्व प्रकारची शुद्धि होते. (२३२) ईश्वर ह्मणतात, हा मनुष्यजन्म मिळणें फार दुर्मिळ ( प्रयासाचें ) आहे. असा न मिळणारा मनुष्यजन्म मिळाला असतां जे लोक सदाशिवाची पूजा करितात, त्यांचें जन्म सफळ आहे; ते कृतकृत्य आहेत; ते सर्व मनुष्यांत श्रेष्ठ आहेत. (२३३) जो मनुष्य नेहमीं शिवाचें पूजन करितो, त्याचे चरणकमलाची पूजा करावी, त्याचें चरणकमलाचें नेहमीं स्मरण करीत असावें; तसेंच शिवनामाचा नेहमीं जप करावा हेंच ब्राह्मणाचें मुख्य लक्षण आहे. (२३४) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, मग महादेव, शिव, वगैरे श्रेष्ठ शब्द कोणताही मनांत संशय न घेतां किंवा आळस न करितां दररोज उच्चारीत जावें; नारायण वगैरे नांवें उच्चारूं नयेत. असा शिवनामाचा जप केला असतां सर्व प्रकारचीं अशुद्ध कर्में नाश

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

षाशुभनाशनाय ॥२३४॥ शिवधर्मे ॥ नाममात्रप्रपन्नस्तु क्षणार्धमपि य- शिवे ॥ स मुनिः स महान्साधुः स योगी शिवतां व्रजेत् ॥२३५॥ स्कान्दे ॥ उत्कृष्टतुल्यजातीनां महच्छब्दः प्रयुज्यते ॥ तस्मात्समस्तदे- वानां महादेवोऽयमुत्तमः ॥२३६॥ ग्रन्थान्तरे ॥ महादेवेति वाग्वल्ली चतुरक्षरपल्लवा ॥ भक्तिसिक्ताफलन्तेषा चतुर्वर्गफलान्यहो ॥२३७॥ महादेव महादेव महादेवेति वादिनम् ॥ वत्सं गौरिव गौरीशो धाव- न्तमनुधावति ॥२३८॥ महादेव महादेव महादेवेत्ययं ध्वनिः ॥ सुधि- यो मुक्तिकान्तायाः पाणिग्रहणडिंडिमः ॥२३९॥ स्कान्दे ॥ लिंग- शब्दं सकृच्छ्रुत्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥ लिंगशब्दं समुच्चार्य मुच्यते जन्मबन्धनात् ॥२४०॥ शिवेति मंगलं नाम यस्य वाचि प्रवर्तते ॥ भ-

---

पावतात. (२३५) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, जो कोणी मनुष्य अर्धा क्षण शिव शिव शिव शिव असा नामोच्चार करीत शिवास शरण जाईल; तो तेवढ्या- नेंच मुनिपणा पावेल, तो मोठा साधु आहे असें लोक मानितील, तो मोठा योगी असा मानिला जाईल, व तो मरणानंतर शिवस्वरूप पावेल (२३६) सारख्या स- रख्या जातींमध्यें जो उत्कृष्ट असेल, त्याला महत् असा शब्द योजितात; ह्या सर्व सर्व देवांत महादेव हा उत्तम असल्यामुळें, ह्यास महादेव असें नांव पडलें आहे. (२३७) इतर ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, महादेव या नांवाच्या वाक्यरूप वेलीला चार अक्षररूप पालवी फुटलेली असते, व या वेलीच्या मुळ्या भक्तिरूप पाण्यानें भिजलेल्या असतात. अर्थात या वेलीला धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष अशीं हीं चार फळें येतात. ( मनुष्यानें वाचेनें शिवनामाचा जप केला तर त्याची शिवाविषयीं भक्ति वाढून त्यास धर्मार्थ काममोक्षाची प्राप्ति होईल ). (२३८) गाय जशी आपल्या वासराचे मागे धांवत जाते; तसा महादेव, महादेव, महादेव, असें नामोच्चारण करणाऱ्या मनुष्याचे मागें पार्वतीपति श्रीशंकर हा धांवत जातो. (२३९) महादेव, महादेव, महादेव याप्रमाणें नामस्मरण करणाऱ्या बुद्धिमानानें केले- ला नामघोषाचा ध्वनि, मोक्षरूपी लक्ष्मीच्या लग्नाचे वेळेस वाजविलेल्या मंगल वाद्या- सारखा शोभतो. ( शिवनामस्मरण करणारा मनुष्य मोक्षास जातो.) (२४०) स्कंद- पुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवलिंग असा शब्द एक वेळ ऐकिला तरी तो मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो; आणि लिंग ह्या शब्दाचा वारंवार उच्चार केला, तर प्राण्याचें जन्ममरण चुकतें; तो नामस्मरण करणारा मोक्षास जातो. (२४१) शिव असें कल्याणकारक नाम ज्याच्या तोंडांत नेहमीं राहत आहे ( जो शिवनामाचा ज-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्मीभवन्ति तस्याशु ध्रुवं पातककोटयः ॥२४१॥ शिवरहस्ये ॥ रुदुःखं दुःखहेतुर्वा तं द्रावयति नः प्रभुः ॥ रुद्र इत्युच्यते सद्भिः शिवतत्त्वार्थवेदिभिः ॥२४२॥ तात्पर्यसंग्रहे ॥ वृत्तम् ॥ हिंसाप्रथीतिरभिमानपदैकदेशशब्दादयस्तमिममेव समुद्वहन्ति ॥ कामांधकत्रिपुरदक्षमखादिभंगाद्विख्यातविक्रमतया कथितोऽसि वीर ॥२४३॥ कारणागमे ॥ उ शद्बोऽयमुमा साक्षात् घे शब्दस्तु महेश्वरः ॥ शिवशक्तिसमायोगे ह्युघे शब्दःप्रकीर्तितः ॥२४४॥ शिवधर्मे ॥ संपर्कात्कौतुकाल्लोभाद्भयाद्वा यश्शिवं स्मरेत् ॥ कीर्तयेदर्चयेद्वापि सोऽप्यवश्यं गणो भवेत् ॥२४५॥ यज्ञवैभवखण्डे ॥ हरिसत्यसन्धसंवादे ॥ न तस्य कारणं कार्यं वस्तुतो विद्यतेऽनघ ॥ न तत्समश्चाभ्यधिकश्चेतनो विद्यते क्वचित् ॥२४६॥मम ब्रह्मादिदेवानामपि साक्षाच्छिवाज्ञया ॥ भोगमोक्षप्रदः पुंसां

---

होदीत जप करितो), त्याचीं कोट्यावधि पातकें तत्काळ जळून भस्म होतात. (२४२) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, "रुत्" ह्या शब्दाचा अर्थ दुःख किंवा दुःखाचें कारण असा होतो; त्या दुःखास आणि दुःखाचे कारणास आमचा परमेश्वर पळवून लावितो, ह्मणून शिवतत्वार्थवेत्ते सज्जन लोक त्यास रुद्र ह्मणतात. (२४३) तात्पर्यसंग्रहांत ह्मटलें आहे कीं, हिंसेची प्रसिद्धि, अभिमान, आणि एकदेश वगैरे हे सारे शब्द त्या श्रीशंकरालाच लागू पडतात. कांतर शिवानें मदनास जाळलें, अंधकासुरास मारिलें, आणि त्रिपुरास जाळिले दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला. ह्यामुळें हा शिव मोठा पराक्रमी योद्धा आहे अशी त्रैलोक्यांत प्रसिद्धि झाली. (२४४) कारणागमांत ह्मटलें आहे कीं, "उ" हा शब्द प्रत्यक्ष पार्वतीवाचक आहे आणि "घे" हा शब्द महेश्वरवाचक आहे. अर्थात या दोन अक्षरांत त्या शिवशक्तीचा समायोग झाला आहे, असें सिद्ध झालें. ह्मणूनच शिवशक्तींच्या उत्सवाचे वेळीं जगांत समायोग "उघे" असा शब्द प्रसिद्धीस आला. (२४५) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं, जो कोंणी मनुष्य इष्टमित्रांच्या सहवासामुळें किंवा मौजेनें गमतीखातर किंवा लोभामुळें किंवा भीतीमुळें शिवनामाचें स्मरण करील, किंवा शिवनामाचा जप करील, किंवा श्रीशिवाची पूजा करील, तो निःसंशय शिवगण होईल. (२४६) यज्ञवैभवखंडांतल्या श्रीविष्णूच्या आणि सत्यसंधाच्या संवादांत विष्णूनें ह्मटलें आहे, राजा सत्यसंधा, तूं निष्पाप आहेस वास्तविक पाहूं लागलें तर त्या शंकराला कारणही लागत नाहीं व कार्यही लागत नाहीं. त्या शिवाची बरोबरी करणारा किंवा शिवापेक्षां जास्त योग्यतेचा प्राणी कोठेंही नाहीं. (२४७) हे निष्पाप स्वभावाच्या सत्यसंधा, मला ( श्रीविष्णूला ), किंवा ब्रह्मदेव, इंद्र, वगैरे सर्व लहानथोर देवांस, आणि प्राणिमात्रास शिवाच्या आज्ञेप्र-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रसादो जायतेऽनघ ॥२४७॥ मम ब्रह्मादिदेवानामपि तस्य प्रसादतः॥ विज्ञानादित्रयं तस्मात्स एव भवमोचकः ॥२४८॥ प्रसादो मुक्तिदस्साक्षाच्छिवात्सत्यादिलक्षणात् ॥ अंबिकासहितादस्मत्सर्वज्ञादेव नान्यथा ॥२४९॥ अतःपूर्णप्रसादाय सत्यसंध मम प्रिय ॥ महादेवं महात्मानं भज कारणिकोत्तमम् ॥२५०॥ महादेवं समाश्रित्य वांछितं नाप्नुयाद्यदि ॥ महादेवं महादेव कथमन्यं समाश्रयेत् ॥२५१॥ नामतश्चार्थतश्चापि महादेवो महेश्वरः ॥ तदन्ये केवलं देवा महादेवा इतेऽनघ ॥२५२॥ महादेवं विना यो मां भजते श्रद्धया सह ॥ नास्ति तस्य विनिर्मोक्षस्संसाराज्जन्मकोटिभिः ॥२५३॥ सर्वमुक्तं समासेन मम भक्तस्य तेऽनघ ॥ शिवादन्यं परित्यज्य शिवं सांबं सदा

---

माणेंच इहलोकीं सुखोपभोग आणि मरणानंतर मोक्षप्राप्ति करून देणारा प्रसाद होतो ( शिवप्रसादामुळेंच सर्व प्राणिमात्रांस ह्यालोकीं व परलोकीं सुख मिळतें ). (२४८) मला ( श्रीविष्णूला ), आणि ब्रह्मदेव वगैरे सर्व देवांला त्या श्रीशंकराच्या कृपेनेंच विज्ञान वगैरे तीन आत्महिताचीं साधनें मिळतात प्राणिमात्रास संसारांतून मुक्त करण्यास तो श्रीशंकरच समर्थ आहे. (२४९) श्रीशंकर हा सत्यस्वरूप आहे, तो पार्वतीचा पति आहे, तो आह्मां सर्वांपेक्षां ज्ञाता आहे, त्याला सर्वज्ञ ह्मणतात. त्या श्रीशिवाचा प्रसाद ( कृपा ) झाला तरच मोक्षप्राप्ति होईल; इतर लोकांच्या कृपेनें मोक्षप्राप्ति होत नाहीं. (२५०) ह्यासाठीं सत्यसंधा तूं माझा मित्र आहेस ह्मणून तुला मी सांगतों कीं, आपल्यावर पूर्ण प्रसाद व्हावा असें तुला वाटत असेल, तर सज्जन लोकांस सर्व प्रकारचीं सुखें प्राप्त करून देणाऱ्या व कार्य कारणांचा मुख्य असा श्रीशिवाची आराधना कर. (२५१) महादेवाचा आश्रय केला तरी देखील जर तुझ्या मनांतील हेतु पूर्ण होणार नाहीं, तर हे राजा, महादेवाखेरीज इतर देवांचें आराधन केलें, तर काय हेतु पूर्ण होणार आहेत? ह्यासाठीं तूं, आराधन करणें झालें तर महादेवाचेंच आराधन कर. (२५२) हे निष्पाप सत्यसंध राजा, तो महादेव नांवानें जसा महेश्वर आहे, तसाच अर्थानें ( वास्तविक रीतीनेंही ) महेश्वरच आहे; त्या महादेवाखेरीज इतर देवांस देव ह्मणतात महादेव कोणी ह्मणत नाहीं. ह्यासाठीं सर्व देवांत महादेवच श्रेष्ठ आहे असें समज. (२५३) जो कोणी मनुष्य महादेवास न भजतां, मलाच भक्तिभावानें भजत असेल त्यानें ह्या संसारांत कोट्यावधि जंन्म घेतले तरी संसारांतून त्याची सुटका होणार नाहीं. (२५४) हे सत्यसंध राजा, तूं माझा भक्त आहेस ह्मणून मी तुला थोडक्यांत सांगतों, तें हेंच कीं, तूं शिवाखे-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भज ॥२५४॥ सत्यसन्धो महाधीमान् महाविष्णोः प्रसादतः ॥ परित्यज्याखिलान् देवानाश्रितोभवदीश्वरम् ॥२५५॥ ईश्वरस्य प्रसादेन सत्यसन्धो महाद्विजः ॥ ज्ञानं वेदान्तजं लब्ध्वा विमुक्तो भवबन्धनात् ॥२५६॥ स्कांदे ॥ शिवरहस्ये ॥ अणिमा महिमा प्राप्तिः प्राकाम्यं लाघवं तथा ॥ ईशित्वं च वशित्वं च यत्र कामावशायिताः (वशंगताः) ॥२५७॥ हतपत्यश्वमातंगे रुधिरारुणभूतले ॥ संग्रामे विजयश्चापि प्राप्यते तत्प्रसादतः ॥२५८॥ मानवपुराणे ॥ अथो मुमुक्षुभिस्सर्वैः सांबः-सर्वेश्वराव्हयः ॥ परतत्वविशेषेण ध्येय एव सदा हृदि ॥२५९॥ ज्ञानयोगखण्डे ॥ ध्येयभेदेन सोऽप्येव मुत्तमाधमभेदतः ॥ द्विविधस्तत्र देवस्य शिवस्य ध्यानमुत्तमम् ॥ विष्णवादीनां तु देवानां ध्यानं चाधममिष्यते ॥२६०॥ मानवपुराणे ॥ तस्य शेषतया ध्येया ब्रह्मविष्ण्वादिदेवताः ॥ कदाचि-

---

रीज इतर देवांस सोडून दे; आणि त्या शिवपार्वतीचें नेहमीं आराधन कर. (२५५) सत्यसंधही मोठा विद्वान् होता. त्याला श्रीविष्णूचे कृपेनें शिवाचें यथार्थ ज्ञान झाल्यावर, त्यानें विष्णूचे सांगण्याप्रमाणें सर्व देवांस सोडून शिवाचेंच आराधन केलें; आणि त्यामुळें तो शिवस्वरूप झाला. (२५६) श्रीशंकराच्या कृपेनें त्या ब्राह्मणश्रेष्ठ सत्यसंधाला वेदांतशास्त्रांतील ज्ञान होऊन, तो संसारसमुद्रांतून मुक्त झाला. (२५७) स्कंदपुराणांत शिवरहस्यांत म्हटलें आहे कीं, जो मनुष्य शिवभक्त आहे, त्याला अणिमा, महिमा, प्राप्ति, प्राकाम्य, लाघव, गरिमा, ईशित्व, आणि वशित्व, ह्या आठ प्रकारच्या सिद्धि आपोआप अनुकूल होतात. (२५८) ज्या भयंकर युद्धांत हजारो पायदळ, घोडे, आणि हत्ती मेल्यामुळें त्यांच्या रक्तानें जमीन जिकडे तिकडे लालभडक दिसत आहे, अशा युद्धांत देखील शिवाच्या कृपेनें शिवभक्तास जय मिळतो. (२५९) मानवपुराणांत म्हटलें आहे कीं, मग मोक्षास जाऊं इच्छिणाऱ्या सर्व लोकांनीं सर्वेश्वर नांव असणाऱ्या श्रीपार्वतीपति शंकराचेंच ध्यान करावें. विशेषतत्वाचा विचार केला तरी त्या शंकराचेंच मनांत ध्यान करावें असें ठरतें. (२६०) ज्ञानयोगखण्डांत म्हटलें आहे कीं, ध्यान करण्याला कोणता देव उत्तम आहे? उत्तम कोण? मध्यम कोण? आणि अधम कोण? ह्याचा विचार केला तर तो सदाशिवच ध्यान करण्यास योग्य आहे असें ठरतें. त्या ध्यानापैकीं शिवध्यानाचे दोन प्रकार असून शिवाचें ध्यान करणें फार उत्तम आहे. विष्णु वगैरे देवांचें ध्यान अधम मानलें आहे. (२६१) मानवपुराणांत म्हटलें आहे कीं, शिवाचें ध्यान करून मग वेळ जर उरला, तर विष्णु वगैरे देवांचें ध्यान करावें. मुख्य देव विष्णुच आहे अशा समजुतीनें कधींही

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दपि मोहाद्वै सुप्रधानतया न हि ॥ सर्वमन्यं परित्यज्य यजेदाथर्वणी श्रुतिः ॥२६१॥ अथर्वशिखोपनिषदि ॥ शिव एको ध्येयः शिवंकरः सर्वमन्यत्परित्यज्य समाप्ताथर्वणी श्रुतिः ॥ इत्यादि विष्णुवाक्यप्रमाणादपि विष्णोर्गुरुश्च कर्ता च शिवस्सोऽपि विष्णुस्तस्य शिवस्य शिष्यश्च स किंकरश्च ॥२६२॥ स्कान्दे ॥ प्रणामदर्शनस्पर्शपूजाद्यैर्नियमेन यत् ॥ शिवलिंगस्य भजनं लिंगनिष्ठेति गीयते ॥२६३॥ कूर्मपुराणे ॥ तदेव परमं धाम सैवेह परमा गतिः ॥ सैवेह परमा काष्ठा लिंगनिष्ठा शिवस्य या ॥२६४॥ द्रष्टुं रूपांतरं तस्य ईक्षणे न विचक्षणे ॥ रसं यातस्य रसना हरनामाक्षरामृतम् ॥२६५॥ वृत्तम् ॥ प्रणाममीशस्य शिरः फलं विदुस्तदर्चनं पाणिफलं दिवौकसः ॥ मनःफलं तद्गुणतत्वचिंतनं वचःफलं देव-

---

ध्यान करूं नये. कां कीं बाकीचीं सर्व कामें आणि बाकीचे सर्व देव सोडून श्रीशिवाचेंच ध्यान करावें, असें अथर्वणवेद सांगतो. (२६२) अथर्वशिखोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, श्रीशिव हाच एक ध्यान करण्यास योग्य आहे, तो कल्याण करणारा आहे; बाकीचे सर्व देव सोडून त्या एका शिवाचेंच ध्यान करावें. असें सांगून अथर्वणवेद आपणास आतां सांगावयासारखें कांहीं राहिलें नाहीं ह्मणून समाप्त झाला. इत्यादिक अथर्वशीर्षांतील वचनांवरून, आणि स्वतः विष्णूनें मजपेक्षां श्रीशंकर श्रेष्ठ आहे असें सांगितल्यावरून, श्रीशंकर हा विष्णूचा गुरु आणि कर्ता आहे, श्रीविष्णु त्या शिवाचा शिष्य आणि दास आहे, हें उघड झालें. (२६३) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवलिंगाला नमस्कार करणें, शिवलिंगाचें दर्शन घेणें, शिवलिंगास स्पर्श करणें आणि शिवलिंगाची पूजा करणें, वगैरे शिवलिंगाच्या भजनाचे जे प्रकार आहेत, त्यास लिंगनिष्ठा असें ह्मणतात. (२६४) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवाच्या लिंगावर एकाग्रमनानें विश्वास ठेवणें, हाच उत्तम प्रकारचा मोक्ष आहे, हीच उत्तम प्रकारची गति आहे, हीच उत्तम प्रकारची तपश्चर्या आहे. शिवलिंगावर निष्ठा ठेविली ह्मणजे सर्व प्रकारचीं सत्कृत्यें केलीं असें होतें. (२६५) शिवभक्तानें आपल्या डोळ्यानें त्या श्रीशंकराचेंच स्वरूप पहावें. दुसरें कोणाचेंही स्वरूप पाहूं नये; जिभेनें रस चाखणें झालें तर शिवनामामृताचाच रस चाखावा, दुसरे रस चाखूं नयेत. (२६६) श्रीशिवाला नमन करणें हेंच मस्तकाचें सार्थक आहे, असें देव ह्मणतात. शिवपूजन करणें हाच हाताचा उपयोग आहे; शिवगुणांचा यथार्थ रीतीनें विचार करणें, हेंच मनाचें सार्थक आहे; आणि नेहमीं शिवनामाचा जप करणें हेंच वाचेचें फळ आहे. (मनुष्यानें शिवाला मस्तक लववून नमस्कार करावा. हातानें पूजा करावी. मनानें नेहमीं शिवमाहात्म्याचा विचार करावा. आणि तोंडानें नेहमीं शिवना-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कथास्तवानि च ॥२६६॥ वासिष्ठे ॥ भृंगभावनया यद्वत्कीट एव हि जायते ॥ शिवभावाभियोगेन तद्वदेव भवेत्पुमान् ॥२६७॥ कामिकागमे ॥ ज्योतीरूपं शिवं पूर्णं विश्वतेजोतिवर्तिनम् ॥ असंशयं भाषयंस्तं भावयंस्तन्मयो भवेत् ॥२६८॥ यथाग्निनियतं बाढं काष्ठं गच्छेत्तदात्मताम् ॥ शिवभावातिनिर्धूतः शिवभावात्स्वयं शिवः ॥२६९॥ स्कान्दे ॥ लिंगे प्राणं समाधाय प्राणे लिंगं तु शांभवम् ॥ सशरीरं मनः कृत्वा न किंचिच्चिंतयेद्यदि ॥२७०॥ साभ्यन्तरा भक्तिरिति प्रोच्यते शिवयोगिभिः ॥ सा यस्मिन् वर्तते तस्य जीवनं भ्रष्टबीजवत् ॥२७१॥ शिवरहस्ये ॥ अष्टविधार्चनं कुर्यादिष्टलिंगस्य पूजनम् ॥ तल्लिंगं मनुते यस्तु प्राणलिंगस्य पूजनम् ॥२७२॥ मनोलयो निरंजन्ये भावलिंगस्य पूजनम् ॥ एतल्लिंगार्चनं ज्ञात्वा विशेषं शृणु पार्वति ॥२७३॥ वासिष्ठे ॥ गर्जामि शि-

---

माचा जप करावा). (२६७) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, भुंग्यानें आपल्या घरांत आणून ठेविलेला किडा जसा कांहीं दिवसांनीं भुंग्याच्या धाकामुळें भुंगाच होतो; तसा मनुष्य नेहमीं शिवस्वरूपचिंतनांत निमग्न होईल, तर कांहीं दिवसांनीं शिवच होईल. (२६८) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं, शिव हा तेजोमय आहे, तो परिपूर्ण आहे, त्रैलोक्यांत जितके तेजस्वी पदार्थ ह्मणून आहेत त्या सर्वांपेक्षां तो जास्त तेजस्वी आहे; त्या शिवाबरोबर जो कोणी भाषण करील, किंवा त्या शिवस्वरूपाचें जो यथार्थ रीतीनें चिंतन करील, तो शिवच होईल ह्यांत शंका नाहीं. (२६९) जसें विस्तवांत घातलेलें लांकूड खरोखर विस्तवच होतें, त्याप्रमाणें नेहमीं शिवचिंतन करण्यांत गढून गेलेला मनुष्य निष्पाप होऊन त्यामुळें शिवस्वरूपच होतो. (२७०) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, लिंगावर प्राण ठेवावा, आणि प्राणाचे जागीं शिवलिंग करावें; आणि शरीराकडे कांहींएक लक्ष्य न देतां, मनानें नेहमीं शिवलिंगाचेंच चिंतन करावें. (२७१) शिवयोगी लोकांनीं त्या भक्तीला अभ्यंतरभक्ति असें ह्मटलें आहे; ती भक्ति ज्या मनुष्याचे अंगीं आहे, त्या मनुष्याचें आयुष्य भाजलेल्या बियांसारखें आहे. ह्मणजे भाजलेल्या बीजापासून जसा पुनः मोड फुटत नाहीं, तसा अभ्यंतरभक्ति करणारा मनुष्य पुनः जन्मास येत नाहीं; मरणानंतर तो मुक्त होतो. (२७२) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, इष्टलिंगाचें आठ प्रकारांनीं पूजन करावें, त्या लिंगाला मानणें, हें प्राणलिंगाचें पूजन होय. (२७३) निरंजनलिंगामध्यें मनाचा लय होणें, हें भावलिंगाचें पूजन होय. शिव ह्मणतात– हे पार्वती, हें लिंगपूजन तूं नीट समजून घे. आतां त्यांत विशेष काय आहे तें सांगतों, तूं ऐकून घे. (२७४) वासि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व नृत्यामि संपूर्णो वा मनोरथः ॥ स्वामिन् मम घटेस्त्वं हि चास्तुवं चातिरोचनः ॥२७४॥ वृत्तम् ॥ यत्रैव यत्रैव तव स्वरूपं तत्रैव तत्रैव मनो मदीयम् ॥ यत्रैव यत्रैव तवैव पादौ तत्रैव तत्रैव शिरो मदीयम् ॥२७५॥ वातुले ॥ लिंगभक्तिर्लिंगपूजा लिंगधारणमेव च ॥ लिंगप्रसादस्वीकारो लिंगश्रवणमादरात् ॥ लिंगध्यानं लिंगमनः सर्वलिंगमयं जगत् ॥२७६॥ मुण्डकोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति न तत्स्याद्ब्रह्मवित्कुले भवति तरति शोकं तरति पाप्मावगृहग्रंथिभ्यो विमुक्तो अमृतो भवति ॥२७७॥ म्लेंच्छोऽपि वा यदि भवेद्भवभक्तिसमन्वितः ॥ न तत्समश्चतुर्वेदी नाग्निष्टोमादियज्ञकृत् ॥२७८॥ सिद्धान्तशेखरे ॥ यो दीक्षितस्तु श्राद्धादौ स्वपूर्वविधिमाचरेत् ॥ तस्य तन्निष्फलं सर्वं समये न च लंघ्यते ॥२७९॥ शिवधर्मे ॥ अग्निदग्धो

---

छांत झटलें आहे कीं, हे शिवा, मी आतां मोठ्यानें गर्जना करितों, मी आतां आनंदानें नाचतों, माझ्या मनांतील सर्व हेतु परिपूर्ण झाले. हे परमेश्वरा, तूं मला मिळालास, मी तुझी स्तुति करितों, तूं मला फार आवडतोस. (२७५) हे परमेश्वरा, जेथें जेथें तुझें स्वरूप असेल, तेथें तेथेंच माझें मन असो. ( माझें मन तुझ्या स्वरूपाकडे असो ). जेथें जेथें तुझे पाय असतील तेथें तेथें माझें मस्तक असो. ( तुझ्या पायावर माझें मस्तक असो). (२७६) वातुलांत झटलें आहे कीं, मनुष्यानें लिंगाची भक्ति करावी, लिंगाची पूजा करावी, तसेंच लिंगधारणही करावें, लिंगाचा प्रसाद घ्यावा, आवडीनें लिंगाचे गुणानुवाद ऐकावें, लिंगाचें ध्यान करावें, लिंगाकडे मन लावावें, व सर्व जग लिंगमय आहे, असें जाणावें. (२७७) मुण्डकोपनिषदांत झटलें आहे कीं, वेद, तो परमेश्वर श्रीशिव जो आहे, तो परमेश्वरच ब्रम्ह आहे; तें ब्रह्म जो जाणतो तो स्वतः ब्रह्मच होतो; तसें कदाचित् झालें नाहीं, तरी तो ब्रह्मवेत्यांच्या कुळांत जन्मतो; तो शोकमुक्त होतो; तो पातक, संकटें, आणि अनेक प्रकारच्या अडचणी, ह्यांतून मुक्त होतो, व अज्ञानापासून मुक्त होतो; तो उद्धरून जातो; व मोक्षास जातो. (२७८) कोणी एखादा मनुष्य अगदीं नीचकुळांत जन्मलेला असला तरी तो जर शिवभक्ति करीत असेल, तर त्याची बरोबरी, चार वेद जाणणारा आणि अग्निष्टोमादिक यज्ञ करणारा ब्राह्मण देखील करूं शकत नाहीं; तो म्लेंच्छ असला तरी ब्राह्मणापेक्षां श्रेष्ठ आहे. (२७९) सिद्धांतशेखरांत झटलें आहे कीं, जो कोणी दीक्षित श्राद्धाचे दिवशीं श्राद्धाचे वेळेपूर्वींच आपले सर्व विधि करून घेतो, त्याचें तें सर्व कर्म निष्फळ होतें. ह्यासाठीं वेळेचें उल्लंघन करूं नये. (२८०) शिवधर्मांत झटलें आहे कीं, जरी एखादी मातीची भाजलेली घागर पुनः कच्च्या माती-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

घटो यद्वन्न भूयो मृत्तिकायते ॥ स शिवाचारसंगेन न पुनर्मानुषो भवेत् ॥२८०॥ वातुलतंत्रे ॥ इंधनं वन्हिसंपर्काद्वृक्षनाम विनश्यति ॥ शिवसंस्कारसम्पन्ने जातिभेदं न कारयेत् ॥२८१॥ आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम्॥ शिवसंस्कारसंपन्ने जातिभेदं न कारयेत् ॥२८२॥ ग्रामस्य मलिनं तोयं नदीनां च पवित्रकम् ॥ शिवसंस्कारसम्पन्ने जातिभेदं न कारयेत् ॥२८३॥ लैंगे ॥ नगरीनिर्झराद्यम्भो गंगां प्राप्य यथैकताम् ॥ दीक्षायोगात्तवेषश्च शूद्रादिश्शिवतां व्रजेत् ॥२८४॥ कांचनं रजतं ताम्रं लोहं चेति चतुष्टयम् ॥ यद्वदेति सुवर्णत्वं रसभेदप्रभावतः ॥२८५॥ तद्वच्छूद्रादिपात्रं हि शिवमंत्रात्मकेन तु ॥ विद्धद्रसेन महता परब्रह्मत्वमेत्यलम् ॥२८६॥ शिवसंस्कारसंपन्नो ह्ययं शूद्रो ह्ययं द्विजः॥

---

सारखी होत नाहीं, त्याप्रमाणें शिवधर्माप्रमाणें आचरण करणारा मनुष्य इतर मनुष्यासारखा होत नाहीं. (२८१) वातुलतन्त्रांत म्हटलें आहे कीं, लांकूड विस्तवांत जळून गेलें, म्हणजे तें कोणत्या झाडाचें होतें हें सांगतां येत नाहीं; त्याप्रमाणें शिवधर्माचार यथार्थ रीतीनें पाळणाऱ्या मनुष्याचे जातिधर्म पाहण्याचें कारण नाहीं. (२८२) आकाशांतून खालीं जमिनीवर पडलेलें पाणी समुद्रास जाऊन मिळतें; त्याप्रमाणें शिवधर्माचार यथाविधीनें पाळणाऱ्या मनुष्याचे जातिभेद वगैरे पाहण्याचें कांहीं कारण नाहीं. (२८३) गांवाजवळील नाल्यांतील पाणी दुर्गंधियुक्त असतें, व नदीचें पाणी स्वच्छ आणि पवित्र असतें. त्याप्रमाणें शिवधर्माचार यथाविधीनें पाळणारा मनुष्य पूर्वीचा अतिशय पातकी असला, तरी शिवधर्म पाळूं लागल्यापासून अतिशय शुद्ध होतो. त्याच्या पूर्वीच्या जातीकडे पाहण्याचें कारण नाहीं. ( जातिभेद करूं नये ). (२८४) लिंगपुराणांत म्हटलें आहे कीं, गांवाजवळील ओहळाचें पाणी जरी अतिशय मळकट आणि दुर्गंधियुक्त असें असलें, तरी तें गंगानदींत जाऊन मिळालें म्हणजे शुद्ध होऊन जातें; त्याप्रमाणें एकवेळ मनुष्यानें शिवदीक्षा घेतली म्हणजे त्या वेषामुळें तो जातीचा शूद्र असो, किंवा कोणीही असो, तो शिवस्वरूप पावतो. (२८५) सोनें, रुपें, तांबें आणि लोखंड ह्या चार धातूंस कांहीं विशेष प्रकारचे रस आहेत ते लाविल्यानें ते जसें सोनेंच होतात; (२८६) त्याप्रमाणें शूद्र जातीचा मनुष्य असला तरी त्यास शिवमंत्राचा संस्कार झाल्यानें, आणि उत्तम प्रकारचा शिवविद्येचा रस लागल्यानें, तो परब्रह्मस्वरूपच होऊन जातो. ह्यापेक्षां फार काय सांगावयाचें आहे? म्हणून इतकेंच पुरें. (२८७) जो मनुष्य शिवधर्माचार यथाविधीनें पाळतो, त्याचा जो कोणी हा शूद्रजातीचा आहे हा ब्राह्मणजातीचा आहे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

लिंगभेदकृतो येन रौरवं नरकं व्रजेत् ॥२८७॥ स्कान्दे ॥ प्राग्देशजाति नामानि यः पठेत्कथयेच्च सः ॥ प्रायश्चित्तक्रियानर्हः पतेत्समयशासनात् ॥२८८॥ लैंगे ॥ यस्य चित्तं शिवे लीनं तस्य जात्यादिकं स्मरन् शिवलिंगे शिलाबुद्धिं कुर्वाणः पातकी भवेत् ॥२८९॥ शैवपुराणे ॥ शिवदीक्षाभिजातस्य पूर्वजातिं न चिंतयेत् ॥ सुप्रतिष्ठितलिंगे हि न यथा पूर्वभावना ॥२९०॥ लैंगे ॥ दार्वश्मलोहमृद्रत्नजातं लिंगं प्रतिष्ठितम् यथा पूज्यं तथैव स्याद्भक्तश्चंडालवंशजः ॥२९१॥ शिवपुराणे ॥ स्त्री वाथ पुरुषः षंडश्चंडालो द्विजवंशजः ॥ न जातिभेदो लिंगार्चे सर्वे रुद्रगणाः स्मृताः ॥२९२॥ लैंगे ॥ स सर्ववेदी सर्वज्ञःसर्वयज्ञेषु दीक्षितः ॥ महापातककोटिघ्नः श्वपचो लिंगपूजकः ॥ तत्संभाषणतो मुक्ति

---

असा जातिभेद करितो; तो जातिभेद करणारा मनुष्य रौरवनरकास जातो. (२८७) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य शिवधर्माचार पाळूं लागल्यावर पूर्वीचा देश, पूर्वीची जाति, आणि पूर्वीचें नांव तोंडानें उच्चारील, किंवा दुसऱ्यास सांगेल, तो प्रायःश्चित्त घेण्यालाही अपात्र आहे; त्याला शास्त्राचा दंड आहे.(२८८) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, ज्याचें मन शिवाचे ठिकाणीं लीन आहे, त्याची जात वगैरे मनांत आणणारा मनुष्य, आणि शिवलिंग हें फक्त दगड आहे परमेश्वर नव्हे अशी कल्पना करणारा मनुष्य पातकी होतो. (२९०) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं जसें शिवलिंगाची प्रतिष्ठा केल्यानंतर, त्या शिवलिंगाच्या ठिकाणीं पूर्वीची भावना (दगड अशी भावना) करीत नाहींत; त्याप्रमाणें ज्यानें शिवदीक्षा घेतलेली आहे त्या मनुष्याची पूर्वीची जाति मनांत आणूं नये. (२९१) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, लांकूड, धोंडा, लोखंड, माती किंवा रत्नें ह्यांनीं तयार करून स्थापन केलेलें शिवलिंग जसें पूजा करण्यास योग्य आहे; त्याप्रमाणें शिवभक्त हा शिवदीक्षा घेण्यापूर्वी चांडालवंशांत जन्मलेला असला, तरी तो पूज्यच आहे. कारण त्यानें शिवदीक्षा घेतल्यामुळें व तो शिवभक्ति करीत असल्यामुळें, त्याच्या पूर्वजातीकडे लक्ष देण्याचें कारणच राहत नाहीं. (२९२) शिवपुराणांत ह्मटलें आहे कीं, बायको असो, पुरुष असो, नपुंसक असो, चांडाल जातींत जन्मलेला असो, किंवा ब्राह्मणकुळांत जन्मलेला असो, त्याचे जातीविषयीं विचार मुळींच करूं नये. लिंगपूजेच्यावेळीं ते सर्व शिवगण सारख्या योग्यतेचे आहेत असें समजावें. (२९३) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी लिंगपूजा करितो, तो जातीचा चांडाल असला, किंवा कोटि प्रकारचीं पंचमहापातकें करणारा असला, तरी तो सर्व वेद जाणणाऱ्याप्रमाणें, सर्वज्ञाप्रमाणें, आणि दीक्षिताप्रमाणें पूज्य आहे असें समजावें. त्याच्याशीं संभाषण केलें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गणमुख्यं सुखं भवेत् ॥२९३॥ भृगुसंहितायाम् ॥ सदा सन्निहितश्चैव चंडालो नैव सर्वदा ॥ गतं शूद्रस्य शूद्रत्वमन्यथा ब्राह्मणस्य तु ॥शिवसंस्कारसम्पन्ने जातिभेदो न विद्यते ॥२९४॥ स्कान्दे ॥ श्वपचोऽपि मुनिश्रेष्ठाः शिवभक्त्या द्विजाधिकः ॥ शिवभक्तिविहीनश्च द्विजोऽपि श्वपचाधमः ॥२९५॥ वायवीयसंहितायाम् ॥ चतुर्वेदधरो विप्रःशिवभक्तिविवर्जितः ॥ भवी तेनैव संभाष्यश्चंडालाधम उच्यते ॥ शिवसंस्कारहीनस्तु द्विजोऽपि श्वपचाधमः ॥२९६॥ तत्रैव ॥ वदेत्तेन वसेत्तेन विशेत्तेन पुनःपुनः ॥ भुंजीत साकं भुंजीतेत्याह सामश्रुतिः खलु ॥२९७॥ जन्मना जायते शूद्रः कर्मणा द्विज उच्यते॥ वेदाभ्यासाद्भवेद्विप्रो ब्रह्मा चरति ब्राह्मणः ॥२९८॥ अंत्यजातिर्द्विजातिर्वा एकयोनिसमुद्भवः॥सप्त-

---

असतां मोक्षप्राप्ति होते; तो मनुष्य शिवगणांत मुख्य होतो; व त्यास सुख लागतें. (२९४) भृगुसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य जातीनें चांडाल आहे, तरीपण नेहमीं शिवभक्ति करितो; तो चांडाल नव्हे, शूद्रजातीचा असला, तरी तो शूद्र नव्हे. एखादा ब्राम्हणजातीचा मनुष्य आहे खरा, परंतु तो जर शिवभक्ति करीत नसेल, तर तो मात्र शूद्रपणा पावतो. सारांश, जो मनुष्य शिवधर्माचार यथाविधीनें पाळतो, त्याला जातीभेदाचें कारण राहत नाहीं. (२९५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य जातीचा वास्तविक चांडाल आहे, परंतु जो शिवभक्ति करीत आहे; तो ब्राम्हणापेक्षां देखील श्रेष्ठ आहे. जो मनुष्य जातीचा ब्राह्मण आहे खरा, परंतु जे शिवभक्ति करीत नाहीं; तो चांडालापेक्षां देखील नीच आहे. (२९६) वायवीयसंहितेंत ह्मटलें आहे कीं, ज्या ब्राम्हणानें चार वेद अगदीं मुखोद्गत (तोंडपाठ) केले आहेत, परंतु जो शिवभक्ति करीत नाहीं; त्यास भवि (जन्ममरणाचे चक्रांत फिरणारा) ह्मणावें. त्याचेबरोबर बोललें तरी मनुष्य पातकी होतो. शिवदीक्षा न घेतलेला मनुष्य ब्राह्मण असला, तरी चांडाळाहूनही नीच आहे असें समजावें.(२९७) तेथेंच आणखी असेंही सांगितलें आहे कीं, जो मनुष्य जातीनें चांडाळ आहे खरा, परंतु शिवभक्त आहे, त्यावरोबर बोलावें, त्यावरोबर बसावें, उठावें; त्यावरोबर सुखसमाधानाच्या गोष्टी बोलाव्या, त्याचेबरोबर जेवावें, खावें असें सामवेद सांगतो. (२९८) जन्मामुळें मनुष्यास शूद्रपणा येतो, आणि त्यानें सत्कर्में केलीं ह्मणजे त्यास ब्राह्मण म्हणतात. त्यानें वेदाभ्यास केला ह्मणजे त्यास विप्र ह्मणतात; आणि जो ब्रह्म यथार्थ रीतीनें जाणतो त्यास ब्राह्मण ह्मणतात. (२९९) नीचजातींत जन्मलेला असो, किंवा उच्चजातींत जन्मलेला मनुष्य असो, दोघांसही योनींतूनच जन्मावें ला-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

धातुसमं पिंडं वर्णानां किं प्रयोजनम् ॥२९९॥ पंचभूतमयो देहो निद्राहारश्च मैथुनम् ॥ भयमोहौ समं ज्ञात्वा जातिभेदं न कारयेत् ॥३००॥ पृथिव्यादिकमेवाण्डमस्मिन्नण्डे हि जायते ॥ चराचरं च त्रैलोक्यमेकयोनिसहोदरम् ॥३०१॥ एकपीठं जगत्सर्वमेकमाकाशमालयम् ॥ तोयमेकं सदा पीत्वा जातिभेदं न कारयेत् ॥३०२॥ वृत्तम् ॥ मृत्पिण्डमेकं तदनेकरूपं गोक्षीरमेकं बहुवर्णधेनुः ॥ सुवर्णमेकं बहुभूषणं च शरीरभिन्नं परमात्मचैकम् ॥३०३॥ पंके पंकजमत्र मृत्सु कनकं शुक्तौ तु मुक्तावलिः कीटे कोमलपट्टसूत्रममलं कस्तूरिका किं मृगात् ॥ काष्ठादग्निसुसंभवश्च पललाद्गोक्षीरगोरोचने तज्जन्यादिमहानुभावगुणिनः

---

गतें; दोघांचेंही शरीर सात धातूंचेंच आहे, कोणताही कमजास्तीपणा नाहीं; मग जातीचें काय कारण आहे? समजत नाहीं. (३००) उच्चजातीचा मनुष्य असो किंवा नीचजातीचा मनुष्य असो, त्या दोघांचेंही शरीर पंचभूतात्मक (पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें मिळून झालेलें) आहे. दोघांस झोंप, खाणेंपिणें, मैथुन, भीति, आणि अज्ञान हीं सारखीं आहेत, मग जातिभेद कशाकरितां करावा समजत नाहीं. (३०१) पृथिव्यादिक जें एक अंड आहे, त्या एका अंडापासूनच सकल चराचर जग उत्पन्न होतें. म्हणून हें स्थावरजंगमत्रैलोक्य एका योनीपासूनच जन्मलेलें असल्यामुळें तें एकमेकाचें भाऊ असल्यासारखें आहे. ( सर्वांची जन्माचे वेळेची आणि मरणाच्या वेळेची स्थिति अगदीं सारखी आहे; मग जातिभेदाचें कारण दिसत नाहीं ). (३०२) हें सर्व जग एकाच जमिनीवर राहतें त्या सर्वांचेवर एकच आकाश आहे, तें पाणी एकाच जातीचें पितें. ह्यामुळें वास्तविक रीतीनें पाहतां कोणास जातिभेद करण्याचें कारण दिसत नाहीं. (३०३) मातीचें ढेंकूळ एक आहे, त्याचीं अनेक प्रकारचीं चित्रें किंवा पात्रें करितां येतात; दूध एकसारखें पांढरेंच आहे, गाई मात्र अनेक रंगाच्या असतात; सोनें एकच आहे, परंतु त्याचे अनेक प्रकारचे अलंकार होतात; तसाच परमात्मा हा एकच आहे, शरीरें मात्र अनेक प्रकारचीं दिसतात. (३०४) चिखलांत कमल उगवतें, मातींत सोनें सांपडतें ( निघतें ), शिंपींत मोतीं उत्पन्न होतें, रेशमी किड्यापासून रेशीम निघून त्यापासून अनेकप्रकारचीं उंची उंची रेशमी वस्त्रें तयार होतात. कस्तूरीमृगापासून कस्तूरी उत्पन्न होते, लांकडापासूनच विस्तव निघतो, रक्तापासूनच दूध आणि गोरोचन उत्पन्न होतें, सारांश अतिशय उपयोगाचे मौल्यवान् पदार्थ जन्मास येतात त्यांचे उत्पत्तिस्थानांशीं आणि त्यांचे उपयोगाशीं कांहीं संबंध नाहीं. उत्पत्तिस्थान त्यांचे विशेष महत्वाचें नसलें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्राप्तस्य किं जन्मनाम् ॥३०४॥ लैंग्ये ॥ न लिंगी सर्वदानज्ञो यस्तु चंडालवद्भुवि ॥ लिंगार्चकस्तु श्वपचो द्विजकोट्या विशिष्यते॥३०५॥ शैवपुराणे ॥ यथा पंके सरोजं स्याद्यथा काष्ठे हुताशनः ॥ यथा स्वर्णं च पाषाणे भक्तश्चाण्डालवंशजः ॥३०६॥ वृत्तम् ॥ पुंसः स्वरूपविनिरूपणमेव कार्यं तज्जन्मदोषगुणभूमिकथा वृथैव ॥ कः कालकूटमभिनन्दति सागरोत्थं कोऽथारविंदमपि निंदति पंकजातम् ॥३०७॥ उत्पलस्यारविंदस्य मत्स्यस्य कमठस्य च ॥ एकयोनिप्रसूतानां तेषां गन्धः पृथक् पृथक् ॥३०८॥ वातुले ॥ माता गौरी पिता रुद्र ईश्वरः कुलमेव च ॥ बान्धवाः शिवभक्ताश्च स्वदेशो भुवनत्रयम् ॥३०९॥ ईश्वर उवाच ॥ मदाश्रमरतान् द्वेष्टि यस्स मां द्वेष्टि मांधव ॥ मदाश्रमरतान् स्तौति यस्स मां स्तौति निर्मलः ॥३१०॥ किंतु मे समयं कृत्वा हे नेत्रार्चक नान्यथा ॥ ये

---

ह्मणजे त्यांचे योग्यतेस कमीपणा येत नाहीं. (३०५) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, ज्या मनुष्यानें लिंगधारण केलेलें नाहीं, त्यानें अनेक प्रकारचीं दानें केलीं; तरी तो पृथ्वीवर चांडाळासारखा आहे, एखादा मनुष्य जातीचा चांडाळ जरी आहे, आणि तो शिवपूजा करणारा असला, तर तो कोटि ब्राह्मणांपेक्षां श्रेष्ठ आहे. (३०६) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं, जसें कमल चिखलांत उगवलें तरी तें सुंदरच आहे; जसा विस्तव लांकडांतून निघाला तरी तो पवित्रच आहे; जसें सोनें दगडांतून निघालें तरी तें पवित्रच आहे; तसा शिवभक्त चांडालाच्या कुलांत जन्मला तरी तो पवित्रच आहे. (३०७) मनुष्याचे अंगीं जे जे सद्गुण असतील त्यांचेच वारंवार वारंवार वर्णन करावें; तो मनुष्य कोठें जन्मला त्या ठिकाणचा उकिरडा उकरीत बसण्यांत (त्याच्या जन्मस्थानाच्या बरे वाईटपणाचा विचार करीत बसण्यांत) कांहीं अर्थ नाहीं. कालकूट विष हें समुद्रांतून निघालें, ह्मणून त्याची प्रशंसा कोण करील? आणि कमळ चिखलांत उगवलें, ह्मणून त्याची निंदा कोण करील? सांगा बरें. (३०८) चंद्रविकासीकमल, सूर्यविकासीकमळ, मासा आणि कासव हे एका पाण्यांतूनच जन्मले खरे, तरी त्यांचा वास आणि गुण वेगळा वेगळा आहे. (३०९) वातुलांत ह्मटलें आहे कीं, शिवभक्ताची पार्वती ही आई आहे, शंकर हा बाप आहे, आणि तोच ईश्वर वंश आहे, शिवभक्त हे बांधव आहेत, आणि त्रैलोक्य हें त्या शिवभक्ताचा देश आहे. (३१०) ईश्वर ह्मणतात--श्रीविष्णो, जो कोणी मनुष्य माझ्या भक्तांचा (शिवदीक्षा घेतलेल्या लोकांचा) द्वेष करितो, तो प्रत्यक्ष माझा द्वेष करितो; जो मनुष्य माझ्या भक्तांची स्तुति करितो, तो प्रत्यक्ष माझी स्तुति करितो; असें समज. (३११) श्रीविष्णो, तूं आपला डोळा कमळ म्हणून मला कमी पडलेल्या कमलाच्या ऐवजीं अर्पण केलास;

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

च तं पालयिष्यंति मद्भक्तास्ते विकल्मषाः ॥३११॥ ये चाप्युपहसिष्यं-
ति पाषंडास्ते जनार्दन ॥ संभाषणादपि हरे तेषां दोषो महान् नृणाम्
॥३१२॥ लैंग्ये ॥ विष्णुरुवाच ॥ अद्यप्रभृति शृण्वन्तु भ्रमन्तु मम घोषणम् ॥
सुवृत्तो दुर्विनीतो वा शिवभक्तः प्रभुर्मम ॥३१३॥ स्कान्दे ॥ शिवाश्रि-
तान्ये निंदन्ति मद्भक्तास्तेऽरयो मम ॥ जपहोमादिकं तेषां तत्सर्वं भस्म-
साद्भवेत् ॥३१४॥ येऽर्चयन्ति शिवे भक्तान् वाङ्मात्रेणापि मत्पराः ॥ म
त्प्रसादाद्गमिष्यन्ति ते हि स्थानमनुत्तमम् ॥३१५॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा वि-
ष्णोर्विष्णुपरायणाः ॥ उपासांचक्रिरे सर्वाञ्छिवभक्तान् सदैव तु ॥३१६॥
भोजनासनदानाद्यैः प्रणामस्तुतिपूर्वकैः ॥ भस्मदिग्धान् गृहस्थांश्च शि-
वनामस्मृतौ रतान् ॥३१७॥ एकादशानां रुद्राणां प्रीत्यर्थं गरुडध्वजः ॥
पक्षद्वयेऽपि सततं करोत्येकादशीव्रतम् ॥३१८॥ स्कान्दे ॥ शिवरहस्ये ॥

---

तुला मी खोटें सांगत नाहीं. जे लोक शिवधर्मांचा आश्रय करून इतर शिवधर्मा-नुयायी लोकांचें रक्षण करितात, ते माझे निस्सीम भक्त होत. त्यांचे अंगीं कोण-ताही दोष नाहीं. (३१२) हे जनार्दना, माझ्या भक्तांचा जे उपहास करितात, ते लोक नास्तिक होत; हे श्रीकृष्णा, त्या लोकांबरोबर जे कोणी बोलतील, त्या मनु-ष्यांस मोठें पाप लागेल. (३१३) लिंगपुराणांत स्वतः विष्णूनें ह्मटलें आहे कीं, हे लोकहो, तुह्मी माझें ह्मणणें ऐका, आणि माझा डांगोरा सर्व जगांत प्रसिद्ध करा. तो असा कीं, जो कोणी मनुष्य शिवाचा भक्त असेल, तो सदाचारी असो, किंवा दुराचारी असो, आजपासून तो शिवभक्त माझा ( विष्णूचा ) ईश्वर आहे असें समजा. (३१४) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जे कोणी माझे भक्त शिवाचा आश्रय कर-णाऱ्या शिवभक्तांची निंदा करितात, ते लोक माझे शत्रु होत; त्या लोकांनीं केलेलें जप, होम वगैरे सत्कर्म सर्व व्यर्थ आहे. त्याचें भस्म होईल त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. (३१५) जे लोक माझ्यावर ( विष्णूवर ) विश्वास ठेवितात, आणि शिवभक्त लोकांशीं गोड शब्दांनीं बोलतात. ते लोकही माझ्या कृपेनें उत्तम स्थानाला जाऊन पोंचतात. (३१६) त्या विष्णूचें तें बोलणें ऐकून विष्णूची मनापासून भक्ति करणारे लोक सर्व शिवभक्तांची नेहमीं मनापासून उपासना करूं लागले. (३१७) व ज्या लोकांनीं आपल्या अंगास भस्म लाविलें आहे, व जे गृहस्थाश्रम पाळून नेहमीं शिवनामस्मरण करण्यांत निमग्न असतात, अशा शिवभक्तांचा भोजन, आसन, दान, नमस्कार, स्तुति वगैरे करून सन्मान करूं लागले. (३१८) गरुडध्वज असा श्रीविष्णु अकरा रुद्राकरितां दर महिन्यांतील दोन पक्षांत एकादशी व्रत करितो. (३१९) स्कन्दपुराणांत

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न त्वं मृत्युर्न धाता वा न यमो यमदूतकः ॥ न चान्ये शिवभक्तानां भवन्ति प्रभविष्णवः ॥३१९॥ मार्कण्डेयपुराणे ॥ ब्रह्मादीनब्रवीद्देवान् भीतान् गंभीरया गिरा ॥ प्रजापते त्वं विष्णुर्वा शक्रो वान्ये सुरादयः ॥३२०॥ अज्ञानादथवा ज्ञानान्मद्भक्तेषु महात्मसु ॥ कुर्युश्चेदपराधं ते दण्ड्या वध्याश्च नित्यशः ॥३२१॥ अपिदुष्कृतकर्माणो पूज्या ह्येते मया भद्राः ॥ मम प्रिया हिते युक्ताः पालयध्वं हि मे वचः॥ अन्यथा भवतां नाशो मम नाशो भवेद्ध्रुवम् ॥३२२॥ दशरथरामवाक्यम् ॥ मुखे पंचाक्षरी यस्य फाले भस्म त्रिपुंड्रकम् ॥ चित्ते शिवानुसंधानं तस्य पादरजोऽस्म्यहम् ॥३२३॥ स्कान्दे ॥ तस्य तं तादृशं भावं दृष्ट्वा त्रैलोक्यवासिनः ॥ शिवे च शिवभक्ते च सर्वे स्थावरजंगमाः ॥३२४॥ विस्मयं परमं गत्वा शंकरं शरणं ययुः॥ संमानयन्तः सततं शिवभक्तान् यथोचितम् ॥३२५॥ अन्यथापि सुरारिघ्न गच्छन् तिष्ठन् स्वपन् हसन् ॥ भुंजानो

---

शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—श्रीविष्णो, तूं, मृत्यु, ब्रह्मदेव, यम, यमदूत किंवा आणखी दुसरे कोणी जे आपणांस सर्वांपेक्षां अतिशय बलिष्ठ ह्मणवितात; त्यांची शिवभक्तांपुढें कांहीं मात्रा चालत नाहीं. (३२०) मार्कण्डेयपुराणांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव वगैरे सर्व देव अगदीं घाबरून गेले. त्यांस गंभीरशब्दानें ह्मणाले, ब्रह्मदेवा, तूं किंवा विष्णु किंवा इंद्र किंवा दुसरे आणखी जे कोणी देव (३२१) न कळत किंवा मुद्दाम माझ्या मोठ्या मनाच्या भक्तांचे अपराध करतील; ते नेहमीं जिवें मारण्यास किंवा पाहिजे तशी कडक शिक्षा करण्यास पात्र होतील. (३२२) ह्या माझ्या पराक्रमी योद्ध्यांनीं कितीहीं पातकें केलीं असलीं तरी ते मला पूज्यच आहेत. ते माझे जिवलग स्नेही आहेत, ते माझ्या कल्याणाकरितां नेहमीं तत्पर असतात. हें माझें सांगणें तुम्ही नीट लक्ष्यांत धरा; नाहींपेक्षां तुमचा नाश करण्यास ते चुकणार नाहींत. मग माझ्याकडे कांहींएक राहिलें नाहीं. (३२३) दशरथाचें आणि रामाचें बोलणें झालें त्यांत ह्मटलें आहे कीं, ज्या मनुष्याचे तोंडीं शिवपंचाक्षरीमंत्र आहे, कपाळाला भस्माचें त्रिपुण्ड्र आहे, आणि मनांत नेहमीं शिवतत्वचिंतनाचा विचार चाललेला आहे त्या शिवभक्ताच्या पायधूलीसारखा मी आहे. (३२४) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, त्याचा तो त्या प्रकारचा भाव पाहून त्रैलोक्यांत राहणारे सर्व स्थावरजंगम प्राणी (३२५) शिवाविषयीं आणि शिवभक्तांविषयीं फार आश्चर्य पावून श्रीशंकरास शरण गेले आणि नेहमीं शिवभक्तांविषयीं मनांत आदरबुद्धि ठेवून त्यांचेबरोबर सन्मानानें वागूं लागले. (३२६) हे दैत्यांचा नाश करणाऱ्या इंद्रा, ह्यासाठीं प्राणिमात्रानें जातांना, येतांना, झोंप घेतांना, हंसतांना,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मैथुनासक्तः शिवमेवान्वचिंतयेत् ॥३२६॥ वायवीयसंहितायाम् ॥ नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि ॥ अवश्यमनुभोक्तव्यं कृतं कर्म शुभाशुभम् ॥३२७॥ कृत्वा तु सुमहत्पुण्यमिष्टयज्ञशतैरपि ॥ न तत्फलसवाप्नोति भक्तिहीनो यदीश्वरे ॥३२८॥ ईश्वर उवाच ॥ मामनादृत्य पुण्यं वा पापं स्यात्प्रतिपादिना ॥ मन्निमित्तं कृतं पापं पुण्यं तदपि जायते ॥३२९॥ ब्रह्मगीतायाम् ॥ विष्णुभक्त्या च मद्भक्त्या नास्ति नास्ति परा गतिः ॥ शंभुभक्त्यैव सर्वेषां सत्यमेव मयोदितम् ॥३३०॥ दधीचिरुवाच ॥ यस्स्रष्टा चैव संहर्ता भर्ता यः परमेश्वरः ॥ तस्मादन्यं न पश्यामि शंकरादपरं प्रभुम् ॥३३१॥ लैंग्ये ॥ तस्मान्नावेदनिर्दिष्टं न चेश्वरबहिष्कृतम् ॥ असद्भिः संग्रहीतं च कर्म कुर्यात् कदाचन ॥३३२॥ वासिष्ठे॥ अज्ञस्याल्पबुद्धस्य सर्वं ब्रह्मेति यो वदेत् ॥ महानरकजालेषु स तेन विनियोजितः ॥३३३॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ सर्वेषामेव भावानामात्मा

---

जेवतांना, व मैथुनांत असतांना नेहमीं शिवाचेंच चिंतन करावें. (३२७) वायवीयसंहितेंत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें केलेलें कर्म कोट्यावधि जन्म घेतले तरी तें भोगल्याखेरीज सुटावयाचें नाहीं. मनुष्यानें जें कांहीं बरें वाईट काम केलें असेल, त्याचें फळ भोगलेंच पाहिजे. (३२८) मनुष्यानें शेंकडों यज्ञ करून पाहिजे तितका पुण्यसंग्रह केला, तरी तो जर शिवाची भक्ति करणारा नसला तर त्या मनुष्याला त्या यज्ञांचा कांहींएक उपयोग नाहीं. (३२९) ईश्वर ह्मणतात— माझा तिरस्कार करून माझ्याशीं स्पर्धा करणाऱ्या मनुष्यानें पुण्य केलें तरी तें पाप केल्यासारखेंच आहे, माझ्यानिमित्त कोणीं पापकर्म केलें तर तें पुण्य केल्यासारखेंच आहे. (३३०) ब्रह्मगीतेंत ब्रह्मदेवांनीं ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें माझी भक्ति केली तरी त्यास मोक्षप्राप्ति होत नाहीं; व श्रीविष्णूची भक्ति केली तरी त्यास मोक्षप्राप्ति होत नाहीं. मोक्षप्राप्ति होण्यासाठीं सर्वांनीं शिवाचीच भक्ति केली पाहिजे. हें मीं अगदीं खरें सांगितलें. (३३१) दधीचि ह्मणाला, जो परमेश्वर श्रीशंकर सर्व जगाला उत्पन्न करितो, सर्व जगाचा संहार करितो, आणि सर्व जगाचें रक्षणही करितो, त्या परमेश्वर श्रीशंकराखेरीज मी दुसरा देव मानीत नाहीं. (३३२) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, ह्यासाठीं मनुष्यानें वेदानें निषिद्ध केलेलें, परमेश्वरास संमत नसणारें, व दुर्जन मनुष्यांनीं मान्य केलेलें (त्यांच्या आवडीचें), कोणतेंही कर्म कधींही करूं नये. (३३३) वासिष्ठांत सांगितलें आहे कीं, जो जीवात्मा अतिशय अज्ञान आहे, ज्याचें ज्ञान फारच कमी आहे; त्या जीवात्म्याला जो कोणी हें सर्व ब्रह्मच आहे असें मानतो, तो आपले आपणास भयंकर नरकांत पाडून घेतो असें ह्मटलें पाहिजे. (३३४) अचिं-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्वेश्वरो हरः ॥ सति तस्मिन्नविज्ञाते किमद्वैतं भवेदहो ॥३३४॥ एवमेव सदा रुद्रो न द्वितीयोऽस्ति कश्चन ॥ एतदद्वैतविज्ञानमन्यद्व्यर्थमुदाहृतम् ॥३३५॥ शिवधर्मपुराणे ॥ अरूपे भावना नास्ति यद्दृश्यं तद्विनश्यति ॥ दृश्यादृश्यस्वरूपं यत्सदा सेवेत्सदाभ्यसेत् ॥३३६॥ वीरागमे ॥ न क्रियारहितं ज्ञानं न ज्ञानरहिता क्रिया ॥ न पश्यन्नंधको दग्धः पश्यन् द्रुतिपंगुलः ॥३३७॥ मंत्रोपनिषदि ॥ आत्मनां पारतंत्र्यं ईश्वरस्य अपारतंत्र्यं मंत्रोपनिषदि श्रूयते ज्ञाने द्वावजावनीशावात्माप्यनीशः सुखदुःखहेतुर्यः कारणानि निखिलानि कालात्मयुक्तान्यधीशस्तिष्ठत्येकः ॥३३८॥ अयमेव परो धर्मश्चीर्णमेतत्परं तपः ॥ इदमेवाखिलं ज्ञानं पूज्यते यत्सदाशिवः ॥३३९॥ किं वेदैः किं ततः शास्त्रैः किं तपोभिरथ व्र-

---

सर्वविश्वसादाख्य ग्रन्थांत सांगितलें आहे कीं, जितकें कांहीं जाणावयाचें म्हणून आहे त्या सर्वांचें परमेश्वर श्रीशंकर हा मूल आहे; त्या शंकराला जर यथार्थ रीतीनें जाणलें नाहीं, तर अद्वैतशास्त्र तें काय झालें? (३३५) श्रीशंकर हाच कायतो एक मुख्य परमेश्वर आहे, दुसरा कोणी नाहीं. हें पुरतेपणीं समजणें हेंच अद्वैतज्ञान होय. दुसरें सांगणें सर्व व्यर्थ आहे. (३३६) शिवधर्मपुराणांत म्हटलें आहे कीं, ज्याठिकाणीं रूप नाहीं त्याठिकाणीं भावना ( कल्पना ) नाहीं; जें कांहीं दिसतें आहे तें सर्व नाशिवंत आहे; ह्यासाठीं जो परमेश्वर ( जें तत्व ) साकार असून निराकारही आहे, त्याला नेहमीं भजावें; आणि त्याचा नेहमीं अभ्यास करावा. (३३७) वीरागमांत म्हटलें आहे कीं, क्रियेखेरीज ज्ञान नाहीं, व ज्ञानाखेरीज क्रिया नाहीं. आंधळ्यास दिसलें नाहीं म्हणून तो रानांतील वणव्यांत सांपडून जळाला, आणि पांगळ्यास वणवा दिसला खरा परंतु तेथून पळून जाण्याची त्याचे अंगांत शक्ति नसल्यामुळें तो जळून मेला. सारांश मनुष्याचे अंगीं ज्ञान असून त्यानें क्रिया केली, तर त्याचा उपयोग आहे. नुसत्या ज्ञानाचा किंवा नुसत्या क्रियेचा कांहीं उपयोग नाहीं. (३३८) मंत्रोपनिषदांत सांगितलें आहे कीं, आत्मे ( जीव ) हे परतंत्र आहेत आणि परमेश्वर हा स्वतंत्र आहे; दोहोंसही जन्म नाहीं, व दोघांचाही कोणी धनी नाहीं. तरीपण जीव जरी स्वतंत्र आहे, तरी तो सुखदुःखें भोगण्याला पात्र आहे. तो सुखदुःखें भोगितो, आणि दुसरा परमेश्वर आपल्या स्वाधीन सर्व कारणें, काल, आणि आत्मा ह्यांस ठेवून, स्वतः एकटा राहतो. (३३९) श्रीशंकराला यथार्थ रीतीनें जाणणें व त्याचें पूजन करणें हाच एक श्रेष्ठ धर्म होय, हेंच एक तप करणें होय, आणि हेंच कायतें एक जाणावयाचें ज्ञान आहे. श्रीशिवाचें पूजन केलें म्हणजे सर्वकांहीं केल्यासारखें आहे. (३४०) वेदांशीं काय करावयाचें आहे? शास्त्रांशीं काय करावयाचें आहे? तपश्चर्येशीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तैः ॥ शिवस्संपूज्यते नित्यमुपदेशोऽयमुत्तमः ॥३४०॥ एककालं द्विकालं वा त्रिश्चतुश्चाष्ट चैव वा ॥ यथाशक्त्या यथाकामं तथा संपूजयेच्छिवम् ॥३४१॥ महाभारते उमामहेश्वरसंवादे ॥ सर्वयज्ञात्परः शुद्धो नमस्कारो महामखः॥नमस्काराख्ययज्ञेन तस्मात्संपूजयेच्छिवम् ॥३४२॥ यो न पूजयते लिंगं शिवं त्रिभुवनेश्वरम् ॥ न च स्वर्गस्य मोक्षस्य राज्यस्य न च भाजनम् ॥३४३॥ ये स्मरन्ति सदाकालमीशानं पूजयन्ति वा ॥ रुद्रलोकात्परिभ्रष्टास्ते रुद्रा नात्र संशयः ॥३४४॥ प्रश्नोपनिषदि ॥ या ते तनुर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि ॥ या मनसि संतता शिवां तां कुरुमोत्क्रमीः ॥३४५॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ यदा शिवकलायुक्तं लिंगं दद्यान्महागुरुः ॥ तदारभ्य शिवस्तत्र तिष्ठत्याव्हानमत्र किं ॥३४६॥ तत्रैव ॥ सुसंस्कारेषु लिंगेषु सदा सन्निहितः शिवः ॥

---

काय करावयाचें आहे? किंवा व्रतांशीं तरी काय करावयाचें आहे? नेहमीं श्रीशिवाचें पूजन करावें. ह्याच उपदेश चांगला आहे. (३४१) एकवेळ किंवा दोनवेळा किंवा तीनवेळ किंवा चारवेळ जितकेवेळ साधेल तितकेवेळ आपल्या शक्तीप्रमाणें आणि आपल्या इच्छेप्रमाणें शिवाचें पूजन करावें. (३४२) महाभारतांत शिवपार्वतीच्या संवादांत ह्मटलें आहे कीं, सर्व प्रकारच्या यज्ञांपेक्षां श्रीशंकराला नमस्कार करणें हा मोठा यज्ञ आहे. त्यासाठीं ह्या नमस्काररूप यज्ञानें शिवाची पूजा करावी. (३४३) जो मनुष्य शिवलिंगाची पूजा करीत नाहीं, शिव हा त्रैलोक्याचा ईश्वर असून त्याचीही पूजा करीत नाहीं; त्याला स्वर्ग मिळत नाहीं, मोक्ष मिळत नाहीं, किंवा ह्यालोकीं त्याला राज्योपभोगही मिळत नाहीं. (३४४) जे लोक परमेश्वर श्रीशंकराचें नेहमीं स्मरण करितात, आणि नेहमीं श्रीशंकराचें पूजन करितात, ते रुद्रलोकापासून पृथ्वीवर अवतरलेले प्रत्यक्ष रुद्रच आहेत, ह्यांत संशय नाहीं. (३४५) प्रश्नोपनिषदांत ह्मटलें आहे, हे परमेश्वरा, श्रीशंकरा, तुझें लिंगरूपी शरीर ज्या माझ्या वाचेमध्यें राहिलें आहे, माझ्या कानामध्यें राहिलें आहे, माझ्या डोळ्यांत राहिलें आहे, आणि माझ्या नेहमीं मनांत राहिलें आहे, अशा माझ्या देहाला तूं मंगलस्वरूप कर. (३४६) सिद्धांतशिखामणींत ह्मटलें आहे कीं, जेव्हां श्रेष्ठ गुरु शिष्याला शिवशक्तियुक्त असणारें लिंग देतो तेव्हांपासून त्या शिष्याजवळ नेहमीं शिव आहेच; मग त्याला आवाहन कशाला करावयास पाहिजे? (३४७) तेथेंच आणखी असें सांगितलें आहे कीं, मंत्र संस्कारांनीं पवित्र झालेल्या लिंगांत नेहमीं श्रीशिव अगदीं जवळ असल्यासारखा आहे; मग नियमाविरुद्ध त्यास आवाहन करण्याचें काय काम

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

अत्राव्हानं न कर्तव्यं प्रतिपत्तिविरोधतः ॥३४७॥ तत्रैव ॥ नाव्हानं न विसर्गं च स्वेष्टलिंगेषु कारयेत् ॥ लिंगनिष्ठापरो नित्यमिति शास्त्रस्य निश्चयः ॥३४८॥ किंच वातुले ॥ वासना वाह्यते देवि वासनैव विसृज्यते ॥ पारमार्थेन देवस्य नावाहनविसर्जने ॥३४९ किंच तंत्रसारे ॥ कुतो वा नीयते देवि कुतो वापि विसृज्यते ॥ स्थूलसूक्ष्मादिभेदेन स हि योगिषु संस्थितः ॥३५०॥ अन्तर्यामिब्राह्मणोपनिषदि ॥ यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या अन्तरो यं पृथिवी न वेद यस्य पृथिवी शरीरं स ते आत्मान्तर्याम्यमृतो यो तिष्ठन् अपामन्तरो यमापो न विंदति यस्यापस्त शरीरः स ते आत्मान्तर्याम्यमृतो यस्तेजसि तिष्ठन् तेजसोन्तरो यस्तेजो न वेद यस्य तेजः शरीरं स ते आत्मान्तर्याम्यमृतो यो वायौ तिष्ठन्-

---

आहे? (३४८) तेथेंच आणखी असें सांगितलें आहे कीं, लिंगावर एकनिष्ठपणानें विश्वास ठेवणाऱ्या लिंगायतमनुष्यानें इष्टलिंगांत शिवाचें आवाहनही करूं नये, आणि शिवाचें विसर्जनही करूं नये. असा शास्त्राचा नियम आहे. (३४९) आणखी वातुलांत असें सांगितलें आहे कीं, वासना ही देवी आहे तिचें आवाहन करावें लागतें व तिचेंच विसर्जन करावें लागतें; वास्तविकरीतीनें पाहतां त्या परमेश्वराला आवाहन नाहीं आणि विसर्जनही नाहीं (३५०) आणखी तंत्रसारांत असें सांगितलें आहे कीं, शिव ह्मणतात--पार्वति, त्या शिवाला आणावयाचें तरी कोठून? आणि विसर्जन तरी कोठें करावयाचें? कांतर तो परमात्मा श्रीशिव स्थूल आणि सूक्ष्मरूपानें योगीलोकांत पूर्णपणानें राहिला आहे. (३५१) अंतर्यामिब्राह्मणोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जो परमेश्वर पृथ्वीवर सर्व ठिकाणीं राहत असून पृथ्वीच्या आंत ही राहतो, तरी ज्याला पृथ्वी जाणत नाहीं, व ही पृथ्वी ज्याचें शरीर आहे तो तुझ्या आत्म्यांतही रहात आहे, त्यास मरण नाहीं. जो परमेश्वर पाण्यावर राहतो, आणि पाण्याच्या आंतही राहतो, तरी पाणी ज्याला जाणत नाहीं, व पाणी हें ज्याचें शरीर आहे, तो तुझ्या आत्म्यांतही राहतो; त्याला मरण नाहीं. जो तेजांत (अग्नींत) राहतो, तसा अग्नीच्या पोटांतही राहतो, तरी तेजास त्याचें यथार्थस्वरूप समजत नाहीं. तेज हें त्याचें शरीर आहे, तो तुझ्या आत्म्यांतही राहतो, त्यास मरण नाहीं; जो वायूंत राहतो तसा वायूच्या पोटांतही राहतो ( वायु त्याच्या पोटांत राहतो ), तरी वायु त्याला जाणत नाहीं, वायु हें त्याचें शरीर आहे तो तुझ्या आत्म्यांतही राहतो. त्यास मरण नाहीं. जो आकाशांत राहतो व आकाशाच्या पोटांतही राहतो, तरी आकाशास तो समजत नाहीं, आकाश हें त्याचें शरीर आहे; तो तुझ्या आत्म्यांतही राहतो त्यास

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वायोरंतरोयं वायु र्न वेद यस्य वायुः शरीरं स ते अन्तर्याम्यमृतोयं आकाशे तिष्ठन् नाकाशस्यान्तरोयमाकाशं न वेद यस्य आकाशं शरीरं स ते आत्मान्तर्याम्यमृतो यश्चन्द्रमसि तिष्ठन् चंद्रमसोन्तरो यं चंद्रमा न वेद यस्य चंद्रमाः शरीरं स ते आत्मान्तर्याम्यमृतो यः सूर्ये तिष्ठन् सूर्यस्यान्तरो यं सूर्यस्य न वेद यस्य सूर्यः शरीरं स ते आत्मान्तर्याम्यमृतो य आत्मनि तिष्ठन् आत्मान्तरो यं आत्मा न वेद यस्य आत्मा शरीरं स ते आत्मान्तर्याम्यमृतः ॥३५१॥ स्कान्दे ॥ न गन्धादिगुणैर्युक्तः क्ष्मादिवद्भगवान् शिवः ॥ न स्यन्दनस्वभावश्च यथैवापस्तथा विभुः ॥३५२॥ यथा ज्वलनवच्चोष्णस्तिरश्चीनो न वायुवत् ॥ नाकाशवत्तथा शद्बः शिवः परमचेतनः ॥३५३॥ चंद्रसूर्याविवाश्रान्तं स्थाणुर्न परिवर्तते ॥ मायागुणादिसंबंधो नात्मवत्परमेशितुः ॥३५४॥ श्रुतिः ॥ ब्रह्मणो वृक्षान्महति पत्रं कुसुमितं फलं चराचराष्टमूर्तिं फलितं फलशून्यवत् ॥३५५॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ अनन्वागस्तनुर्भवत्यसंगो ह्ययं

---

मरण नाहीं. जो चंद्रांत राहतो आणि चंद्रही त्यांत राहतो ( चंद्राचे आंत राहतो ) तरी तो चंद्रास समजत नाहीं; चंद्र हें त्याचें शरीर आहे; तो तुझ्याही आत्म्यांत आहे, त्यास मरण नाहीं. जो सूर्यांत राहतो व सूर्य त्याच्यांत राहतो तरी सूर्यास तो समजत नाहीं, सूर्य हा त्याचें शरीर आहे. तों तुझ्याही आत्म्यांत आहे त्यास मरण नाहीं. जो आत्म्यांत राहतो व आत्मा ज्यांत राहतो; तरी आत्म्यास तो समजत नाहीं. आत्मा हा त्याचें शरीर आहे, तो तुझ्याही आत्म्यांत राहतो त्यास मरण नाहीं (३५१) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, पृथ्वीच्या अंगीं जसा गंध ( सुवासिकपणा ) आहे तसा शिवाचे अंगीं नाहीं; शिवं हा पृथ्वी सारखा नाहीं. पाण्याचे अंगीं जसा पाझरण्याचा गुण आहे तसा परमेश्वर शिव पाण्याप्रमाणें पाझरणारा ही नव्हे. (३५३) शिव हा चेतनस्वरूप आहे. तो अग्नीसारखा ऊन्ह नाहीं, वाऱ्यासारखा वांकडा वांकडा वाहणारा नाहीं, किंवा आकाशाचा गुण जसा शब्द आहे तसा परमेश्वरास शब्द आकाशासारखा नाहीं. सारांश परमेश्वर आकाशासारखाही नाहीं. (३५४) चंद्रसूर्य जसे सदोदित फिरतात तसा परमेश्वर फिरत नाहीं, आत्म्याला जसा मायेचा व गुणांचा संबंध आहे तसा परमेश्वरास नाहीं, परमेश्वरास माया नाहीं किंवा त्रिगुणांचाही परमेश्वराशीं संबंध नाहीं. (३५५) वेद असें ह्मणतात कीं, ब्रह्मस्वरूप हा मोठा वृक्ष आहे त्यावृक्षावर पान, फूल आणि फळ हीं आहेत. हें स्थावरजंगम विश्व अष्टमूर्ति श्रीशंकरामध्यें फलद्रूप झालेलें दिसतें, व निराकार ( कांहींच फळ नसलेले वृक्षासारखेंही दिसतें ). (३५६) बृहदारण्यकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, त्या पर-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पुरुषः ॥३५६॥ शिवगीतायाम् ॥ कथं सर्वगतत्वं स्याच्छिवस्य परमात्मनः ॥ असंगो ह्ययं पुरुष इत्याह श्रुतिरुन्नता ॥३५७॥ शिवधर्मे ॥ कथं भवेत्सर्वगतः शिवः परमपूरुषः ॥ जडं नाश्यं च सर्वं च चिदानंदघनः शिवः ॥३५८॥ शैवपुराणे ॥ लिंगं तनुः शिवा प्रोक्ता मूर्तिर्घोरा तनुः स्मृता ॥ अपापेषु च भक्तेषु तयोर्मध्ये शिवा तनुः ॥ काशते परमेशस्य शिष्टास्ते लिंगधारिणः ॥३५९॥ शिवयोगप्रदीपिकायाम् ॥ नित्यं भाति त्वदीयेषु या ते रुद्र शिवा तनूः ॥ अघोराऽपापकाशीति श्रुतिराह सनातनी ॥३६०॥ वीरागमे ॥ चंद्रांशवे चंद्रकांतश्चंद्रकांताय चंद्रमाः ॥ शिवाय भक्तो भक्ताय शिवः स्निह्यति नान्यथा ॥३६१॥ काष्ठे वन्हिस्तिले तैलं तैलाग्न्योर्न तिलेऽन्धने ॥ तज्जडो मम लिंगेऽस्मिन् न

---

मेश्वराच्या स्वरूपाचें यथार्थ वर्णन करण्यास वाणी समर्थ नाहीं ह्या पुरुषास कोणाची संगति नाहीं, तो निष्कल आहे तरी साकारही होतो ( तो शरीर धारण करितो ). (३५७) शिवगीतेंत ह्मटलें आहे कीं, ह्या पुरुष परमात्मा श्रीशिव संगहीन आहे. ह्या निष्कल आहे. वेद मोठ्यानें सांगत असतां ह्या परमात्म्या शिवाला सर्वत्र व्यापून असणारा असा शब्द तरी कसा लागूं पडतो? समजत नाहीं. (३५८) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं, श्रीशिव हा श्रेष्ठ पुरुष आहे, त्याला परमपूरुष असें ह्मणतात, तो सर्व ठिकाणीं व्यापून राहणारा असा कसा होईल? सर्व पदार्थ जड व नाशिवंत आहेत व शिव हा चित्स्वरूप आणि आनंदस्वरूप आहे. (३५९) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं, लिंग हें शंकराचें कल्याणकारक शरीर आहे, आणि मूर्ति हें शंकराचें भयंकर शरीर आहे; शंकराचें जे निष्पापस्वभावाचे भक्त आहेत त्यांचे जवळ त्या दोन शरीरांपैकीं परमेश्वराचें कल्याणकारक लिंगशरीर शोभतें; ह्यामुळें लिंग धारण करणारे लोक श्रेष्ठ होत. (३६०) शिवयोगप्रदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, हे रुद्रा, तुझ्या भक्तांजवळ नेहमीं जें तुझें कल्याणकारक लिंगशरीर शोभत आहे, तें फार सौम्य असून पापरहित अशा शिवभक्तांच्या शरिरांत प्रकाशतें; असें अनादिकालापासून चालत आलेला वेद सांगतो. (३६१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, चंद्रकिरणांला जसा चंद्रकांतमणि प्रिय असतो, व चंद्रकांतमण्याला जसा चंद्र प्रिय असतो; तसाच शिवाला भक्त प्रिय असतो, आणि भक्ताला शिव प्रिय असतो; ते एकमेकांवर प्रेम करितात इतरांवर करित नाहींत. (३६२) लांकडांत जसा विस्तव असतो, आणि तिळांत तेल असतें; तसें विस्तवांत लांकूड आणि तेलांत तीळ असत नाहींत. त्याप्रमाणें शिव ह्मणतात माझ्या चैतन्यस्वरूप लिंगांत जड ( स्थावर जीव ) राहतात,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

जडे मतिस्थितिर्भवेत् ॥३६२॥ मुण्डकोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्दक्षिणतश्चोत्तरेणाधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम्॥३६३॥ उत्तरतापनीयोपनिषदि॥सर्वं ह्येष ईश्वरः क्रियाज्ञानात्मा सर्वगो सर्वमयं हि सर्वे जीवा सर्वमायाः ॥३६४॥ अमृतबिन्दूपनिषदि ॥ एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः ॥ एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत् ॥३६५॥ सौरपुराणे ॥ सर्वोपाधिविनिर्मुक्तं चैतन्यं सर्वगं शिवम् ॥ तदेवेदमिदं विश्वं तस्मादन्यं न विद्यते ॥३६६॥ शिवसूत्रे ॥ लिंग एवेष्यते यद्वच्छर्वः सर्वगतोऽपि सन् ॥ तथा भक्तजनेष्वेव शिवता व्यक्तिरिष्यते ॥३६७॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ अपाणिपादो जवनो ग्रहिता पश्यत्यचक्षुः स शृणोति कर्णः स वेत्ति वेद्यं न च

---

जडामध्यें माझें वास्तव्य असत नाहीं. (३६३) मुंडकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, परब्रह्मस्वरूप हाच मोक्ष आहे. तें ब्रह्म पुढें, उजवीकडे, डावीकडे, वर व खालीं चोहोंकडे पसरलेलें आहे; हें परब्रह्म हेंच त्रैलोक्य आहे; हें सर्वापेक्षां श्रेष्ठ आहे. (३६४) उत्तरतापनीयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जें कांहीं दिसतें आहे, तो सर्व हा परमेश्वर आहे; तो क्रियास्वरूप आणि ज्ञानस्वरूप आहे; त्याची सर्व ठिकाणीं व्याप्ति आहे; तो सर्वत्र भरलेला आहे; तो सर्वांचे अंतःकरणांत भरलेला असून सर्व प्राणिमात्र हे त्याचेच अंश आहेत. (३६५) अमृतबिंदूपनिषदांत ह्मटलें आहे कीं, सर्व प्राणिमात्रांच्या अंतर्यामीं राहणारा परमेश्वर एकच आहे; तरी तो प्रत्येक प्राण्यांत वेगवेगळा असल्यासारखा राहिलेला आहे. तो एकच आहे तरी जसें एका चंद्राचीं अनेक ठिकाणचे पाण्यांत प्रतिबिंबें पडलीं ह्मणजे अनेक चंद्र असल्यासारखें दिसतात; तसेंच अनेक परमेश्वर आहेत असें दिसतें; वास्तविक पाहतां परमेश्वर एकच आहे. (३६६) सौरपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव हा परमेश्वर आहे, त्याला कोणत्याही तऱ्हेची उपाधि नाहीं, तो चैतन्यस्वरूप आहे, तो सर्व ठिकाणीं व्यापलेला आहे, तें शिवपरब्रह्मस्वरूपच हें सर्व त्रैलोक्य आहे, त्या परब्रह्मस्वरूपाखेरीज दुसरें कांहीं नाहीं. (३६७) शिवसूत्रांत ह्मटलें आहे कीं, जसा श्रीशंकर सर्व ठिकाणीं व्यापलेला आहे, तरी लिंगामध्येंच तो विशेषेंकरून मानला जातो; तसें भक्तांमध्यें शिवपणा प्रकट दिसतो, इतर लोकांमध्यें दिसत नाहीं. (३६८) श्वेताश्वतरोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, वेद ह्मणतो त्या परमेश्वराला हात नाहींत किंवा पाय नाहींत; तरी तो मोठा वेगवान् आहे त्याला डोळे नसून तो पाहतो, त्याला कान नसून तो ऐकतो, जगामध्यें ज्या कांहीं जाणावयाच्या वस्तु आहेत त्यांस तो जाणतो; पंच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महांतम् ॥३६८॥ तथा शिवरहस्ये ॥ शिवांगं शरणस्साक्षाच्छरणांगं शिवो भवेत् ॥ शिवास्यं शरणस्साक्षाच्छरणास्यं शिवो भवेत् ॥३६९॥ वीरमाहेश्वरं मां च विभिन्नं प्रवदन्ति ये ॥ ते मूढा एव मनुजा नात्र कार्या विचारणा ॥३७०॥ लिंगदेही शिवात्मैक्यो लिंगाचारी न लौकिकः ॥ सर्वं लिंगमयं प्रोक्तं लिंगेन सह सोऽश्नुते ॥३७१॥ स्कान्दे ॥ अत्यन्तदृढया भक्त्या शिवतत्त्वैकभावया ॥ गतदेहादिसंसक्तिरकाय इति गीयते ॥३७२॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ परकायेन चाख्यातः सत्यज्ञानी शिवात्मकः ॥ सम्यग्ज्ञानादिसंदिग्धं जन्मबीजकलेवरम् ॥३७३॥ शिवरहस्ये ॥ सद्योजातं तथा भक्तं वामदेवं महेश्वरम् ॥ प्रसादिनमघोरं च पुरुषं प्राणलिंगिनम् ॥३७४॥ ईशानं शरणं विद्यादैक्यमात्ममयं तथा ॥ षडंगं लिंगमूलं हि देवदेहिकभक्तयोः ॥३७५॥ अव्यक्तं लिंगमित्याहुरानन्दज्योतिरव्ययम् ॥ वेदं माहेश्वरं देव-

---

त्याला जाणणारा जगांत कोणी नाहीं. तो मूळपुरुष आणि श्रेष्ठ पुरुष आहे असें ज्ञाते लोक ह्मणतात. (३६९) तसेंच शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शरण हा प्रत्यक्ष शिवाचें अंग आहे, आणि शिव हा शरणाचें अंग आहे; शरण हा शिवाचें तोंड आहे, आणि शिव हा शरणाचें तोंड आहे. (३७०) शिव ह्मणतात—पार्वती, वीरमाहेश्वराला आणि मला जे लोक वेगळे वेगळे मानतात, ते लोक मूर्ख आहेत ह्यांत विचार करण्याचें कारण नाहीं. (३७१) लिंगशरीरी मनुष्य ( इष्टलिंग गळ्यांत बांधलेला मनुष्य ) शिवाचें आत्म्याशीं ऐक्य पावलेला आहे; लिंगाचार पाळणारा मनुष्य हा सामान्य मनुष्यासारखा नव्हे; तो अलौकिक पुरुष होय. सर्व स्थावरजंगम विश्व लिंगस्वरूप आहे असें मानलें आहे; तो लिंगासहित भोजन करितो. (३७२) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो शिवभक्त शिवाची एकाग्रमनानें भक्ति करितो व शिवतत्वावर ज्याचा दृढ विश्वास असतो; त्याची आपल्या स्वतःच्या शरीरावर देखील आसक्ति नसते; त्यास अकाय असें ह्मणतात. (३७३) अचिंत्यविश्वसादाख्यांत ह्मटलें आहे कीं, त्याला परकाय असेंही ह्मणतात; तो खरोखर ज्ञानवान् असून शिवस्वरूप आहे त्याचें जन्माला मूळकारण असणारा देह सम्यग्ज्ञानी असतो ( त्यास यथार्थ ज्ञान असतें. ) (३७४) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, सद्योजात हा भक्त आहे, वामदेव हा महेश्वर आहे, अघोर हा प्रसादि आहे, तत्पुरुष हा प्राणलिंगि आहे, (३७५) ईशान हा शरण असून, ऐक्य हें आत्मस्वरूप आहे. देवाचें आणि भक्ताचें अंग हें लिंगमूलच आहे. त्यास षडंग असें ह्मणतात. (३७६) अव्यक्ताला लिंग असें म्हणतात, तें आनंदस्वरूप आणि तेजोरूप आहे, तें अवि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

माहुर्लिंगमथाव्ययम् ॥३७६॥ कालिकाखण्डे ॥ नश्यन्ति ब्रह्मविष्ण्वाद्यास्तद्भक्तानां हि का कथा ॥ मद्भक्ता नैव नश्यन्ति स्थानं वाराणसी यथा ॥३७७॥ सामश्रुतिः ॥ सर्वादिरूर्ध्वमधश्च तिर्यक् प्रकाशयन् योनड्वान् एतं स देवो भगवान् वरेण्यो योनिस्वभावादधितिष्ठत्येकस्सर्वाधिपत्यं कुरुते महात्मा प्राच्यानस्य सर्वान्परिणामयेद्यो गुणांश्च सर्वान्विनियोजयेद्यस्ते तं विदित्वा अमृता बभूवुरिति ॥३७८॥ कैवल्योपनिषदि ॥ वृत्तम् ॥ वेदैरनेकैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ न पुण्यपापे न ममास्ति नाशो न जन्मदेहेंद्रियबुद्धयो मे ॥३७९॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ॥ किमिच्छन्

---

नाशी आहे. माहेश्वराला वेद असें ह्मणतात, देव असेंही ह्मणतात. लिंग हें अविनाशी आहे. (३७७) कालिकाखंडांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव, श्रीविष्णु, वगैरे देवांस देखील जन्म मरण आहे. मग त्यांच्या भक्तांची काय विशाद आहे? त्यांस तर जन्ममरण वगैरे असणारच शिव ह्मणतात माझ्या भक्ताचा मात्र नाश होत नाहीं. काशीक्षेत्र जसें अविनाशी आहे, तसा माझा भक्तही अविनाशी आहे. (३७८) "सामवेद असें म्हणतो" सर्व शब्दवाच्य अशा नंदि महाभृंगीश्वर वगैरे लोकांपेक्षां जो आदि ( पहिला ) आहे, व जो धर्मस्वरूप ( धार्मिक ) उपासकांना कामधेनूसारखा आहे, असा वृषभेश्वर नांवाचा गणेश्वर ऊर्ध्वमार्गी ( वरच्याप्रदेशांत ) खालीं व तिर्यक्प्रदेशांत ( आजूबाजूंस ) सर्व ठिकाणीं प्रकाशतो, व आपल्या तेजोविलासानें शोभतो, ह्मणूनच सृष्टीच्या आधीं राहत असल्यामुळें वृषभेश्वर परमेश्वराच्या बरोबरीचा आहे. असें वर्णन करतात. असा हा वृषभेश्वर गायित्रीमंत्रप्रतिपाद्य षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराला वाहतो आहे. ह्मणून परमेश्वरानें वृषभेश्वराला सर्व गुणांचें आधिपत्य दिलें. आणि सर्वज्ञत्वादि गुण, व ज्ञानादि दहा गुण हे सर्व त्याला शिवानें दिले अशा शिवाचें ध्यान वृषभादि प्रमथ आपल्या हृदयकमलांत करून मुक्त झाले. इत्यादि वचनांनीं शिव नित्य असून शिवभक्तही नित्य आहेत असें सिद्ध झालें (३७९) कैवल्योपनिषदांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात अनेक प्रकारचे वेद शिकून त्या वेदांच्या साधनानें तरी मी कोण आहें, हेंच जाणावयाचें आहे; मी वेदांतशास्त्राचा कर्ता असून मी वेदवेत्ता आहें; मला पुण्य नाहीं व पापही नाहीं माझा नाश होत नाहीं, मला जन्म नाहीं, मला शरीर नाहीं, मला इंद्रियें नाहींत, किंवा मला बुद्धि ही नाहीं. (३८०) बृहदारण्यकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, " हा मी तो पुरुष आहें" असें आपले आपणास जो यथार्थ रीतीनें जाणील त्याला मग कशाची इच्छा रा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri 

कस्य काम्याय शरीरमिह संज्वरेत् ॥३८०॥ छांदोग्योपनिषदि ॥ शरीरं भिक्षया वसनेनालंकारेण संस्कुर्वन्त्येते नह्यमुं लोकं जेष्यन्तो मन्यन्ते ॥३८१॥ योगिनो यतयश्चैव ज्ञानिनो मंत्रिणस्तथा ॥ देवपूजानिमित्ताय गृण्हन्ति स्वेच्छया तनुम् ॥३८२॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजाः धर्मेण पापमपनुदति धर्मे एव संप्रतिष्ठितस्तस्माद्धर्मं परमं वदन्ति ॥३८३॥ देविकालोत्तरे ॥ क्रिमिकीटपतंगांश्च तथा देवि वनस्पतीन् ॥ न नाशयेद्बुधो जीवान् परमार्थमतिर्यथा ॥३८४॥ वातुलतंत्रे ॥ वीरमाहेश्वरस्सौख्यान्यैहिकान्यखिलान्यपि ॥ भुक्त्वा यथेष्टं विश्वेशप्रसादान्मुक्तिमाश्रयेत् ॥३८५॥ लैंग्ये ॥ ये भक्ता देवदेवस्य शिवस्य परमात्मनः ॥ भाग्यवन्तो विमुच्यन्ते भुक्त्वा भोगानिहैव तु ॥॥३८६॥

---

हिली? व तो कोणत्या कारणामुळें आपल्या शरीरास कष्ट देईल? मुळींच देणार नाहीं (३८१) छांदोग्योपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जे लोक भिक्षा मागून आपलें शरीर पुष्ट करितात, वस्त्रें आणि अलंकार घालून आपल्या शरीरास सुशोभित करितात, ते ह्या लोकांस ( मृत्युलोकास ) जिंकून ह्याच जन्मांत मोक्षास जातील असें ह्मणतां येत नाहीं. (३८२) योगीश्वर लोक, सन्याशीलोक, ज्ञानीलोक, आणि मंत्रवेत्तेलोक देवपूजा करण्याच्या हेतूनें आपल्या इच्छेनेंच शरीर धारण करितात. वास्तविक त्यांस जन्ममरणाचें कारण नसतें; ते लोक जगांत सदाचाराची प्रवृत्ति करण्यासाठींच जन्मास येतात. (३८३) तैत्तरीयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, धर्म हा विश्वाची व जगाची प्रतिष्ठा आहे, धर्माचे आधारानें विश्व व जग चालतें, प्रजा धर्माचा आश्रय करितात. धर्मानें पातकाचा नाश होतो, धर्म हाच कायतो एक निरंतर कायम राहतो. त्यामुळें विद्वान् लोक धर्मास श्रेष्ठ ह्मणतात. (३८४) देविकालोत्तरांत शिवानें ह्मटलें आहें कीं, पार्वती, जो मनुष्य ब्रह्मज्ञानी आहे, तो किडा, मुंगी, पतंग, तशाच वनस्पति वगैरे कोणत्याही स्थावरजंगम जीवाचा नाश करीत नाहीं; तो सर्व प्राणिमात्रांचे जीव आपल्या जीवासारखेच महत्वाचे मानतो. (३८५) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, वीरमाहेश्वर परमेश्वर श्रीशंकराच्या कृपेनें ह्या लोकचे आणि परलोकचे सुखोपभोग व इच्छा पूर्ण होईतोंपर्यंत भोगून, नंतर मोक्षास जातात. (३८६) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव हा परमात्मा देवाधिदेव आहे, त्याचे जे भक्त असतात ते दैववान् होत; ते ह्यालोकीं सर्व प्रकारचे सुखोपभोग घेऊन मरणानंतर मोक्षास जातात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इति श्रीमद्वीरशैवाचार्यवर्यश्रीवीरशैवमार्गस्थापनाग्रगण्यश्रीसिद्ध वीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे माहेश्वरस्थलं नाम त्रयोविंशतितमं प्रकरणम् ॥

---

ह्याप्रमाणें श्रीवीरशैवाचार्यांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या, वीरशैव मार्गाची स्थापना करण्याचे कामांत पुढारीपण मिळविणाऱ्या श्रीसिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील माहेश्वरस्थल नांवाचें तेविसावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

# ॥ प्रसादिस्थलं प्रारभ्यते ॥

## ॥ चतुर्विंशतिप्रकरणम् ॥

एवं माहेश्वरस्थले आचारमनुष्ठाय भक्तो लिंगकाययोःसामरस्यवान्महात्मा तदनंतरं सावधानमुखेनानुष्ठानभेदो यथेत्याकांक्षायामनंतरं प्रसादिस्थलमित्युच्यते ॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ आत्मोपभोगविषयानिह सावधानं द्रव्याण्यहंकृतिमितैरखिलैः खवर्गैः ॥ लिंगे समर्प्य बहुशो लभते प्रसादं यत्तत्प्रसादगदितं गुरुभिःस्थलं स्यात् ॥१॥ व्यासजैमिनिसंवादे ॥ जंगमस्य प्रसादं तु नैवेद्यं तत्समर्पयेत् ॥ प्रसादेन विशुद्धात्मा प्रसादस्थलमुत्तमम् ॥२ शिवयोगदीपिकायाम् ॥ शिवाचार्यातिथीनां च पूजया तत्प्रसादतः ॥ प्रसादी स्यात्क्रियालिंगमन्तः प्राणात्मना यजेत् ॥३॥ सूतसंहितायाम् ॥ प्रसादं च गुरोस्सम्यक् जंगमानां च सर्वदा ॥ शिवस्य दत्वा भुंजीयात्प्रसादस्थलमुत्तमम् ॥४॥ शिवयोगप्रदीपिकायाम् ॥

---

श्रीगुरूस नमस्कार असो श्रीगुरुबसवालिंगास नमस्कार असो. ह्याप्रमाणें माहेश्वर स्थलांतील आचार आचरण करून लिंग आणि शरीर ह्यांचें सामरस्य पावलेल्या मोठ्या मनाच्या शिष्याला सावधानपणानें अनुष्ठान करावयाचा प्रकार ( भेद ) कसा असतो, हें समजून घेण्याची इच्छा होते, ह्मणून आतां ह्यापुढें प्रसादिस्थल कोणास ह्मणतात तें सांगतों. (१) वातुलांत सांगितलें आहे कीं, जो कोणी मनुष्य आपणास ( आत्म्यास ) उपभोग घेण्यासारख्या ज्या कांहीं वस्तु ( द्रव्यें ) आहेत, त्या सर्व मीपणा बाळगणाऱ्या सर्व इंद्रियांसहित लिंगांत ( लिंगास ) समर्पण करितो; व त्यामुळें बहुतकरून ज्यावर लिंगाचा प्रसाद होतो, त्यास गुरूंनीं प्रसादस्थल असें ह्मटलें आहे. (२) व्यासजैमिनिसंवादांत ह्मटलें आहे कीं, जंगमाचा प्रसाद घेऊन त्याचा नैवेद्य श्रीशिवास समर्पण करावा. प्रसादामुळें ज्याचें मन निर्दोष झालें आहे त्यास प्रसादिस्थल असें ह्मणतात. प्रसादिस्थल हें सर्व जगांत श्रेष्ठ आहे. (३) शिवयोगदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, शिवाची, आचार्यांची, आणि अतिथींची पूजा करून व त्यांचा प्रसाद घेऊन, नंतर प्रसादी मनुष्य क्रिया लिंगाला अन्तःप्राणानें ह्मणजे आत्म्यानें यजन करितो. ( प्रसाद घेऊन मग प्रसादी एकाग्रमनानें क्रियालिंगाची पूजा करितो ) (४) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य आपल्या गुरूचा प्रसाद, आणि चांगल्यारीतीनें घेतलेला जंगमाचा प्रसाद दररोज शिवाला समर्पण करून, नंतर आपण भक्षण करितो; त्या मनुष्यास प्रसादिस्थल असें ह्मणतात; प्रसादिस्थल हें सर्वांत श्रेष्ठ आहे. (५) शिवयोगप्रदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, शिव

CC-0 Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मम प्रसादसिध्यर्थं निर्मलं ज्ञानकारणम् ॥ शिवप्रसादं स्वीकुर्वन् संप्रसादीति कथ्यते ॥५॥ ग्रंथान्तरे ॥ लिंगत्वं च गुरुत्वं च चरलिंगत्वमाप्नुयात् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन चरोच्छिष्टं तु सेवयेत् ॥६॥ शिवरहस्ये ॥ गुरुजंगमलिंगानां निर्माल्यं भुक्तशिष्टकम् ॥ सदैवानुभवेद्देवि प्रसादव्रतमुत्तमम् ॥७॥ गुरौ लिंगे चरे ज्ञानी प्रसादं पादवारि च ॥ सममेव भजेद्भक्त्या तद्व्रतं मुक्तिदं स्मृतम् ॥८॥ तस्मात्सकलवस्तूनि चरे तस्मिन् समर्पयेत् ॥ स्वच्छंदस्य प्रसादस्य नमस्कृत्वा सुलक्षणः ॥९॥ वातुले॥ प्रसादभक्तिमुक्तीनामेकदेशसमन्वयः ॥ अपि मुक्तिर्भवेत्कन्या शेषौ द्वौ जनकौ मतौ ॥१०॥ प्रसादो जनकः प्रोक्तो जननी भक्तिरीरिता ॥ अनयोरैक्यभावेन जनिता मुक्तिकन्यका ॥११॥ प्रसादाद्देवताभक्तिः प्रसादो

---

म्हणतात–पार्वती, माझा प्रसाद ( कृपा ) प्राप्त होण्यासाठीं, निर्दोष आणि ज्ञानप्राप्ति करून देणाऱ्या शिवप्रसादाचा जो मनुष्य स्वीकार करितो, त्यास प्रसादी असें म्हणावें. (६) इतर ग्रंथांत म्हटलें आहे कीं, लिंगपणा आणि गुरुपणा हे दोन्ही गुण एकत्र झाले, म्हणजे त्यास चरलिंगपणा येतो. ( जंगमाचे अंगीं गुरुत्व आणि लिंगत्व हे दोन्ही गुण आहेत. ) ह्यासाठीं मनुष्यानें हर प्रयत्नानें जंगमाचें उच्छिष्ट भक्षण करावें. (७) शिवरहस्यांत म्हटलें आहे कीं, पार्वती गुरूचें जंगमांचें, आणि लिंगाचें निर्माल्य आणि उच्छिष्ट प्रसाद यांचें नेहमीं सेवन करावें; ह्या व्रतास प्रसादिव्रत असें म्हणतात, हें प्रसादिव्रत सर्व व्रतांत उत्तम व्रत आहे. ( ८ ) ज्ञानी मनुष्य, गुरूचें, लिंगाचें, आणि जंगमाचें उच्छिष्टान्न आणि पादोदक हीं सारख्या योग्यतेचीं आहेत, असें समजून भक्तीनें त्यांचें सेवन करितो. ह्या व्रतास प्रसादिव्रत असें म्हणतात. हें व्रत मोक्षाची प्राप्ति करून देणारें आहे. (९) ह्यासाठीं सर्व प्रकारच्या वस्तु त्या जंगमलिंगालाच समर्पण कराव्या. मनोहर असा प्रसाद आपणांस मिळाल्यावर सुलक्षणी मनुष्यानें त्यास नमस्कार करून भक्षण करावें. (१०) वातुलांत म्हटलें आहे कीं, प्रसाद, भक्ति, आणि मुक्ति ह्यांचा एकेठिकाणींच समावेश करणें प्रशस्त आहे. तरीपण मुक्ति हा मुलगी असून प्रसाद हा तिचा बाप आहे; व भक्ति ही तिची आई आहे. ( मनुष्याला प्रसाद झाला म्हणजे त्याची शिवावर भक्ति जडते, आणि त्याभक्तीमुळें तो मरणानंतर मोक्षास जातो. ) (११) प्रसादास बाप म्हणतात, आणि भक्तीस आई म्हणतात; या दोघांचें परस्पर ऐक्य झालें, म्हणजे त्यापासून मुक्तिरूप मुलगी उत्पन्न होते. (१२) प्रसादापासून देवतांची भक्ति उत्पन्न

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भक्तिसम्भवः ॥ यथैवांकुरतो बीजं बीजतो वा यथांकुरः ॥१२॥ शिवधर्मे ॥ प्रसादजातलिंगस्य चरोच्छिष्टार्पणं यथा ॥ तथा भावप्राणलिंगे रुचित्तेन विनिश्चिता ॥१३॥व्यक्तो गुरुप्रसादश्चाव्यक्तो लिंगप्रसादकः॥ लिंगजंगमसंयुक्तप्रसादश्चेत्यखंडितः ॥१४॥ वातुले ॥ स्थूलं द्रव्यं भवेद्रूपं प्रविविक्तं रुचिर्भवेत् ॥ आनन्दस्तु भवेत्तृप्तिरेवमेव पृथक्क्रमात् ॥१५॥ स्थूलद्रव्यार्पणं बाह्यं प्रविविक्तं तथांतरम्॥ आत्मसंगमयं साक्षादानन्दार्पणमुच्यते ॥१६॥ स्थूलद्रव्यार्पको विश्व इष्टलिंगे स्वभावतः ॥ प्रविविक्तार्पकःसाक्षात्प्राणलिंगे तु तैजसः ॥ भावलिंगे सदा प्राज्ञ आनन्दार्पक उच्यते ॥१७॥ शिवरहस्ये ॥ इष्टलिंगार्पितं चांगं प्राणलिंगार्पितं मनः ॥ भावलिंगार्पिता तृप्तिरितिभेदो वरानने ॥१८॥ वातुले ॥ इष्टलिंगार्पितं शुद्धं प्राणलिंगमुखार्पितम् ॥ सिद्धं ततः प्रसिद्धं हि भावलिंगार्पितं विदुः ॥१९॥ एतदर्पणतो लब्धं प्रसादं तत्तथादरात् ॥ भुंक्ते

---

होते, व त्या भक्तीपासून प्रसादाची प्राप्ति होते. जसें अंकुरापासून पुढें बीज होतें, आणि त्या बीजापासून पुनः अंकुर येतो, तशीच भक्ति आणि प्रसाद ह्यांची परस्पर स्थिति आहे (१३) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं, प्रसादजातलिंगाला जंगमाच्या उच्छिष्टान्नाचा प्रसाद जसा आवडतो, तसा तो उच्छिष्टान्नाचा प्रसाद प्राणलिंगालाही भावपूर्वक आवडतो, हें अगदीं खास आहे. (१४) गुरुप्रसाद हा व्यक्त आहे, व लिंगाचा प्रसाद हा अव्यक्त आहे. लिंगाचा आणि जंगमाचा दोघांचा मिळून जो प्रसाद आहे. त्याला अखंडित असें ह्मणतात. (१५) वातुलांत ह्मटलें आहे कीं, रूप हें स्थूलद्रव्य आहे, रुचि हें आंतरद्रव्य आहे, आणि आनंद ही तृप्ति आहे, ह्याप्रमाणें हे वेगळे वेगळे धर्म आहेत. (१६) बाह्यास स्थूलद्रव्यार्पण असें ह्मणतात, प्रविविक्तास आंतरद्रव्यार्पण असें ह्मणतात. आणि आत्मसंगस्वरूपास आनंदार्पण असें ह्मटलें आहे. (१७) इष्टलिंगांत सहजरीतीनें स्थूलद्रव्य अर्पण करणारास विश्व असें ह्मणतात. व प्राणलिंगांत प्रविविक्तास अर्पण करणारास तैजस असें ह्मणतात. आणि नेहमीं भावलिंगाचें ठिकाणीं आनंद अर्पण करणारास प्राज्ञ असें ह्मणतात. (१८) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, इष्टलिंगास अर्पण करावयाच्या वस्तूस अंग ह्मणतात, प्राणलिंगास अर्पण करावयाच्या वस्तूस मन ह्मणतात, आणि भावलिंगास अर्पण करावयाच्या वस्तूस तृप्ति असें ह्मणतात. (१९) वातुलांत ह्मटलें आहे कीं, इष्टलिंगास अर्पण करावयाच्या वस्तूस शुद्ध ह्मणतात, प्राणलिंगाचे मुखांत अर्पण करावयाचे वस्तूस सिद्ध ह्मणतात, आणि भावलिंगाचे मुखांत अर्पण करावयाचे वस्तूस प्रसिद्ध असें ह्मणतात. (२०) ह्या अर्पण केलेल्या वस्तूंमुळें मिळालेल्या प्रसादास तशाच आवडीनें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ह्यात्मा स्वयं विश्वतैजसप्राज्ञरूपतः ॥२०॥ जगज्जीवेश्वराणां तु त्रयाणां तत्वनिर्णयः ॥ उच्छिष्टान्नप्रसादेषु त्रिषु निर्णीयते क्रमात् ॥२१॥ शरीरादि जगद्रूपमुच्छिष्टं भ्रांतिलक्षणम् ॥ अन्नं तदभिमानी स्याज्जीवस्संसारलक्षणः ॥प्रसाद ईश्वरःसाक्षात् सच्चिदानन्दलक्षणः॥२२॥लीयते द्रव्यमन्नादि यत्र यन्नस्यते यतः ॥प्रसादत्वेन तल्लिंगं प्रसादस्तत एव सः ॥२३॥ वृत्तम्॥ यद्भाजनस्थं विनिवेद्यमानमन्नादिकं भाण्डगतं तदंशम् ॥ लिंगार्पितं भाजनसुस्थितं चिद्भांडस्थितं चैव समर्पितं स्यात् ॥२४॥ घृतात्मकं यन्नवनीतमाद्यं प्रतापितं वन्हिमुखे निजं स्यात् ॥ यथा तथा लिंगमुखार्पितं स्याद्भवेत्प्रसादात्मकमन्नमाद्यम् ॥२५॥ वातुले ॥ वृत्तम्॥ रौप्ये यथालोकय शुक्तिकायां लुप्ते स्वयं शिष्यत एव या सा ॥ तद्वत्प्रसादस्य पदार्थभावे लुप्ते स्वयं शिष्यत एव वस्तु॥२६॥ नोच्छिष्टभावो न निषिद्धभावः साक्षात्प्रसादे परमे पवित्रे ॥ भोगे प्रसादस्य कृते

---

हा आत्मा स्वतः विश्व, तैजस आणि प्राज्ञ ह्यारूपानें भक्षण करितो. (२१) जगत् जीव आणि ईश्वर ह्या तिघांचाही त्यांत खरेपणाचा निश्चय होतो. तीन प्रकारानें अर्पण केलेल्या उच्छिष्टान्न प्रसादापैकीं त्या तिघांकडेही संबंध पोंचतो. (२२) शरीरादिक जें हें जगत्स्वरूप आहे तें उच्छिष्ट होय. तें भ्रांतीचें लक्षण ( अज्ञान ) आहे. अन्न ही तदभिमानी देवता आहे, त्यालाच जीव म्हणतात. त्या जीवाचें संसार हें लक्षण आहे, प्रसाद हा प्रत्यक्ष ईश्वर आहे. त्या ईश्वराचें सत् चित् आणि आनंद हें लक्षण आहे. (२३) ज्यांत द्रव्य आणि अन्न वगैरे लय पावतें व ज्यापासून प्रसादपणाचे रूपानें पुनः बाहेर गमन करितें त्यास लिंग असें म्हणतात; व त्या लिंगापासूनच प्रसाद होतो. (२४) पात्रांत घालून समर्पण केलेलें अन्न वगैरे किंवा पात्रांत असलेला त्या अन्नाचा अंश लिंगास समर्पण केला, तर त्या पात्रांत समर्पण केलेला अंश चित्स्वरूपपात्रांत घालून समर्पण केलेला नैवेद्य आहे असें होतें. (२५) लोणी हें तुपाचें पहिलें स्वरूप आहे. तें विस्तवाच्या मुखावर ठेवून तापविलें म्हणजे जसें आपलें वास्तविकरूप ( तूप ) होतें, तसेंच लिंगमुखांत समर्पण केलेलें अन्न प्रसादस्वरूप होतें. (२६) वातुलांत म्हटलें आहे कीं, जसा शिंपेच्या ठिकाणीं रुप्याचा आभास होतो, व तो आभास नाहींसा झाला ( ती भ्रांती नाहींशी झाली ) म्हणजे ती शिंपच कायम राहते; त्याप्रमाणें प्रसादाचा पदार्थपणा नाहींसा झाला म्हणजे ती वस्तु प्रत्यक्ष प्रसादच आहे असें दिसून येतें. (२७) प्रसादाला उच्छिष्टपणाचा दोष नाहीं, किंवा त्याचा कोणीही निषेध करीत नाहीं; प्रसाद हा फार श्रेष्ठ आहे, प्रसादाचें भक्षण आणि उपभोग केला तरी त्या प्रसादाचे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शृणुध्वं भुंक्ते च तस्मिन्न हि संभवोऽस्य ॥ २७॥ आत्मोपभोगात्प्रथमं प्रसादरूपं यदि स्वात्तमपि प्रशस्तम् ॥ लिंगार्पितं प्राथमिकं स्वभोगान्नोच्छिष्टभुक्तं विनिषिद्धमेव ॥२८॥ शिवगीतायाम् ॥ प्रसादभोगसम्प्राप्तावन्तरायो महानयम् ॥ भवेत्प्रसादभोक्तॄणां सूतकद्वयसंगमः ॥२९॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ प्रसाद उच्छिष्टनिषिद्धभावो घटेत चेन्नैव भवेत्प्रसादः ॥ अभावतश्चास्य न चास्ति लिंगं गुरुर्नचास्ति क्रमतो निपातः ॥३०॥ असंस्कृतात्मेंद्रियभूतकायैरलिंगिभिःस्वार्थपरैः सकामैः ॥ दृष्टं श्रुतं स्पृष्टमथोपभुक्तं घ्रातायमुच्छिष्टमिति प्रसिद्धम् ॥३१॥ अतींद्रियैरविषयैरकामैः षट्स्थलात्मभिः ॥ यद्भुक्तं तद्धि नोच्छिष्टं न निषिध्दं न दूषितम् ॥३२॥ आदित्यपुराणे ॥ पंचाक्षरं पंचभूतं भूतात्मा प्रण-

---

ठिकाणीं उच्छिष्टपणाचा आणि निषिद्धपणाचा संभवच नाहीं. (२८) स्वतः उपभोग घेण्याच्या अगोदर प्रसाद जरी भक्षण केला तरी तें चांगलेंच आहे; आपण स्वतः उपभोग घेण्याच्या अगोदर जर लिंगास अर्पण केलें असें होत नसेल, तर तें उच्छिष्ट भक्षण केल्यासारखें असून तें निषिद्धच आहे. (२९) शिवगीतेंत सांगितलें आहे कीं, प्रसाद भक्षण करणाऱ्या भक्तांस प्रसादाचा उपभोग घेण्याच्या वेळीं ओदनसूतक आणि उच्छिष्टसूतक हीं दोन्हीं सूतकें एकत्र होणें, हें मोठें विघ्नच होईल. (३०) वातुलतंत्रांत सांगितलें आहे कीं; प्रसादाचे ठिकाणीं उच्छिष्टपणा आणि निषिद्धपणा हे दोन दोष असतील, तर तो प्रसादच ह्मणतां येणार नाहीं प्रसादच नाहींसा झाला तर लिंगही नाहीं आणि गुरुही नाहीं असा; क्रमाक्रमानें सर्वांचाच नाश होईल. (३१) ज्यांचीं इंद्रियें व आत्मा शुद्ध झालेलीं नाहींत, पंचमहाभूतें आणि शरीरें ज्यांचीं शुद्ध झालेलीं नाहींत, ज्यांचें आपल्या फायद्याकडे लक्ष आहे, जे विषयसुखाला लंपट आहेत, अशा आलिंगि लोकांनीं जें अन्न डोळ्यांनीं पाहिलें असेल, कानांनीं ऐकिलें असेल, ज्या अन्नास स्पर्श केला असेल, जें खाऊन पाहिलें असेल, किंवा ज्याचा वास घेतला असेल, तें अन्न निषिद्ध आहे असें समजावें (३२) जे लोक अतींद्रियज्ञानी आहेत, ज्यांस विषयसुखाची आवड नाहीं; ज्यांस कोणत्याही तऱ्हेची इच्छा राहिली नाहीं, त्या षट्स्थलस्वरूपी ( भक्त, माहेश्वर, प्रसादि, प्राणलिंगि, शरण आणि ऐक्यस्थितीस पोंचलेल्या ) कोणाही महात्म्यानें जें अन्न भक्षण केलें असेल, तें उच्छिष्ट नव्हे, निषिद्ध नव्हे, किंवा दूषित झालेलेंही नव्हे. (३३) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं, पंचाक्षर मंत्र हा पंचमहाभूतात्मक आहे, आणि पंचमहाभूतें मिळून जन्मास आलेला पुरुष हा ॐ कार

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वः पुमान् ॥ भूतभूतात्मभावेन स्थूलदेहः प्रतीयते ॥३३॥ वातुले ॥ वृत्तम् ॥आचाराह्वयलिंगमस्य वपुरात्मा गौरवं लिंगकं प्राणः स्याच्छिवलिंगमिंद्रियसमूहस्तद्वदेव स्वयम् ॥ प्रोक्तं यच्चरलिंगमेष विषयः प्रासादलिंगं तथा तृप्तिःषट्स्थलरूपिणस्तव किमाचक्षे महालिंगकम् ॥३४॥ लिंगोपभोगस्रग्गंधवस्त्रालंकरणादिकम् ॥ अनुभुंक्ते गणोच्छिष्टं सोऽपि मायां तरिष्यति ॥३५॥ वीरागमे ॥ लिंगभक्तप्रसादान्नं न गृण्हन्ति नराधमाः ॥लिंगभक्तप्रसादान्नात्पापशुद्धो भवेन्नरः ॥३६॥भक्तानां सुप्रसादान्नं स्वेष्टलिंगे निवेदयेत् ॥ लिंगत्वं च गुरुत्वं च चरलिंगत्वमाप्नुयात् ॥३७॥ समचित्तेंद्रियग्रामो यद्यास्ते ज्ञानवान् सदा ॥ तस्य प्रसादो भोक्तव्यो मयापि शिखिवाहन ॥३८॥ कुलीनो कुलजो वास्य नमस्कार पुरस्सरम् ॥ शेषान्नं सेवते देवि स भृत्याचारसज्जनः ॥३९॥ वृत्तम्॥ भक्तप्रसादं परमं पवित्रं देहेंद्रियप्राणनिवेद्यचित्तः॥ स्वलिंगसंयोग स-

---

आहे. त्याच पंचमहाभूतांमुळें आणि आत्म्याच्या संयोगामुळें हें स्थूलशरीर अनुभवास येतें. (३४) वातुलांत ह्मटलें आहे कीं, षट्स्थलब्रह्माचें आचारलिंग हें शरीर आहे, गुरुलिंग हा आत्मा आहे, शिवलिंग हा प्राण आहे, तसेंच स्वतः जंगमलिंग हा इंद्रियांचा समुदाय आहे. प्रसादलिंग हा त्या इंद्रियांचा विषय आहे, आणि महालिंग ही त्याची तृप्ति आहे. ह्या पेक्षां तुला जास्त काय सांगूं? (३५) जो कोणी मनुष्य लिंगास प्रथम अर्पण केलेलें फूल, गंध, वस्त्र, आणि अलंकार वगैरे वस्तु शिवगणांनीं त्यांचा उपभोग घेतल्यावर मग आपण उपभोग घेतो, तो मायेस तरून जाईल ( संसारांतून मुक्त होईल. (३६) वीरागमांत ह्मटलें कीं, हलकट स्वभावाचे लोक लिंगभक्तांचें प्रसादान्न भक्षण करीत नाहींत, लिंगभक्तांचें प्रसादान्न भक्षण केलें तर मनुष्य पातकापासून मुक्त होतो. (३७) भक्तांचें चांगलें प्रसादान्न आपल्या इष्टलिंगास अर्पण करावें; त्या पुण्यामुळें प्राण्याला लिंगपणा, गुरुपणा आणि जंगमपणा ही स्थिति प्राप्त होते. (३८) शिव ह्मणतात—हे मयूरवाहना, कार्तिकेया, ज्याचें मन आणि इंद्रियसमुदाय शांत झाला आहे, आणि जो ज्ञानी आहे, त्याचा प्रसाद मला देखील भक्षण करण्यास हरकत नाहीं. त्याचें प्रसादान्न मी देखलि भक्षण करितों. (३९) शिव म्हणतात.—पार्वती,—मनुष्य कुलीन असो किंवा अकुलीन असो, तो ह्या श्रीशंकराला नमस्कार करून नमस्कारपूर्वक जर शेषान्न भक्षण करील, तर त्यास भृत्याचारसज्जन असें ह्मणावें. (४०) शरीर, इंद्रियें व प्राण त्यांचें एकाग्रमनानें अर्पण करण्यास व आपल्या इष्टलिंगाशीं समरस झालेल्या



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वीरशैव स्तत्पादरक्षा शिरसा धृतार्चा ॥४०॥ स्कांदे ॥ भक्तजिव्हाग्रतो लिंगं लिंगजिव्हाग्रतो रुचिः॥रुच्यग्रे तु प्रसादोऽस्ति प्रसादः परमं पदम् ॥४१॥ ईशानसंहितायाम् ॥ सक्तलिंगार्चकोच्छिष्टं स्वदेहे यस्तु लेपयेत् ॥ वज्रकायस्स भवति शिवेन सह मोदते ॥४२॥ ब्रह्माण्डपुराणे॥ विष्णुः परशुरामोऽपि शिवेन सह दीक्षितौ ॥ पादोदकप्रसादान्ननिर्माल्यानां निषेवकौ ॥४३॥ वातुले॥ आर्या॥ मुसलोलूखलचुल्लीघटेक्षुतिलयंत्रमुखसमुद्भूतम् ॥ न किमपि दूष्यति लोके दूष्यति गुरुलिंगजंगममुखोत्थम् ॥४४॥ तन्त्रान्तरे ॥ स्त्रीभिः सहैव भुंजीरन्नदोष इति मानवाः ॥मद्भक्तानां प्रसादान्नं न गृण्हन्ति दुरात्मकाः ॥४५॥ श्रुतिः॥आर्या॥ ओदनसूतकमादावन्ते चोच्छिष्टसूतकद्वितयम् ॥ हित्वा शिवप्रसादं भुनक्ति यः स प्रसादवान् भवति ॥४६॥ आचारेण च गुरुणा शिवेन चर-

---

वीरशैवाशीं सहवास असणारा भक्तप्रसाद हा फारच पवित्र आहे; त्या भक्ताची पादरक्षा ( जोडा ) आपले मस्तकावर घेणें ही पूजा आहे. (४१) स्कंदपुराणांत म्हटलें आहे कीं, भक्ताच्या जिभेच्या शेंड्यावर लिंग राहतें, लिंगाच्या शेंड्यावर रुचि आहे, रुचीच्या पुढें प्रसाद आहे, सारांश, प्रसाद हा मोक्षस्थान आहे. (४२) ईशानसंहितेंत म्हटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य लिंगपूजा करणाऱ्या भक्ताचें उच्छिष्ट अन्न आपल्या अंगाला एकवेळ चोपडून घेईल ( लावील ), त्याचें शरीर दगडासारखें मजबूत होतें ( तो निरोगी होतो ). आणि तो शिवासहित सुखानें कालक्रमणा करितो. (४३) ब्रह्माण्डपुराणांत म्हटलें आहे कीं, श्रीविष्णूनें आणि परशुरामानें श्रीशिवाबरोबरच दीक्षा घेतली; व त्या दोघांनीं पादोदक, प्रसादान्न आणि निर्माल्य यांचें सेवन केलें आहे. (४४) वातुलांत म्हटलें आहे कीं, मुसळ, उखळ, चूल, आणि ऊंस व तीळ गाळण्याचे घाणे ह्यांच्या तोंडांतून निघालेल्या पदार्थांची उच्छिष्ट म्हणून कोणी निंदा करीत नाहींत; आणि गुरु लिंग व जंगम ह्यांच्या तोंडांतील पदार्थांस उच्छिष्ट म्हणून त्यांची निंदा करितात, हें आश्चर्य नव्हे काय? (४५) इतर तंत्रांत म्हटलें आहे कीं, बायकांस बरोबर घेऊन जेवलें तर त्याला कांहीं चिंता नाहीं असें लोक मानतात; आणि माझ्या भक्तांचें प्रसादान्न उष्टें आहे, अशी दुष्ट लोक त्याची निंदा करितात. (४६) वेद असें सांगतो कीं, आरंभीचें ओदनसूतक व शेवटचें उच्छिष्टसूतक हीं दोन्ही कारणें न जुमानतां जो मनुष्य प्रसादान्न भक्षण करितो; तो प्रसादवान् होतो. (४७) आचारलिंगानें, गुरुलिंगानें शि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मूर्तिना प्रसादेन ॥ महता घ्रातं पीतं दृष्टं श्रुतं स्मृतं भजस्व मतम्॥४७॥ वृत्तम् ॥ भाण्डो देहो भाजनं चेंद्रियाणि जीवात्मायं द्रव्यरूपो यदन्नम्॥ भक्त्या लिंगायार्पयित्वा परस्मै शेषीभूतं तं प्रसादं भजस्व ॥४८॥ योगजागमे ॥ स सुखज्ञः स योगीशः स एवागमतत्ववित् ॥ शिवार्पितधिया स्वस्वेंद्रियेष्वाचरणं चरेत्॥४९॥ शिवरहस्ये॥लिंगार्पितपदार्थैस्तु संभोगी लिंगसंयुतः ॥ अनर्पितपरित्यागी प्रसादीति निगद्यते ॥५०॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ अर्पितं च गुरोर्वाक्यात्किल्मिषं स्यादनर्पितम् ॥ यद्यनर्पितं भुंजीयाद्रौरवं नरकं व्रजेत् ॥५१॥ कठशाखायाम् ॥ त्रिगुप्सा तमश्रीयाद्यदि पाप्मा शिवानर्पितं भुंक्त्वा त्रात्वेनो भुंक्ते क्रिमिं भुंक्ते मलं भुंक्ते अघं भुंक्त्वा अधो गच्छ ॥५२॥ पद्मपुराणे ॥ असमर्प्य पदं शंभो

---

वलिंगानें, जंगमलिंगानें, प्रसादलिंगानें, व महालिंगानें जें अन्न हुंगलें असेल जें पिऊन पाहिलें असेल, जें अन्न आपल्या दृष्टीनें पाहिलें असेल, व ज्याला स्पर्श केला असेल, तें अन्न भक्तानें निःशंकपणानें सेवन करावें. (४८) हें शरीर मोठें भांडें आहे, हीं इंद्रियें लहान लहान पात्रें आहेत, हा जीवात्मा द्रव्यस्वरूप आहे; ह्यासाठीं जें अन्न भक्तिभावानें लिंगास अर्पण करून बाकी उरलें असेल, तेंच अन्न प्रसादान्न होय. त्याचा स्वीकार कर. (४९) योगजागमांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य आपलीं सर्व इंद्रियें श्रीशिवास अर्पण केलीं आहेत अशा समजुतीनें आपलें वर्तन ठेवितो, त्यालाच सुखाचा खरा अनुभव आला; तोच सर्व योगीश्वरांत श्रेष्ठ समजावा. व त्यालाच आगमाचें तत्व यथार्थ रीतीनें समजलें, असें समजावें. (५०) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य लिंगास अर्पण केलेल्या पदार्थांनीं आपला चरितार्थ करितो, नेहमीं आपल्या शरीरावर इष्टलिंग धारण करितो, लिंगास अगोदर समर्पण केल्याखेरीज कोणताही पदार्थ भक्षण करीत नाहीं, त्यास प्रसादी असें ह्मणावें. (५१) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें गुरूच्या सांगण्याप्रमाणें इष्टलिंगास पदार्थ अर्पण करावा; जर न अर्पण केला तर त्यास पाप लागेल. इष्टलिंगास पदार्थ समर्पण न करितां जो मनुष्य भक्षण करितो, तो रौरवनरकास जातो. (५२) कठशाखेंत ह्मटलें आहे कीं, जो पातकी मनुष्य शिवास समर्पण केल्याखेरीज कोणतीही वस्तु आधीं आपण भक्षण करितो, त्यास तीनवेळ धिक्कार असो; तो तें मूर्तिमंत पापच खातो, तो किडे खातो, तो विष्ठा खातो, तो पाप खातो; व त्यामुळें अधोगतीस जातो. (५३) पद्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य कोणताही खाण्याचा किंवा पिण्याचा पदार्थ अगोदर श्रीशिवाचे पदास समर्पण

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भुंक्ते खादति पाति च ॥ श्वमांसमस्थिमूत्रं च भुंक्ते खादति पाति च ॥५३॥ लैंग्ये ॥ दर्पणं धूपदीपौ च नानारुचि सुखं बहु ॥ प्रसादमेव भोक्तव्यमन्यद्गोमांसविट्समम् ॥५४॥ तत्रैव ॥ फलं पुष्पं सुगंधं च वस्त्राण्याभरणानि च ॥ लिंगार्पितं च स्वीकार्यमन्यथा किंल्मिषं भवेत् ॥५५॥ खाद्यानि चादनीयानि पेयाद्यान्यानि यानि वै॥ तानि देयानि शंभोरेवाश्रीयाद्दासभावतः ॥५६॥ भोज्या लेह्याश्च चोष्याश्च ये च लिंगार्पिताः परे ॥ लिंगोच्छिष्टं तु भुंजीत प्रसादास्ते ह्युदाहृताः ॥५७॥ इक्षुदण्डफलापूपखाद्यानि व्यंजनानि च॥ प्रसादमेव भोक्तव्यमन्यद्गोमांसविट्समम् ॥५८॥इक्षुदंडफलादीनि सखण्डानि निवेदयेत्॥द्राक्षाखर्जूरचूतादीन्यखंडानि निवेदयेत् ॥५९॥ लिंगसारे ॥ लिंगस्नातं लिंगतोयं लिंगपीतं तथै-

---

केल्याशिवाय आपणच भक्षण करितो, किंवा प्राशन करितो, तो मनुष्य कुत्र्याचें मांस आणि हाडें खाऊन मूत पितो, असें समजावें. (५४) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें शिवास अनेक प्रकारचे धूप व दीप अर्पण करावें; त्यास अतिशय सुख लागतें. मनुष्यानें भक्षण करणें झालें तर शिवाचें प्रसादान्नच भक्षण करावें; दुसरें अन्न भक्षण केलें, तर गाईचें मांस किंवा मनुष्याची विष्ठा भक्षण केल्यासारखें समजावें. (५५) तेथेंच आणखी असें सांगितलें आहे कीं, मनुष्यानें फळ, फूल, गंध, वस्त्र, अलंकार वगैरे सर्व कांहीं पदार्थ अगोदर लिंगास समर्पण करून मग वापरावयास घ्यावे; असें न करील त्यास पाप लागेल. (५६) खाण्याचे पदार्थ आणि खाण्याचे कामीं उपयोगीं पडणारे पदार्थ, तसेच पिण्यासारखे पदार्थ वगैरे सर्व भक्तिभावानें अगोदर श्रीशंकरास समर्पण करून मग भक्षण करावे; त्याखेरीज भक्षण करूं नयेत. (५७) खावयाचे पदार्थ, चाटावयाचे पदार्थ, आणि चोखून खावयाचे पदार्थ वगैरे आणखी दुसरे सर्व पदार्थ अगोदर लिंगास समर्पण करावे; व लिंगास अगोदर ते पदार्थ समर्पण करून मग भक्षण करावे. त्यांस प्रसाद असें ह्मणतात. (५८) ऊंस, फळें, अनरसे वगैरे खाण्याचे पदार्थ, तसेच चटण्या कोशिंबिरी वगैरे सर्व कांहीं पदार्थ लिंगास समर्पण करावे; व मग तें प्रसादान्न भक्षण करावें. त्याखेरीज दुसरें अन्न भक्षण केलें; तर गाईचें मांस आणि विष्ठा वगैरे अपवित्र पदार्थ खाल्ल्याप्रमाणें अपवित्र समजावें. (५९) ऊंस, केळीं वगैरे पदार्थ परमेश्वरास तुकडे तुकडे करून समर्पण करावे, आणि द्राक्षें खजूर, अंबा वगैरे पदार्थ जशाचे तसे सबंध अर्पण करावे. (६०) लिंगसारांत ह्मटलें आहे कीं, ज्या पाण्यानें लिंगास अभिषेक केला असेल, किंवा जें पाणी लिंगास आचमनाकरितां वगैरे दिलें असेल, तें पाणी

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व च ॥ तत्पिबेल्लिंगशरणमन्यन्मद्यश्वमूत्रवत् ॥६०॥ वीरागमे ॥ तथा प्रसादभोगस्य सद्भक्तानां च वंचकः ॥ कुम्भीपाकेषु घोरेषु पच्यते स्वकुलैः सह ॥६१॥ दत्तप्रसादभोगस्तु नैवेद्यार्पण उच्यते ॥ प्रसादं दानहीनं चेदर्पितं चापि निष्फलम् ॥६२॥ प्रसादः पतितो भूमौ कल्पकोटिशतैरपि ॥ वायसं सूकरं याति यावच्चन्द्रदिवाकरौ ॥६३॥ कर्मणा मनसा वाचा त्रिविधेनार्पितं शुभम् ॥ नोचेदनर्पितं भुंक्ते प्रसादो निष्फलो भवेत् ॥ ६४॥ लैंग्ये ॥ रूपं समर्पयेद्द्रव्यं रुचिमप्यर्पयेत्ततः॥ उभयार्पणहीनं चेत्प्रसादो निष्फलो भवेत् ॥६५॥ क्रियातिलके ॥ सुप्रतिष्ठितलिंगस्य न यथा पूर्वभावना ॥ तथा शिवप्रसादस्य पूर्वनाम न संस्मरेत् ॥६६॥ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥ यथा चालिंग्यते पुत्रो तथा नालिंग्यते पतिः ॥६७॥ लिंगार्पितं च सर्वत्र बाह्याभ्यन्तरमेव

---

प्राशन करावें; व लिंगाच्या पूजेच्या कामीं लावावें; दुसरें पाणी आपल्यास तें दारूसारखें आणि घोड्याच्या मुतासारखें निषिद्ध समजावें. (६१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य प्रसादान्न भक्षण करीत नाहीं, व चांगल्या स्वभावाच्या माझ्या भक्तांशीं ठकबाजी करितो; तो मनुष्य आपल्या पूर्वजांसहित भयंकर कुंभीपाक नरकांत दुःख भोगतो. (६२) दिलेलें ( समर्पण केलेलें ) प्रसादान्न भक्षण करणें यास नैवेद्यार्पण असें ह्मणतात. प्रसाद जर दानाशिवाय समर्पण केला तर तो व्यर्थ आहे. (६३) प्रसादान्न जर जमिनीवर सांडलें ( पडलें ), तर ज्याचे हातून प्रसादान्न जमिनविर पडलें तो मनुष्य अनेक कोटिवर्षेंपर्यंत कावळा होतो, नंतर सूर्य चंद्र असेपर्यंत सूकर होतो. (६४) शरीरानें, मनानें आणि वाचेनें अशा तीन प्रकारांनीं शिवास नैवेद्य समर्पण करणें योग्य आहे; असें न करितां जो कोणी अन्न भक्षण करितो, त्याचा प्रसाद निष्फल होतो. (६५) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, रूप हें द्रव्य समर्पण करावें, त्यानंतर रुचिही अर्पण करावी. द्रव्य आणि रुचि हीं दोन्ही जर अर्पण केलीं नाहींत, तर तो प्रसाद निष्फळ होतो. (६६) क्रियातिलकांत ह्मटलें आहे कीं, चांगल्या रीतीनें यथाविधीनें स्थापन केलेल्या लिंगाची जशी पूर्वीची स्थिति लक्ष्यांत आणूं नये; तसेंच शिवप्रसादान्नाचें पूर्वीचें नांव देखील मनांत आणूं नये. (६७) मनुष्याला संकटांत पाडण्यास आणि संकटांतून सोडविण्यास मनच कारण आहे, दुसरें कोणी कारण नाहीं; बायको ज्या शरीरानें आपल्या नवऱ्यास भेटते त्याच शरीरानें आपल्या मुलास भेटते, परंतु दोन्हीवेळीं तिच्या मनाचे विकार वेगवेगळे असतात. (६८) बाहेर आणि आंत सर्व ठिकाणीं लिंगार्पितच व्यापलेलें आहे,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

व ॥ रूपं द्रव्यस्य बाह्येषु निरूपं चान्तरेषु च ॥६८॥ वृहदागमे ॥ गच्छं-स्तिष्ठन् स्वपन् जाग्रन् भुंजानो मैथुने रतः ॥ यः शिवार्पितचेतस्को भक्तिमान् स तु नान्यथा ॥६९॥ कठवल्ल्युपनिषदि ॥ येन रूपं रसं गन्धं शब्दान् स्पर्शांश्च मैथुनान् ॥ एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते ॥७०॥ वृहदागमे ॥ संयोगेषु वियोगेष्वप्यणुमात्रसुखानि च ॥ यः कुर्यादिष्टलिंगे तु सावधानी निरन्तरम् ॥७१॥ ईशानसंहितायाम् ॥ यद्यदात्महितं लोके तत्तद्द्रव्यमवंचयन् ॥ शिवलिंगार्पितं कुर्यात्तत्र तुष्यामि पार्वति ॥७२॥ वृहदागमे ॥ इंद्रियादागतं किंचिद्यत्सुखं तच्छिवार्पितम् ॥ तत्तत्प्रसादो भोक्तव्यस्तादिंद्रियमुखेन च ॥७३॥ यदिंद्रियमुखाद्देयं तदिंद्रियमुखाच्चरेत् ॥ अन्येन्द्रियोपभुक्तं चेदनर्हं घोषणादिवत् ॥७४॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ एते षडंगस्थलरूपतोऽसौ स्वात्मस्थिते

---

द्रव्याचें रूप हें बाह्यपदार्थांत भरलेलें आहे, आणि द्रव्याचें रूप हें अभ्यंतर पदार्थांत भरलेलें आहे. (६९) वृहदागमांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य वाटेनें जात असतां, उभा राहिला असतां, झोंप घेत असतां, जागा असतां, जेवीत असतां, किंवा मैथुनाच्या कामांत गुंतला असतां, शिवाकडे आपलें लक्ष लावितो, त्यालाच भक्तिमान् असें ह्मणावें, नाहींपेक्षां ह्मणूं नये. (७०) कठवल्ल्युपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जो रूप, रस, गंध, शब्द, स्पर्श, आणि मैथुन वगैरे क्रिया परब्रह्मस्वरूपच समजतो, त्याला आणखी बाकी काय राहिलें? ( असें समजल्यानें हीं सव शिवाला अर्पण होतात ). (७१) वृहदागमांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य ह्या लोकींचे कोणतेही विषयोपभोगाचे पदार्थ मिळाले असतां, किंवा आपणाजवळून हरवले असतां त्यावद्दल फारसें सुखही मानीत नाहीं, किंवा दुःखही मानीत नाहीं, व इष्टलिंगाकडे आपलें नेहमीं लक्ष लावितो, त्यास सावधानी असें ह्मणावें. (७२) ईशानसंहितेंत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात– पार्वती, जो कोणी मनुष्य आपणास ह्या लोकची जी जी वस्तु आवडत असेल ती ती कांहींएक कपट न करितां शिवलिंगाला अर्पण करितो, त्या त्याच्या करण्यानें मला मोठा संतोष होतो. (७३) वृहदागमांत ह्मटलें आहे कीं, इंद्रियांच्या द्वारानें आपणास जें कांहीं सुख लागतें, तें सुख शिवास समर्पण करावें; आणि तो तो प्रसाद इंद्रियांच्या साधनानेंच आपण सेवन करावा. (७४) जें कांहीं इंद्रियांच्या मुखापासून द्यावयासारखें असेल तें तें त्या त्या इंद्रियांच्या द्वारानें मिळवावें; दुसऱ्या इंद्रियांच्या द्वारानें त्याचा उपभोग घेतला, तर तें डांगोरा पिटल्यासारखें अनुचित कर्म होय. (७५) आपल्या आत्म्यांत राहणाऱ्या सहा प्रकारच्या लिंगतत्वांत, षडंगस्थलरूपानें सहा प्रकारच्या पदा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यश्रीमद्वीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण्यश्रीसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे प्रसादिस्थलं नाम चतुर्विंशतितमं प्रकरणं समाप्तम् ॥

---

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वराचार्यांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या श्रीवीरशैवाच्या षट्स्थलमार्गांची स्थापना करणाऱ्यांत पुढारी ह्मणविणाऱ्या श्रीसिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील प्रसादिस्थल नांवाचें चोविसावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

# ॥ प्राणलिंगिस्थलं प्रारभ्यते ॥

## ॥ पंचविंशतिप्रकरणम् ॥

एवं प्रसादिस्थलमनुष्ठाय प्रसन्नप्रसादसमरसीभूतप्रसादी अनुभवमुखेन अनुष्ठाय सामरस्यप्राप्तिमान् कथमित्याकांक्षायामनंतरं प्राणलिंगिस्थलमित्युच्यते ॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ प्राणेंद्रियादिषु ममाहमिति प्रमोहं संभ्रांतिसिद्धमपहाय समस्तमेतत् ॥ लिंगे निधाय मनसा यदनुप्रसक्तं तत्प्राणलिंगिसुचरस्थलमाहुरार्याः ॥१॥ ग्रन्थान्तरे ॥ तथा प्राणे गुणे लिंगे लिंगप्राणसमायुतम् ॥ सुखदुःखभयं नास्ति प्राणलिंगिस्थलं भवेत् ॥२॥ श्वेताश्वतरोपनिषदि ॥ अतएव बिंबं हृदयोपलिप्तं तेजोमयं भ्राजति तत्सुधान्तम् ॥३॥ मुण्डकोपनिषदि ॥ अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रोऽयं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥४॥ तत्रावधारिके ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. ह्याप्रमाणें प्रसादिस्थलास येऊन पोंचल्यावर उत्तम तऱ्हेच्या प्रसादाशीं सामरस्य पावलेला प्रसादी स्वतः त्या स्थितीचा अनुभव घेऊन सामरस्य कसा पावतो ? अशी शंका आल्यानंतर आतां त्याचेपुढें प्राणलिंगिस्थल ह्मणून आहे तें कसें असतें तें सांगतों. (१) वातुलागमांत ह्मटलें आहे कीं, अज्ञानपणामुळें प्राणिमात्रांची प्राणाविषयीं आणि इंद्रियांविषयीं " माझें आणि मी " अशी जी समजूत झालेली असते, ती सर्व सोडून देऊन एकनिष्ठपणानें जो आपलें मन लिंगाकडे लावितो, व त्यामध्येंच नेहमीं निमग्न असतो, त्यास विद्वान् लोक प्राणलिंगिस्थल असें ह्मणतात. (२) दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य प्राणाचे आणि गुणांचे ठिकाणीं लिंग व लिंगाचे ठिकाणीं प्राण लावितो, त्याचा प्राण लिंगाशीं एकरूप होऊन जातो; मग त्याला सुखाचें व दुःखाचें मुळींच भय राहत नाहीं. तो मनुष्य प्राणलिंगिस्थल होय ( त्यालाच प्राणलिंगि ह्मणावें ). (३) श्वेताश्वतरोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, बिंब हें एकच आहे; तें हृदयांत राहतें, तें फार तेजस्वी आहे, तें अमृतासारखें मनांत शोभत असतें, व सुख देतें. (४) मुंडकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, हा परमात्मा शरीराच्या आंत ( मनांत ) राहतो, तो तेजोरूप आहे, तो फार शुभ्र आहे, तो निष्पापमनाचे सन्यासी लोकांस मात्र दिसतो; इतरांस दिसत नाहीं. (५) तेथेंच अवधारिकेंत ह्मटलें आहे कीं, अशी एक

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सच्चित्सुखाद्वयं पूर्णं यदेकं ब्रह्मसंज्ञितम् ॥ तद्वस्तु स महादेवस्तद्युक्तः प्राणलिंगवान् ॥५॥ शिवरहस्ये ॥ लिंगांकिततनुप्राणो लिंगजीवस्तु जीवनम् ॥ लिंगतत्वपरिज्ञानी प्राणलिंगिस्थलं भवेत् ॥६॥ वीरागमे ॥ यद्देहे स्थापिते लिंगे तत्प्राणेति प्रतिष्ठितम् ॥ प्राणलिंगस्य सायुज्यं प्राणलिंगी तु स स्मृतः॥७॥प्राणेन प्राणनिर्देशे प्राणभावं परित्यजेत्॥प्राणलिंगं प्रतिष्ठाप्य लिंगप्राण इति स्मृतः ॥८॥ वातुले ॥ प्राणलिंगं मनोग्राह्यं भवेत्सकलनिष्कलम् ॥ तत्प्राणेष्वन्तर्मनसो लिंगमाहुरिति श्रुतिः ॥९॥ वीरागमे ॥ पाणिना धृतलिंगं तत्प्राणस्थाने विनिक्षिपेत् ॥ यस्तु-भेदेन जानाति न च लिंगं न चार्चनम् ॥१०॥ इष्टलिंगमविश्वस्य प्राणलिंगं न पश्यति ॥ दर्पणप्रतिबिंबानां यथारूपं तथा भवेत् ॥११॥सिद्धां-

---

वस्तु आहे कीं, ती सत्, चित् आणि आनंदस्वरूप आहे, ती एक आहे, ती परिपूर्ण आहे, तिला कशाचीही अपेक्षा नाहीं, तिच्याखेरीज जगांत दुसरी वस्तुच नाहीं, तिला ब्रह्म असें ह्मणतात. आणि ती वस्तु ह्मटली तर हा महादेव होय. त्या महादेवाशीं जो ऐक्य पावला त्यास प्राणलिंगि असें ह्मणावें. (६) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, ज्याचें शरीर आणि प्राण लिंगानें मुद्रित झालेलीं आहेत (ज्याचें शरीर आणि प्राण हीं लिंगमय झालीं आहेत ), जो लिंगच आपलें जीवन असें मानतो, व लिंगाकडे आपलें लक्ष लावितो, लिंगाच्या यथार्थ तत्वाचें ज्यास ज्ञान आहे, त्यास प्राणलिंगिस्थल असें ह्मणावें. तें प्राणलिंगिस्थल होय. (७) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शरीरामध्यें जें लिंग स्थापन केलेलें असतें, तेंच लिंग प्राण आहे, असें समजावें. अर्थात् प्राणलिंगांत ऐक्य होणाऱ्या त्या प्राण्याला प्राणलिंगी असें म्हणतात. (८) प्राण असा शब्द उच्चारला तर प्राणाचा बोध होतो, ह्मणून जो प्राणपणाही सोडून देतो; आणि आपला प्राण लिंगाचें ठिकाणीं स्थापन करितो, त्यास लिंगप्राण असें म्हणतात. (९) वातुलांत ह्मटलें आहे कीं, प्राणलिंग हें मनानें समजून घ्यावें लागतें, तें सप्रपंच आणि निष्प्रपंच असें दोन स्वरूपाचें आहे; लिंग हें प्राणाच्या आणि मनाच्या आंत आहे. असें वेद आणि ज्ञानी लोक मानतात. (१०) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, हस्तावर धारण केलेलें इष्टलिंग प्राणाच्या जागीं ठेवावें ( त्या इष्टलिंगाचा नेहमीं एकाग्रमनानें विचार करावा. ) जो कोणी मनुष्य इष्टलिंग वेगळें आहे, आणि प्राण वेगळा आहे, असें मानतो त्याचें तें लिंगही नव्हे, आणि त्याचें तें पूजनही नव्हे. (११) इष्टलिंगावर जो मनुष्य विश्वास ठेवीत नाहीं, त्याला प्राणलिंगाचें दर्शन होत नाहीं. हातांत आरसाच घेतला नाहीं तर जसें आपलें रूप दिसत नाहीं, तशीच इष्टलिंगाची आणि प्राणलिंगाची स्थिति आहे: आरशांत जसें रूप असेल तसेंच प्रतिबिंब दिसेल निराळें दिसावयाचें नाहीं. (१२) सिद्धान्तशिखामणींत ह्मटलें आहे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तशिखामणौ ॥ प्रकाशते यथा नाग्निररण्यामिंधनं विना ॥ क्रियां विना तथान्तस्थो न प्रकाशी भवेच्छिवः ॥१२॥ वासिष्ठे॥ शास्त्राभ्यासादियत्नेन सद्गुरोरुपदेशतः ॥ ज्ञानमेव समाभ्यासात्क्रिया नो न प्रयोजिका ॥१३॥ यथा काष्ठोद्भवो वन्हिः काष्ठमेव विनिर्दहेत् ॥ तथा कर्मोद्भवं ज्ञानं कर्म चैव प्रणाशयेत् ॥१४॥ वीरागमे ॥ वृत्तम् ॥ ज्ञानप्रवीणो न च कर्महीनः कर्मप्रवीणो न च चिद्विहीनः ॥ ज्ञानं च कर्माप्युभयं न पक्षौ पक्षैकहीना गगने चरन्ति ॥१५॥ वातुले ॥ क्रियाद्वैतं न कर्तव्यं भावाद्वैतं समाचरेत् ॥ क्रियां निर्वहते यस्तु भावशुद्धिस्तु शांकरि ॥१६॥ शिवधर्मोत्तरे ॥ रूपाणि चक्षुर्ग्राह्याणि पश्यते चक्षुषा विना ॥ विना भावेन गच्छन्यो भावगम्यः परः शिवः ॥१७॥ देव्युवाच ॥

---

कीं, अरणींत अग्नि आहे खरा, परंतु त्यावर लांकूड ठेवून घांसल्याखेरीज जसा तो प्रत्यक्ष होत नाहीं; तसाच अंतरात्म्यांत राहणारा शिव क्रिया केल्यावांचून प्रत्यक्ष होत नाहीं. (१३) वासिष्ठांत सांगितलें आहे कीं, शास्त्र वगैरे शिकण्याचा प्रयत्न करून सद्गुरूचा उपदेश घेऊन ज्ञानाचाच अभ्यास करावा. ज्ञानाचा अभ्यास केला तरी क्रिया नाहीं असें म्हणून चालावयाचें नाहीं क्रियाही पाहिजेच. (१४) जसा लांकडांतून निघालेला विस्तव लांकडालाच जाळून टाकितो; तसें कर्मापासून उत्पन्न झालेलें ज्ञान कर्मालाच जाळून टाकितें. (१५) वीरागमांत म्हटलें आहे कीं, जो ज्ञानामध्यें प्रवीण असतो तो कर्म करीत नाहीं असें होत नाहीं, तो कर्म करितोच. जो कर्मामध्यें प्रवीण असतो त्यास चित्स्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं असें होत नाहीं त्यास चित्स्वरूपाचें ज्ञान होतेंच. ज्ञान आणि कर्म हे दोन्ही बाजूचे दोन पंख आहेत. दोन्ही बाजूचे पंख असले तरच पाखरांस आकाशांत उडतां येतें, एका बाजूचा पंख असला तर उडतां येत नाहीं. त्याप्रमाणें मनुष्यास ज्ञान आणि क्रिया ह्या दोन गोष्टी अनुकूल असतील तरच त्याची कार्यसिद्धि होईल, नाहींतर होणार नाहीं. (१६) वातुलांत म्हटलें आहे कीं, क्रियेचें अद्वैत ( एकच क्रिया करणें ) करूं नये भावाचें अद्वैत ( एकच दृढ निश्चय ) करावें; पार्वती, जो कोणी मनुष्य क्रियेवरच आपलें काम भागवितो, त्याची भावशुद्धि होते. (१७) शिवधर्मोत्तरांत सांगितलें आहे कीं, हीं स्वरूपें डोळ्यांनीं मात्र दिसतात इतर इंद्रियांच्या द्वारानें दिसत नाहींत; तसें जो मनुष्य भावाच्या साधनावांचून शिवाची प्राप्ति करून घेऊं इच्छितो, त्यास ती होत नाहीं, कांतर तो श्रेष्ठ शिवभावाच्या साधनानेंच जाणण्यासारखा आहे. (१८) पार्वती म्हणाली हे परमेश्वरा, भीमेश्वरा, इष्टलिंग हें तर शरीराच्या बाहेरचे बाजूस

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

बाह्यांगे दृश्यते लिंगं प्राणो देहस्य मध्यतः ॥ प्राणस्य लिंगसम्बंधं ब्रूहि मे परमेश्वर ॥१८॥ ईश्वर उवाच ॥ यथा कुंभे जलं देवि लीयते ह्यग्निसंघटात् ॥ ज्ञानबाह्यक्रियावेद्यात्तत्प्राणो लिंगवेदितः ॥१९॥ भक्तदेहो लिंगदेहस्तत्प्राणो लिंगप्राणवत् ॥ उभयं लिंगसंगं च सर्वांगं लिंगमेव च ॥२०॥ करस्थलगतं लिंगं हृदः स्थाने विनिक्षिपेत्॥मनः प्राणश्च भावश्च ज्ञानज्योतिप्रकाशकः ॥२१॥ वीरागमे ॥ स्थूलं सूक्ष्मं परं लिंगं लिंगप्राणस्वरूपकम् ॥ सर्वांगं लिंगसंपूर्णमिति ज्ञाता सुखी भवेत् ॥२२॥ ग्रन्थान्तरे ॥ प्राणभावं परित्यज्य शिवभावमनुस्मरेत् ॥ शिवभावानुसंधानाच्छिवो भावे प्रकाशते ॥२३॥ सूतसंहितायाम् ॥ विकल्परहितं तत्वं ज्ञानमानन्दमद्वयम् ॥ ये पश्यन्ति विमुक्तास्ते जीवन्तोऽपि न संशयः ॥२४॥ विश्वकारिकायाम् ॥ गोदोहमिषुपातं वा नयनोन्मेषमात्रकम्॥ सकृत्परपदे युक्तो न पुनर्भवमाप्नुयात् ॥२५॥ कामिकागमे ॥ ज्ञा-

---

असतें, आणि प्राण हा शरीराच्या आंत असतो; त्या इष्टलिंगाचा आणि प्राणाचा संयाग कसा होतो हें मला सांग. (१९) शंकर ह्मणतात- पार्वती, जसें घागरींतील पाणी विस्तवावर ठेवून तापविलें म्हणजे आटून जातें; तसा ज्ञान आणि बाह्यक्रियेच्या साधनानें तो भक्ताचा प्राण लिंगासारखा होतो. (२०) भक्ताचें शरीर हें लिंगशरीर आहे, भक्ताचा प्राण हा लिंगप्राण आहे; दोन्हीही लिंगाशीं मिळालीं असल्यानें भक्ताचें सर्व अंगही लिंगच आहे. (२१) भक्तानें आपल्या हातांत असलेलें इष्टलिंग हृदयांत ( मनांत ) ठेवावें. मन, प्राण, आणि भाव हे ज्ञानज्योतीचा प्रकाश करणारे आहेत (२२) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, स्थूललिंग, सूक्ष्मलिंग, आणि कारणलिंग हे लिंगस्वरूप आणि प्राणस्वरूप आहेत, आपलें सर्व अंगही लिंगस्वरूप आहे; असें जाणणारा सुखी होतो. (२३) इतर ग्रंथांत ह्मटलें कीं प्राणाविषयीं आपली समजूत सोडून देऊन शिवाविषयीं आपली समजूत नेहमीं मनांत आणीत जावी; शिवस्वरूपाचा विचार नेहमीं मनांत आणल्यानें भावांत शिव स्पष्ट दिसूं लागतो. (२४) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, शिवतत्वाला कोणत्याही प्रकारचा विकल्प नाहीं. तें ज्ञानस्वरूप आणि आनंदस्वरूप आहे; तें अद्वय ( एक ) आहे; असें जे लोक ज्ञानदृष्टीनें पाहतात ते जिवंत असले तरी मुक्तच आहेत, ह्यांत शंका नाहीं. (२५) विश्वकारिकेंत ह्मटलें आहे कीं, गाईची धार काढीपर्यंत, बाण सोडणारानें ज्यावर बाण सोडला त्यास तो जाऊन लागेपर्यंत व डोळ्याची पापणीस पापणी लावून उघडी होईपर्यंत जो कोणी मनुष्य एकवेळ श्रेष्ठतत्वाकडे (श्रीशिवाकडे) आपलें लक्ष लावितो; तो पुनः जन्ममरणाचे फेऱ्यांत पडत नाहीं. (२६) कामि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नातीतं परं तत्वं केवलं सर्वतोमुखम् ॥ केवलात्मस्वरूपं तु ज्ञानरूपेण भावयेत् ॥२६॥ चंद्रावलोकने ॥ यत्र दृष्टिर्मनःस्थैर्यं यत्र चैव हि मारुतः ॥ लीनः क्वापि भवेदेवं तस्यायं स्यादनुग्रहः ॥२७॥ वीरागमे॥ सर्वतत्वमयः प्राणः सर्वज्ञानमयः शिवः ॥ अनयोर्योगमेवैतत्प्राणलिंगमिहोच्यते ॥२८॥ शिवधर्मे ॥ ज्योतिस्मरणमात्रेण न क्षीयति यथा तमः ॥ तथा सुज्ञानरहितैः क्रियाद्यैर्न शिवो भवेत् ॥२९॥ सिद्धांतरहस्ये ॥ न शास्त्रोक्तैश्च नियमैर्नियम्यं क्वापि तर्हि चेत् ॥ ज्ञानेनाराधनं शंभोरिदमव्याकुलात्मनः ॥३०॥ शिवरहस्ये ॥ अष्टविधार्चनं कुर्यादिष्टलिंगस्य पूजनम् ॥ तल्लिंगं मनुते यस्तु प्राणलिंगस्य पूजनम् ॥३१॥ ते च नेत्रे शुभायालं याभ्यां संदृश्यते शिवः ॥ तथा चावेहि धर्मेश्च तत्पूजाकारिणौ करौ ॥३२॥ ॥ ग्रन्थान्तरे॥ देहो देवालयं प्रोक्तो जीवो देहस्तथा शिवः॥

---

कागमांत झटलें आहे कीं, शिवतत्व हें सर्वांहून श्रेष्ठ आहे, तें ज्ञानाहून पलीकडे आहे ( ज्ञानशक्तीच्या बाहेर आहे ), तें फक्त एक असून त्याला चोंहोकडे तोंडें आहेत. केवल आत्मस्वरूप आहे. त्याची ज्ञानस्वरूपानें कल्पना करावी. (२७) चंद्रावलोकनांत झटलें आहे कीं, ज्या पुरुषाची दृष्टि आणि मन हीं शिवतत्वांत स्थिरपणा पावतात, व ज्याचा प्राणवायु देखील त्यांत लय पावतो; त्या पुरुषाला प्राणलिंग हाच अनुग्रह होय. यापासून त्याला बाध होतो. (२८) वीरागमांत झटलें आहे कीं, प्राण हा सर्व तत्वस्वरूप आहे, शिव हा सर्व ज्ञानस्वरूप आहे; त्या प्राणाचें आणि शिवाचें एक जागीं ऐक्य होणें ह्यालाच येथें प्राणलिंग असें ह्मणतात. (२९) शिवधर्मांत झटलें आहे कीं, प्रकाशाचें नुसतें स्मरण केल्यानें जसा अंधार नाहींसा होत नाहीं; त्याचप्रमाणें ज्ञानरहित क्रिया केल्यानें प्राणी शिव होत नाहीं. (३०) सिद्धान्तरहस्यांत झटलें आहे कीं, ज्याच्या आत्म्याला कोणत्याही प्रकारची व्याकुलता नाहीं अशा शिवयोग्याला शंकराची पूजा ज्ञानानें होते. शास्त्रांत सांगितलेल्या पूजा नियमांनीं तो बांधला जात नाहीं. (३१) शिवरहस्यांत झटलें आहे कीं, आठ प्रकारांनीं यथाविधीनें इष्टलिंगाचें पूजन करावें. या इष्टलिंगाचें ध्यान कलें ह्मणजे तेंच प्राणलिंगाचें पूजन होतें. (३२) ज्या दोन डोळ्यांनीं श्रीशिवाची मूर्ति पाहिली, तेच दोन डोळे धन्य होत. तसेच हे धार्मिक मनुष्या, त्या शिवाची पूजा ज्या हातांनीं होत असेल, ते दोन हातच धन्य होत. त्या डोळ्यांचें व हातांचें सार्थक्य झालें. (३३) दुसरे ग्रंथांत सांगितलें आहे कीं, शरीर हें देवाचें मंदिर आहे, जीव हा पूजक असून शिव हा देव आहे; त्या देवाचा अज्ञानरूप निर्माल्य काढून टाकून, जीवानें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्यक्त्वा चाज्ञाननिर्माल्यं सोऽहंभावेन पूजयेत् ॥३३॥ शिवरहस्ये॥स्तंभौ पादौ गृहं देहः शिरः कलशमेव च॥जिव्हा घंटा समाख्याता पीठं हृदयपंकजम् ॥३४॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ आत्मा त्वं मतिरंबिका परिचराः प्राणाः शरीरं गृहं पूजा ते विपयोपभोगरचना निद्रा समाधिस्थितिः ॥ संचारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शंभो तवाराधनम् ॥३५॥ शांतिर्वारि सुखं शमस्सुमनसः श्रीखण्डपिण्डाक्षता ज्ञानं केसरमात्मनैव कुसुमं धूपं भवेत्सौरभम् ॥ दीपः कांतिरथार्चनारतिमहानैवेद्यरूपं ततस्तांबूलं निजभक्तिरागरसपवेत्यष्टधा पूजनम् ॥३६॥ शिवधर्मे ॥ अहिंसा प्रथमं पुष्पं पुष्पमिंद्रियनिग्रहः ॥ सर्वभूतदयापुष्पं क्षमापुष्पं चतुर्थकम् ॥३७॥ध्यानं पुष्पं तपः पुष्पं ज्ञानं पुष्पं तु सप्तकम् ॥ सत्यं चैवाष्टमं पुष्पमेभिस्तुष्यति शंकरः

---

तो शिवच मी आहें अशा समजुतीनें, शिवाची पूजा करावी. (३४) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, आपले दोन पाय हे शिवमंदिराचे दोन खांब आहेत, शरीर हें शिवमंदिर आहे, आपलें मस्तक हें त्या शिवालयाचें शिखर आहे जीभ ही घंटा आहे, असें ह्मणतात, आणि हृदयकमळ हें त्या शिवाचें सिंहासन आहे. (३५) वातुलांत ह्मटलें आहे, हे शंकरा, आत्मा हाच तूं आहेस, बुद्धि ही पार्वती आहे, पांच प्राण हे सेवा करणारे आहेत, शरीर हें घर आहे, विषयोपभोगाची व्यवस्था ही तुह्मी पूजा आहे, निद्रा हीच समाधि आहे, पायांनीं इकडे तिकडे फिरणें हीच प्रदक्षिणा आहे, मी जितकें कांहीं बोलतों चालतों तितकें सर्व बोलणें तुझें स्तवन आहे; सारांश, हे परमेश्वरा, मी जें जें कांहीं करितों तें तें सर्व कृत्य तुझें पूजन आहे असें समज. (३६) हे श्रीशंकरा, तुझ्या पूजनाचे वेळीं शांति हें पाणी होय, शम हा गंधाचा गोळा आहे, चांगल्या मनाचें सुख हें अक्षता होत, ज्ञान हें केसर असून आत्मा हें फूल आहे, आणि चांगली वासना हा धूप आहे, कांति हा दीप आहे, पूजा करण्याची आवड हा महानैवेद्य आहे, आणि आपल्या भक्तीचे प्रेमाचा उमाळा हा विडा आहे. असें हें आठ प्रकारचें शिवपूजन आहे असें समजावें. (३७) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं, कोणाचीही प्राणहानि करावयाची नाहीं, हा नियम हें शंकरास पहिलें फूल आहे; आपलीं इंद्रियें आपले स्वाधीन ठेवणें, हें दुसरें फूल आहे; सर्व प्राणिमात्रांवर दया करणें, हें तिसरें फूल असून, क्षमा हें चवथें फूल आहे; (३८) ध्यान हें फूलच आहे, तपश्चर्या हें फूलच आहे, ज्ञान हेंही एक फूलच आहे, व खरेपणा हें आठवें फूल आहे. अशीं हीं आठ प्रकारचीं फुलें वा-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥३८॥ वृत्तम् ॥ हृत्पद्मं शिवधर्मकन्दसहित सुज्ञाननालं तथा नित्यैश्वर्यदलाष्टकं शशिनिभं वैराग्यसत्कर्णिकम् ॥ श्रीरुद्रांचितकेसरान्वितमिदं संचिन्त्य तन्मध्यमे सूर्येंदूज्वलवन्हिमण्डलगतं ध्यायेच्छिवं चिन्मयम् ॥३९॥ मूलकन्दादण्डलग्नां ब्रह्मनाडीं शशिप्रभाम् ॥ तस्य मध्ये तडित्कोटिनिभां तामूर्ध्वगामिनीम् ॥४०॥ मनसा लक्षयेन्मूर्तिं सदृशीं बिसतन्तुना ॥ आब्रह्मरन्ध्रपर्यन्तं गतां सिद्धिप्रदां स्मरेत् ॥४१॥ वृत्तम्॥ इडा स्मृतेंदुरिति सूर्यसुतेति योगात्सा पिंगलेन इति विष्णुपदीति तासाम्॥सा मध्यमाग्निरिति योनिरिति त्रिवेणी योगस्थलं तदिदमेव भवेत्रिकूटम् ॥४२॥ तस्मात्रिकूटनामापि त्रिवेणीसंगमस्थलम् ॥ शृंगाटकचतुःपीठं नामान्येकस्थलस्य हि ॥४३॥ वृत्तम् ॥ यत्तं शिवं केवलचित्स्वरूपं सूर्येंदुवैश्वानरमण्डलस्थम् ॥ गुरुप्रसादात्रिमलक्षयत्वाद्ध्यात्वा यजेन्मो-

---

हिल्यानें श्रीशंकर प्रसन्न होतो. (३९) हृदय हें कमळ आहे, शिवधर्म हा त्या कमळाचा कांदा आहे, उत्तम प्रकारचें ज्ञान हें त्या कमळाचा देंठ आहे, नित्य असणारें ऐश्वर्य हीं त्या कमळाचीं आठ पानें होत; तें चंद्रासारखें पांढरें शुभ्र असून वैराग्य ही त्याची कळी आहे; श्रीरुद्र हें त्या कमळांतील केसर होय. अशी कमळाची कल्पना करून त्या कमलांत सूर्य, चंद्र आणि लखलखीत विस्तवाची ज्योति ह्यामध्यें असलेल्या शिवाचें ध्यान करावें. तो शिव परमेश्वर चैतन्यस्वरूप आहे. (४०) मूलकंदापासून अंडास लागलेली ब्रह्मनाडी आहे ती चंद्राप्रमाणें स्वच्छ आहे त्या ब्रह्मनाडींत ( मूलकंदांत ) एक कोटि विजांसारखी लखलखीत व वर जाणारी (४१) एक मूर्ति मनांत आणावी; ती मूर्ति कमळाच्या देंठासारखी नाजूक आहे, ती ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोंचलेली आहे, व तिचें स्मरण केलें असतां आपलें इच्छित सिद्धीस जातें. त्या मूर्तीचें स्मरण करावें. (४२) इडा नाडीस चंद्रनाडी ह्मणतात, आणि यमुना नाडी असेंही ह्मणतात; पिंगला नाडीस सूर्यनाडी आणि भागीरथीनाडी असें ह्मणतात; आणि मधल्या सुषुम्नानाडीस अग्निनाडी आणि योनिनाडी असें ह्मणतात; ह्या तिन्ही नाड्या एकत्र होणें याला त्रिवेणी संगम असें ह्मणतात. आणि त्याच ह्या त्रिकूटाला योगस्थल असें नांव आहे. (४३) ह्यासाठींच त्रिकूट, त्रिवेणीसंगमस्थल, आणि शृंगाटक चतुःपीठ, हीं तिन्ही नांवें एकाच जागेचीं होत. (४४) शिव हा केवळ चित्स्वरूप आहे, तो सूर्य, चंद्र आणि लखलखीत विस्तव ह्यांचे मध्यभागीं राहतो; जो कोणी मनुष्य गुरूच्या कृपेमुळें आणवमल, मायामल, आणि कार्मिकमल ह्यांचा नाश करून घेऊन यथाविधीनें ध्यान करून त्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्षसुखं स याति ॥४४॥ श्रुतिरथर्वणे ॥ ॐकारस्य हृदयस्थाने अणुचक्रं जनितं अणुचक्रे पश्चिमं जनितं पश्चिमे शिखा जनिता शिखायां ब्रह्म जनितं ब्रह्मणि आग्नेयं जनितं आग्नेयाद्विशुद्धिर्जनिता विशुद्धेश्च अनाहतं जनितं अनाहतान्मणिपूरकं जनितं मणिपूरकात्स्वाधिष्ठानं जनितं स्वाधिष्ठानादाधारं जनितम् ॥४५॥ ग्रन्थान्तरे ॥ अणौ च निष्कलं चैव निरालं च सुरालकम् ॥ चरमार्यं परं चैव नादबिन्दुकलानि च ॥ चक्रं नवविधं ज्ञेयं निष्कलं चेति कथ्यते ॥४६॥ अणौ च त्रिशतं प्रोक्तं निष्कलं लक्षमेव च ॥ निरालं कोटिसंख्यातं सुरालं चार्बुदं तथा ॥४७॥ कलं च खर्वं संख्यातं बिंदु चैव महाक्षितिः ॥ नादश्च पद्मसंख्याको महापद्मं च गौरवम् ॥ चरं च क्षितिसंख्याकं परं चैव महाक्षितिः ॥४८॥ वातुले ॥ शरधिर्निर्झरो मेघो मुरजौ भेरिकाहलौ॥ घंटाशंखस्तथा चैतौ वासः किंकिणिका तथा ॥ भ्रमरो वैणिकश्चेति नादा द्वादश कीर्तिताः ॥४९॥ घोषो रवः स्वरः शब्दः स्फोटाख्यो ध्वनिरेव च॥ झंकारो भांकृ-

---

शिवाचें पूजन करितो; तो मोक्षास जातो. (४५) अथर्वणश्रुतींत ह्मटलें आहे कीं, ॐकाराचें हृदय हें स्थान आहे, त्या ठिकाणीं अणुचक्र उत्पन्न झालें, अणुचक्रांत पश्चिमचक्र उत्पन्न झालें, पश्चिमचक्रांत शिखा झाली, शिखेंत ब्रह्म झालें, ब्रह्मांत आग्नेयचक्र झालें, आग्नेयापासून विशुद्धि झाली, विशुद्धीपासून अनाहतचक्र झालें, अनाहतचक्रापासून मणिपूरक चक्र झालें, मणिपूरक चक्रापासून स्वाधिष्ठानचक्र झालें आणि स्वाधिष्ठानचक्रापासून आधारचक्र झालें. (४६) इतर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, अणुचक्रांत निष्कल, निराल, सुराल, चर, आर्य, पर, नाद, बिंदु, आणि कला अशीं नऊ प्रकारचीं चक्रें उत्पन्न झालीं; त्या नऊ चक्रांस निष्कल असेंही ह्मणतात (४७) अणुचक्रांत तीनशें चक्रें आहेत, निष्कलांत एक लक्ष चक्रें आहेत, निराल चक्रांत कोटि चक्रें आहेत, तशींच सुरालचक्रांत अर्बुद चक्रें आहेत, (४८) कला चक्रांत खर्व भेद चक्रें असून बिंदुचक्रांत जलधि चक्रें आहेत, नादचक्रांचीं संख्या एकपद्म असून गुरु आणि चरचक्रांची संख्या पृथ्वीसंख्येइतकी आहे, आणि परचक्रांची संख्या महापृथ्वीइतकी आहे. (४९) वातुलांत ह्मटलें आहे कीं, बाण भात्याचा आवाज पाण्याच्या प्रवाहाचा आवाज, ढगांच्या गडगडण्याचा आवाज, मुरज ( मृदंगाचा एक प्रकार ) वाद्याचा आवाज, नगाऱ्याचा आवाज ढोलक्याचा आवाज घंटेचा आवाज, शंखाचा आवाज, वस्त्राचा आवाज, घागरींचा आवाज, भुंग्याचा आवाज, वेळूचा आवाज, असे आवाजाचे निरनिराळे बारा भेद आहेत. (५०) घोष, रव, स्वर, शब्द, टाळी वाजविण्याचा आवाज, झंकारशब्द, भंकारशब्द, असे आठ

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

तिश्चैव शब्दा एवाष्टधा स्मृताः ॥ स शिवः शिवतत्त्वस्थो हुंकृतिः प्रणवस्तथा ॥५०॥ योगसारे ॥ ईश्वर उवाच ॥ नादस्वरूपं वक्ष्येऽहं श्रृणु योगपरायण ॥ नादः पंचविधः प्रोक्तः शिवेन परमात्मना ॥५१॥ नादस्तथा सुनादश्च महानादस्तथा परः ॥ नादाग्रणीर्हि नादान्त्यः नादः पंचविधः स्मृतः ॥५२॥ बिंदुमध्यगतो नादो नाद इत्यभिधीयते ॥ नादः मध्यगतो बिन्दुः सुनाद इति कथ्यते ॥५३॥ कलामध्यगतो नादो महानाद इति स्मृतः ॥ नादाग्रणीरिति ख्यातो नादशक्तेस्तु मध्यतः ॥५४॥ सर्वेषां पूर्णभावस्तु नादान्त्य इति भण्यते ॥ एतन्नादानुसंधानं शिवयोगिहृदि स्थितम् ॥ सर्वं पूर्णस्वरूपेण वक्ष्येऽहं गोपितं श्रृणु ॥५५॥ वातुले ॥ बालसूर्यशरच्चंद्रविद्युत्स्फटिकतेजसः ॥ मौक्तिकज्योतिनक्षत्ररत्नोल्कावत् प्रकाशकाः ॥५६॥ वीरागमे ॥ श्रृणु देवि प्रवक्ष्यामि भवत्प्रश्नस्य निर्णयम् ॥ इदमात्मरहस्यं च मनोधर्मव्यवस्थितम् ॥५७॥ कुण्डलाख्या महानाडी नाभिदेशे प्रवर्तते ॥ अष्टवर्तुलसंयुक्ता कुण्डली गूढ-

---

प्रकारचे शब्द आहेत. तो शिव हा शिवतत्त्वांत राहतो; त्याचा आकार वकारासारखा किंवा ॐकारासारखा आहे. (५१) योगसारांत परमेश्वरांनीं ह्मटलें आहे कीं, हे योगशास्त्रांत दक्ष असणाऱ्या माझे भक्ता, ऐक. मी तुला नादाचें स्वरूप सांगतों शिवपरमात्म्यानें नाद हा पांच प्रकारचा आहे असें मानलें आहे. (५२) ते पांच प्रकार १ नाद २ सुनाद ३ महानाद ४ नादाग्रणी ५ नादांत्य हे होत. (५३) बिंदूच्या मध्यभागीं जो नाद असतो, त्यास नाद असें ह्मणतात. नादाच्या मध्यभागीं असणारे बिंदूला सुनाद असें ह्मणतात. (५४) कलेच्या मध्यभागीं जो नाद असतो, त्यास महानाद असें ह्मणतात. नादशक्तीच्या मध्यभागीं जो नाद असतो, त्यास नादाग्रणी असें ह्मणतात. (५५) सर्व नादांचा जो पूर्णपणा त्याला नादांत्य असें ह्मणतात. हें नादांचें लक्षण शिवयोगिलोकांचे मनांत पूर्णपणानें बिंबलेलें असतें. हें सर्व मी तुला सविस्तर रीतीनें सांगतों, तूं नीट लक्ष देऊन ऐक. (५६) वातुलांत सांगितलें आहे कीं, सकाळचा सूर्य, शरदृतूंतील चंद्र, विजेचा प्रकाश, आणि स्फटिक मण्याचीं अंगकांति, मोत्यांचें तेज, चांदण्या, रत्नें, आणि तारे ह्यांप्रमाणें तीं आधारादि पाथिमांतचक्रें तेजदार दिसतात. (५७) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात– पार्वती, तूं मला विचारलेल्या प्रश्नाचें मी तुला उत्तर देतों, नीट ऐकून घे. हें फार महत्वाचें आहे, हें अगदीं मनांत ठेविलें पाहिजे. (५८) कुंडली नांवाची एक मोठी नाडी आहे, ती प्राणिमात्रांच्या बेंबींत राहते; तिचीं आठ वेंटाळीं

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

सर्पवत् ॥५८॥ वृत्तम् ॥ प्रसुप्तनागेंद्र इव श्वसन्ती सदा प्रबुद्धा प्रभया ज्वलन्ती ॥ नाभौ सदा तिष्ठति कुंडली सा तिर्यक्षु देहेषु तदेतरेषु॥५९॥ अन्तर्विद्रुमभासमानभुजगीसूत्रौतवर्णोज्वलामारोहादवरोहतः शतमयीं वर्गाष्टकाष्टोत्तराम् ॥ हंसब्रह्मविदेहमेरुशिखरां श्रीमातृकाक्षावलीं नित्यं नौमि विचित्रमंत्रजननीं ज्ञानैकदीपांकुराम् ॥६०॥ आधारस्थानमाद्यं स्यात्स्वाधिष्ठानं द्वितीयकम् ॥ नाभिस्थानं तृतीयं स्यादुदरं तु चतुर्थकम् ॥६१॥ हृदयं पंचमं स्थानं कण्ठं षष्ठमुदीरितम् ॥ भ्रूमध्यं सप्तमं स्थानं शून्यमष्टममुच्यते॥६२॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च शक्तिरीशो गुरुः शिवः॥सदाशिवः क्रमादेषां स्थानानामधिपा इमे॥६३॥आधाराज्जायते वर्णाश्रमधर्मादिकाः क्रियाः ॥ मायाव्यसनमोहाश्च स्वाधिष्ठा-

---

आहेत ती कुंडली नाडी वेंटाळीं घालून निजलेल्या नागिणीसारखी दिसते. (५९) ती कुंडली नाडी एखाद्या मोठ्या नागिणीसारखी सुसकारे टाकीत असते, ती नेहमीं सावधगिरीनें राहते; व ती मोठी तेजःपुंज दिसते. ती कुंडली नेहमीं मनुष्याच्या बेंबींत राहते, व पशुपक्ष्यांच्या आणि इतर जीवांच्या पोटांतही ती नाडी असते. (६०) पोंवळयाच्या आंतील भागाप्रमाणें शोभणाऱ्या नागिणीरूप दोऱ्यांत ओंवलेल्या मूल मातृकाक्षरांनीं जी शोभते, आरोहाच्या आणि अवरोहाच्या ( खालीं वर करण्याच्या ) क्रमानें शंभर अक्षरें जींत आहेत ( एकावन अक्षरांचा आरोह आणि एकावन अक्षरांचा अवरोह ह्या अक्षरांत "हं सं" हीं दोन अक्षरें मेरु असून ह्या दोन अक्षरांशिवाय बाकीचीं शंभर अक्षरें जपमालिकेंतील मणी असें समजावें, ) व कपासून क्षपर्यंतच्या अक्षरांचे आठ वर्ग मिळून एकशें आठ मणी जींत आहेत, हंस, ब्रह्म, विदेह, आणि मेरु, हे जिच्या शिखरावर आहेत, मातृकारूप मण्यांची पंक्ति जिच्यांत आहे, विचित्र मंत्रांची जी प्रत्यक्ष आईच आहे, जी ज्ञानरूपदीपाचा एक अंकुरच असल्याप्रमाणें दिसते, तिला मी दररोज नमस्कार करितों. (६१) आधारस्थान हें पहिलें स्थान आहे, स्वाधिष्ठान हें दुसरें स्थान होय. नाभिस्थान हें तिसरें स्थान असून उदरस्थान हें चवथें स्थान होय. (६२) हृदयस्थान हें पांचवें स्थान असून कंठ हें सहावें स्थान आहे, असें ह्मणतात. दोन भिवयांचे मधील जागा हें सातवें स्थान असून शून्यस्थानास आठवें स्थान असें ह्मणतात. (६३) आधारस्थानापासून शून्यस्थानापर्यंत जीं आठ स्थानें आहेत, त्या आठस्थानांचे अनुक्रमानें ब्रह्मदेव, विष्णु, रुद्र, शक्ति ईश, गुरु, शिव आणि सदाशिव हे आठ अधिकारी आहेत. (६४) आधारस्थानापासून वर्णधर्मांच्या आणि आश्रमधर्मांच्या वगैरे क्रिया होतात. माया ( कपट ), व्यसन ( दुःख ), मोह ( अज्ञान ) वगैरे क्रिया स्वाधि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नाद्भवन्त्यथो ॥६४॥ नाभिस्थानाद्भवत्येव तामसत्वमदादिकम्॥ क्षुत्पिपासादिका धर्मा ह्युदरस्थानसम्भवाः ॥६५॥ हृदयस्थानसम्भूतं भक्तिशांतिदयादिकम् ॥ शब्दशक्तिविरक्त्याद्याः क्रियाः कंठसमुद्भवाः ॥६६॥ ज्ञानप्रज्ञाप्रभावादि कर्म भ्रूमध्यसम्भवम् ॥ निश्चिन्तत्वसदानन्दौ शून्यस्थानसमुत्थितौ ॥६७॥ धर्मस्थानद्वयं त्वेषां मायास्थानद्वयं तथा॥भक्तिस्थानद्वयं चैव विरक्तेश्च तथा द्वयम् ॥६८॥ संसारो जायते सम्यगाद्यस्थानचतुष्टयात् ॥ निःसंसारित्वमेव स्यादूर्ध्वस्थानचतुष्टयात् ॥६९॥ अधमं मध्यमं चादिद्वयं त्वन्योन्यसंगतम् ॥ ऊर्ध्वद्वयं तथा युक्तमुत्तमंचोत्तमोत्तमम् ॥७०॥ आदिस्थानादिषट्कं स्याच्छक्तिबीजसमन्वितम् ॥ ततः शून्यस्थानयुगं शक्तिबीजविवर्जितम् ॥७१॥ स्कांदे ॥ उपरिष्टादथ ज्ञेयं कैलासनिलयाव्हयम् ॥ तत्पदं ब्रह्मरन्ध्राख्यं तन्निरालम्बनं स्मृतम् ॥७२॥ रुद्रजाबालोपनिषदि ॥ दहराकाशमध्यस्थसहस्रदलशोभिते ॥

---

ष्ठानस्थानापासून होतात. (६५) तामसपणाचीं कामें आणि गर्व वगैरे दुर्गुण हे नाभिस्थानापासून उत्पन्न होतात. भूक, तहान वगैरे विकार उदरस्थानापासून उत्पन्न होतात. (६६) भक्ति, शान्ति, दया वगैरे हृदयस्थानापासून उत्पन्न होतात; शब्द, शक्ति, आणि वैराग्य वगैरे क्रिया गळ्यापासून उत्पन्न होतात. (६७) ज्ञान, बुद्धि, पराक्रम, आणि कर्म वगैरे भोंवयांच्या मधील स्थानापासून उत्पन्न होतात; निश्चिन्तपणा, आणि नित्यानंद हे दोन गुण शून्यस्थानापासून उत्पन्न होतात. (६८) हीं जीं वर आठ स्थानें सांगितलीं त्यांपैकीं दोन धर्मस्थानें आहेत, दोन मायास्थानें आहेत, दोन भक्तिस्थानें असून दोन वैराग्यस्थानें आहेत. (६९) पहिली जीं चार प्रकारचीं स्थानें सांगितलीं त्या चार स्थानांपासून संसार उत्पन्न होतो. आणि पुढील जीं चार ऊर्ध्वस्थानें आहेत, त्यांपासून निःसंसारित्व ( वैराग्य ) उत्पन्न होतें. (७०) पहिलीं जीं जवळ जवळ दोन स्थानें आहेत त्यांपैकीं एक स्थान अधम असून एक स्थान मध्यम आहे, तशींच सर्वांचे वरचीं जीं दोन स्थानें जवळ जवळ आहेत त्यांपैकीं एक उत्तम असून दुसरें फारच उत्तम आहे.(७१)आदिस्थानापासून पुढील जीं सहा स्थानें आहेत, तीं सर्व स्थानें शक्तिबीजानें युक्त आहेत; आणि शेवटचीं दोन स्थानें ह्मणजे भ्रूमध्य आणि शून्यस्थान हीं शक्तिबीजरहित आहेत. त्या स्थानांत शक्तिबीज मुळींच नाहीं. (७२) ह्या आठ स्थानांपैकीं सर्वांवरचें जें शून्यस्थान ह्मणून आहे, त्या स्थानाला कैलासस्थान असें ह्मणतात. त्याच स्थानाला ब्रह्मरंध्र असें ह्मणतात, आणि तेंच निरालंबनस्थान होय. (७३) रुद्रजाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, दहराकाशामध्यें एक सुंदर कमळ आहे, त्याला एक हजार पाकळ्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्फुरत्केसरसंश्लिष्टकर्णिके च सरोरुहे ॥७३॥ सोमसूर्याग्निमण्डले दीपोपस्थायी निस्संगःकर्मसाक्षी परमात्मावतिष्ठते॥७४॥नारायणोपनिषदि ॥ वृत्तम् ॥ दहरं विपाप्मं परमेशभूतं यत्पुंडरीकं पुरमध्यसंस्थम् ॥ तत्रापि द-हे गगनं विशोकस्तस्मिन् यदन्तस्तदुपासितव्यम्॥७५॥ कठवल्ल्युपनिषदि ॥ तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टं गुहाहितं गव्हरेष्ठं पुराणम् ॥ अध्यात्मयोगाधिगमेन देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥७६॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ आधारे लिंगनाभौ हृदयसरसिजे तालुमूले ललाटे द्वे पत्रे षोडशारे द्विदशदशदले द्वादशार्धे चतुष्के ॥ वासान्ते बाधिलान्ते डफकठसहिते कण्ठदेशे स्वराणां हंसं तत्वार्थयुक्तं सकलदलगतं

---

आहेत. त्यांत केसर पुष्कळ असून त्याला कळी आहे. (७४) त्या कमलांत सूर्य, चंद्र आणि अग्नि ह्यांचें लखलखीत मंडळ आहे; तें कमल दीपाजवळ आहे, त्यांत निःसंग आणि सर्व कर्मांस साक्षीभूत असणारा परमेश्वर राहतो. (७५) नारायणोपनिषदांत सांगितलें आहे कीं, दहर हें निर्दोष आहे, तें प्रत्यक्ष परमेश्वरस्वरूप आहे; जें पांढरें कमळ आहे तोच नगराचा मध्यभाग होय. त्यांत परमेश्वर राहतो, त्यांतही दहर हें आकाश आहे. त्याठिकाणीं कोणतेंही दुःख नाहीं, त्याचे आंत परमेश्वर आहे त्याची उपासना करावी. (७६) कठवल्ल्युपनिषदांत ह्मटलें आहे कीं, तो परमेश्वर दिसण्याला फारच प्रयास आहेत, तो सहजरीतीनें दिसण्यासारखा नाहीं. तो फारच गुप्त आहे, त्याचे मागोमाग गेलें पाहिजे, तो गुहेंत राहतो, गुहेंत राहणें त्याला फारच आवडतें, तो परमेश्वर अनादिकालापासून आहे, तो देव आहे. त्याला जो कोणी धैर्यवान् मनुष्य आत्मज्ञानाचे साधनानें जाणतो, त्याचे हर्ष आणि शोक दोन्हीही नाहींसे होतात. (७७) वातुलागमांत ह्मटलें आहे कीं, आधारचक्र, स्वाधिष्ठानचक्र, मणिपूरकचक्र, अनाहतचक्र, विशुद्धिचक्र, आज्ञेयचक्र, यां चक्रांचीं उलटक्रमानें दळें सांगतात कीं, दोनदळ, सोळादळ, बारादळ, दहादळ, सहादळ, चारदळ, हीं त्यांचीं दळें होत. ह्यांमध्यें चार दळांच्या आधारचक्र कमलांत व इतर कमलांत अनुक्रमानें व श ष स या चार अक्षरांसहित, व "ब भ म य र ल" या सहा अक्षरांसहित, "ड ढ ण त थ द ध न प फ" या दहा अक्षरांसहित, "क ख ग घ ङ च छ ज झ ञ ट ठ" या बारा अक्षरांसहित "अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः" या स्वराक्षरांसहित, त्या त्या ठिकाणीं जें वर्णलिंग राहतें व दोन दळांच्या आज्ञेयचक्रांत "हं सः" या दोन अक्षरांसह जें राहतें, तें हंसस्वरूप असून सहाचक्रांच्या दळांमध्यें सदोदित राहणारें आहे, अशा त्या वर्णलिंगाला नमस्कार असो. जें हंसस्वरूप आहे तत्व आणि अर्थ ह्यांनीं युक्त आहे,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वर्णरूपं नमामि ॥७७॥ महाभारते ॥ त्यजेत्पुत्र गुदाधारं स्वाधिष्ठानं परित्यजेत् ॥ मणिपूरं परित्यज्य त्यजेत्पुत्र त्वनाहतम् ॥७८॥ न हृदे नासिकास्थाने न ब्रह्म नाभिमण्डले ॥ मृतः प्राणो गतो यत्र तत्र ध्यानं परित्यजेत् ॥७९॥ भवेत्स्वच्छन्ददेहश्च सर्वोपद्रववर्जितः ॥ अनेन विधिनैवास्ते योगींद्रो भुवि मण्डले ॥८०॥ तत्वसारे ॥ नेत्रमध्ये ततश्चित्तं स्वकीयं सन्निवेशयेत् ॥ सन्निवेश्य तथा तिष्ठेदेकचित्तः प्रसन्नधीः ॥८१॥ वीरागमे ॥ शिवज्ञानं शिवे भक्तिः शिवाचारः शिवव्रतम् ॥ शिवलिंगार्चनज्ञप्तिः शिवयोगो हि पंचधा ॥८२॥ देहेंद्रियादिवैराग्यं यम इत्युच्यते बुधैः॥ अनुरक्तिः परे तत्वे नियमः परिकीर्तितः ॥८३॥ सर्ववस्तुन्युदासीनभावश्चासनमुच्यते ॥ जगत्सर्वमिदं मिथ्या प्रतीतिः प्राणसंयमः ॥८४॥ चित्तस्यान्तर्मुखीभावः प्रत्याहारः स उच्यते ॥ चित्तस्य निश्चयो भावो धारणा सा निगद्यते ॥८५॥ सोऽहं चिन्मात्रमेवेति

---

जें सर्व वर्णांत राहतें त्याला मी नमस्कार करितों. (७८) महाभारतांत सांगितलें आहे कीं, हें मुला, गुदस्थानीं असणारे आधारचक्र सोडून द्यावें, स्वाधिष्ठानचक्र सोडून द्यावें; हे मुला, मणिपूरस्थान सोडून देऊन अनाहतस्थानही सोडून द्यावें. (७९) ब्रह्म हें हृदयांत नाहीं, नाकाचे जागीं नाहीं, व बेंबीच्या जागीं नाहीं, मेलेला प्राण जेथें गेला तें ठिकाण ( त्याठिकाणचें ध्यान ) सोडून द्यावें. (८०) जो योगीश्वर आहे त्याचें शरीर स्वतंत्र असतें, तो कधींही परतंत्र असत नाहीं; त्याला कोणत्याही रीतीचा उपद्रव होत नाहीं. आणि ह्यारीतीनेंच तो जमिनीवर ( पृथ्वीवर ) राहात असतो. (८१) तत्वसारांत सांगितलें आहे कीं, त्यानंतर योगसाधन करणारानें आपलें मन भोंवयांच्या मधल्या स्थानाकडे लावावें, आणि असें लक्ष लाविल्यावर एकाग्रमन करून शांतपणानें रहावें. (८२) वीरागमांत सांगितलें आहे कीं, शिवाचें ज्ञान, शिवाविषयीं भक्ति, शिवाचा आचार, शिवाचें व्रत, व शिवलिंगाचें पूजन करण्याचें ज्ञान, असा पांच प्रकारचा शिवयोग होय. (८३) शरीराचें आणि इंद्रियादिकांचें वैराग्य ह्यांस ज्ञानी लोक यम असें ह्मणतात; परतत्वाविषयीं प्रेमभाव ठेवणें ह्याला नियम असें ह्मणतात. (८४) सर्व पदार्थांविषयीं उदासीनपणाची बुद्धि असणें त्यास आसन ह्मणतात; हें सर्व जग खोटें आहे, हें कधींतरी नाश पावणारें आहे, असा पक्का अनुभव येणें ह्यास प्राणसंयम असें ह्मणतात. (८५) मनाची वृत्ति बाह्यवस्तूंकडून निघून अन्तर्मुख होणें ह्याला प्रत्याहार असें ह्मणतात. मनाच्या दृढनिश्चयाला धारणा असें ह्मणतात. (८६) तो मीच तें परब्रह्मस्वरूप आहे, असें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चिंतनं ध्यानमुच्यते ॥ ध्यानेन मिश्रितं सम्यक् समाधिरभिधीयते ॥८६॥ मैत्रेयोपनिषदि ॥ वृत्तम् ॥ समाधिनिर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत् ॥ न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदन्तःकरणेन गृह्यते ॥८७॥ योगसारे ॥ जीव (वः) प्राणपरिस्पन्दः परात्मा लिंगमीरितः ॥ उभयोरेकतावस्था स समाधिः प्रकीर्तितः ॥८८॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ स्वपरास्तेषु भूतेषु जगत्यस्मिन्समानधीः ॥ शिवोऽहमद्वितीयोऽहं समाधिः स परः स्मृतः ॥८९॥ मैत्रेयोपनिषदि ॥ लयविक्षेपरहितं मनः कृत्वा सुनिश्चलम् ॥ यदा यात्युन्मनीभावं तदा तत्परमं पदम् ॥९०॥ वीरागमे॥ पूजाकोटिसमं स्तोत्रं स्तोत्रकोटिसमो जपः ॥ जपकोटिसमं ध्यानं ध्यानकोटिमनोलयः ॥९१॥ योगजागमे ॥ अक्रियैव परा पूजा मौनमेव परो जपः ॥ अचिंतैव परं ध्यानमनिच्छैव प-

---

नेहमीं चिंतन करणें यास ध्यान ह्मणतात तें ध्यान ज्या स्थितींत चांगल्या रीतीनें मिळून गेलें असतें त्या स्थितीस समाधि असें ह्मणतात. (८७) मैत्रेयोपनिषदांत ह्मटलें आहें कीं, समाधीमुळें ज्याचें सर्व पातक नाहीं सारखें झालें आहे, व ज्यानें आपलें सर्व मन आत्मस्वरूपाकडेच लाविलें आहे, त्याला जें कांहीं सुख होतें तें सुख वाचेनें मुळींच सांगतां येत नाहीं. त्या सुखाचा अनुभव स्वतः मनानेंच घ्यावा लागतो. (८८) प्राणवायूचें चलनवलन होणें ह्याला जीव ह्मणतात, आणि परमात्म्याला लिंग असें ह्मणतात; व त्या जीवाचा आणि लिंगाचा समरसीभाव होणें ( ऐक्य होणें ) ह्याला समाधि असें ह्मणतात. (८९) अचिंत्यविश्वसादाख्यांत ह्मटलें आहे कीं, ह्या जगांत जे कोणी आपलें लोक आहेत आणि परके लोक आहेत, त्या सर्वांविषयीं सारखी बुद्धि ठेवणें, व मीच तो शिव आहे, माझ्याखेरीज दुसरा कोणी नाहीं, असें संतत ध्यान करणें, ह्यालाच श्रेष्ठ समाधि असें ह्मणतात. (९०) मैत्रेयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, लय आणि विक्षेप ह्या दोन अवस्था नसलेलें मन जेव्हां स्थिरपणा पावून उन्मनीभावास पावतें, तेव्हां त्या स्थितीला परमपद असें ह्मणतात. (९१) वीरागमांत सांगितलें आहे कीं, एककोटि पूजा केल्यानें जें फल मिळतें तेंच फळ एकवेळ शिवस्तवन केल्यानें मिळतें एक कोटिवेळ स्तवन केल्यानें जें फळ मिळतें तेंच फळ एकवेळ पंचाक्षरी मंत्राचा जप केल्यानें मिळतें, एक कोटिवेळ जप केल्यानें जें फळ मिळतें तेंच फळ एकवेळ ध्यान केल्यानें मिळतें, व एक कोटिवेळ ध्यान केल्यानें जें कांहीं फळ मिळतें तेंच फळ मनाचा लिंगस्वरूपांत लय करण्यानें मिळतें. (९२) योगजागमांत ह्मटलें आहे कीं, अक्रिया ( कांहीं एक कामधंदा वगैरे न करणें) हीच श्रेष्ठ पूजा होय. कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें बसणें हाच श्रेष्ठ जप आहे, मनामध्यें कांहींएक चिंता न करणें हेंच श्रेष्ठ ध्यान

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

रं पदम् ॥९२॥ वृत्तम् ॥ योगश्च निद्रा ऋतवश्चरित्रं स्वेच्छासनं देवमहानिवेद्यम् ॥ लीलार्पणं देव पवित्रदानं जपः प्रलापः शयनं प्रणामः ॥९३॥ कृतिः सेवा गतिर्यत्र मतिश्चिन्ता वचः स्तुतिः ॥ अहो सर्वात्मना शंभोः सुधियां सर्वदार्चनम् ॥९४॥ शिवरहस्ये ॥ या या चेष्टा समुत्पन्ना जायते शिवयोगिनाम् ॥ सा सा पूजनमीशस्य सर्वदा तद्गतात्मनाम् ॥९५॥ तत्वसारे ॥ पिण्डे मुक्ताः पदे मुक्ता रूपे मुक्ताः षडानन ॥ रूपातीते तु ये मुक्तास्ते मुक्तास्तृप्तिमागताः ॥९६॥ ईश्वर उवाच ॥ प्राणप्रयाणकालेषु लिंगभोगोपभोगिनः ॥ अर्पितस्सावधानेन स्वलिंगे प्राण आहितः ॥९७॥ अन्त्यकाले प्रबुद्धो यः सुहृदा बोधितोऽपि वा ॥ शिवमेकमनुध्यायेत्स याति परमं पदम् ॥९८॥ तस्यांगे भस्मरु-

---

असून मनांत कोणतीही इच्छा न करणें हेंच श्रेष्ठ स्थान आहे. (९३) हे परमेश्वरा, श्रीशंकरा, आह्मी जी झोंप घेतों तीच झोंप योग होय. आह्मी ज्या ज्या कांहीं गोष्टी करितों त्या त्या सर्व गोष्टी यज्ञ होत, आह्मी आपल्या आवडी प्रमाणें स्वेच्छेनें फिरतों तेंच देवाचा महानैवेद्य होय. आह्मी सहजरीतीनें केलेल्या लीलचें अर्पण हेंच दान होय. आह्मी जी कांहीं बडबड करितों तो जप असून आह्मी जें जमिनीवर लोळतों तोच नमस्कार होय. (९४) आह्मी जें कांहीं करितों ती सेवा होय. आह्मी जिकडे जातों तें आमचें शिवक्षेत्राकडे जाणें आहे. आमच्या मनांत जी जी कल्पना येते तें शिवस्वरूपाचें चिंतन होय. आह्मी स्वच्छंदपणानें जें जें कांहीं बोलतों तें तें शिवाचें स्तोत्र होय. सारांश, आश्चर्य हें आहे कीं, शिव परमात्मा हा सर्व ठिकाणीं व्यापला गेला असल्यामुळें, विद्वान् लोक जीं जीं कांहीं कर्मे करितात, तीं तीं सर्व शिवपूजन केल्याप्रमाणें होतात (९५) शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, शिवयोगी लोकांचें हातून जी जी कांहीं गोष्ट होते ती ती सर्व शिवपूजा केल्यासारखीच आहे; कांतर त्यांचें मन शिवस्वरूपांत लीन झालेलें असतें, शिवस्वरूपाखेरीज त्यांस दुसरें कांहींच दिसत नाहीं. (९६) तत्वसारांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात–मुला कार्तिकेया, पिंडांत जे मुक्त आहेत, पदांत जे मुक्त आहेत, रूपांत जे मुक्त आहेत, आणि रूपातीतांत जे मुक्त आहेत, ते ते सर्व मुक्त तृप्त झाले आहेत. (९७) ईश्वर ह्मणतात कीं, इष्टलिंग शरीरावर धारण करणाऱ्या लिंगायत मनुष्याचा प्राण जावयाच्या वेळीं त्यानें आपला प्राण सावधपणानें इष्टलिंगांत अर्पण करावा. (९८) जो कोणी मनुष्य मरणाच्या वेळीं स्वतः ज्ञानवान् असेल, किंवा त्याचे कोणी इष्टमित्रानें त्यास बोध केल्यामुळें तो सावधानमनानें एका शिवाचेंच चिंतन करील, तो मोक्षास जाईल. (९९) चांगल्या म-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्राक्षधारणं कारयेत्सुधीः ॥ शिवमंत्रं जपेत्कर्णे प्रयाणे मरुतस्तथा ॥ शुभमेव प्रकुर्वीत रोदनादीन्न कारयेत् ॥९९॥ मुकुटागमे ॥ ईश्वर उवाच ॥ गृहे गवालये वापि तटाके वा नदीतटे ॥ पुष्पवाट्यां ग्राममध्ये चारण्ये पर्वताश्रये ॥१००॥ अष्टस्थानप्रदेशेषु निक्षेपार्थं प्रकल्पयेत् ॥ चतुरस्त्रं पंचपादं विस्तीर्णं च तथैव च ॥१०१॥ खातं नवपदं प्रोक्तं तन्मध्ये च प्रयत्नतः ॥ त्रिपादवेदिकां कृत्वा तस्य दक्षिणतो दिशि ॥१०२॥ त्रिकोण्याकारखातं च त्रिपादं दीर्घमायतम् ॥ उन्नतं पौरुषं ज्ञेयं तत्र निक्षिप्य यत्नतः ॥१०३॥ गृहान्तरे प्रतिष्ठाप्य पद्मासनसमन्वितम् ॥ भस्मना हृदयान्तं च पूरयित्वा तथोपरि ॥१०४॥ शेषांगं भस्मना पूर्ये बिल्वपत्रेण संयुतम् ॥ मृत्तिकां पूरयेत्पश्चाद्वेदिकां कारयेत्ततः ॥१०५॥ शिवरहस्ये ॥ षडंगलिंगसंयुक्तषट्स्थलब्रह्मरूपिणाम् ॥ नैवावसानो देहस्य प्राकृतानामिवात्मनाम् ॥१०६॥ दग्धस्य दहनं नास्ति पक्व-

---

लुष्यानें त्या मरण पावणाऱ्या मनुष्याच्या शरीरास भस्म लावावें, व त्याचे अंगावर रुद्राक्षांची माळ घालावी आणि मरतेवेळीं त्याच्या कानांत शिवपंचाक्षरी मंत्राचा उपदेश करावा. त्याचे मरणाच्या वेळीं चांगलें मंगलकारक कृत्य करावें, दुःख करीत बसूं नये. (१००) मुकुटागमांत शिवांनीं ह्मटलें आहे कीं, घरांत, गाईच्या गोठ्यांत सरोवराच्या कांठीं, नदीच्या कांठीं, फुलबागेंत, गांवांत, अरण्यांत किंवा पर्वताजवळ (१०१) ह्या वर सांगितलेल्या आठ ठिकाणांपैकीं कोणत्यातरी एका ठिकाणीं त्या मरण पावलेल्या लिंगायतास पुरण्याची तजवीज करावी. त्याला पुरावयाची गार चौकोनी पांच पावलें भरतील इतक्या रुंदीची व इतक्याच लांबीची मोठी करावी. (१०२) ती पुरावयाची गार नऊ पावलें करावी आणि त्या गारींत मोठ्या सावधगिरीनें तीन पावलांइतकी वेदिका करावी, त्या वेदीच्या दक्षिणदिशेकडे (१०३) त्रिकोणाकृति एक कोनाडा करावा, तो तीन पावलें रुंद व त्याच मानानें लांब असावा. ती गार एक पुरुषभर उंच असावी त्या गारींत त्याला यथाविधीनें पुरवें. (१०४) त्रिकोणाकृति कोनाड्यांत त्यास पद्मासन करून बसवावें उराइतकें त्यास भस्मांत पुरावें व मग पुढें (१०५) बाकीचें अंगावरही भस्म पसरून त्यावर बेलाचीं पानें वहावीं आणि नंतर मातीनें ती गार चांगली बुजवावी आणि ती गार जमिनीबरोबर बुजविल्यावर त्या गारीवर ओटा करावा. (१०६) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जे लोक षडंगलिंगयुक्त आहेत, जे षट्स्थल ब्रह्मस्वरूप आहेत, त्यांच्या शरीराचा इतर सामान्य मनुष्यांच्या शरीराप्रमाणें नाश होत नाहीं. (१०७) जो पदार्थ एकवेळ शिजलेला आहे त्याला पुनः शिजविण्याचें कारण राहत नाहीं. एक-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्य पचनं यथा ॥ शिवज्ञानाग्निदग्धस्य पुनर्दाहो न विद्यते ॥१०७॥ वृत्तम् ॥ दग्धेऽपि देहे पुनरंगशेषो निक्षिप्यतेऽन्त्ये भुवि वा जले वा ॥ तस्माद्भिनिक्षेपविधिर्बलीयाग्नि·शेषभावादपुनर्विधानात् ॥१०८॥ शिष्यते चेद्वरं भूमौ खनने चांगलिंगयोः ॥१०९॥ शिवार्चनपरस्यास्य स्वेष्टलिंगमनुश्रुतम् ॥ पश्येदनिमिषं कृत्वा ( दर्शनानमिषंकृत्वा ) ह्यन्यदृष्टिर्न चापरा ॥११०॥ भारते ॥ वृत्तिहीनं मनः कृत्वा क्षेत्रज्ञं परमात्मनि ॥ एकीकृत्य निरीक्ष्येत योगमुक्तस्स भोगवान् ॥१११॥ तन्त्रावतारिकायाम् ॥ तद्देहमिंद्रियेणैव सर्वदा लिंगभोगिनः ॥ तन्मुखं पंचवक्त्रं च प्राणलिंगस्य लक्षणम् ॥११२॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ असन्नेव स भवत्यसद्ब्रह्मेति वेद चेदस्ति ब्रह्मेति चेद्वेद संतमेनं ततो विदुरिति त-

---

वेळ जो जळाला आहे त्यास पुनः जाळण्याचें कारण नाहीं. तसाच ज्या शिवयोग्याचा देह शिवज्ञानाग्नीनें एकवेळ चांगला जळालेला आहे त्यास पुनः जाळण्याचें कारण राहत नाहीं. (१०८) एखादें मृतशरीर जाळलें तरी त्या शरीरांतील हाडें वगैरे सर्व जळून जात नसल्यामुळें ते आस्थि पुनः चितेंतून शोधून काढून पाण्यांत टाकावे लागतात, किंवा जमिनींत खळगा खणून पुरून टाकावे लागतात. तेव्हां प्रथमच चांगला खोल खळगा खणून त्यांत तें मृतशरीर पुरणें फार श्रेयस्कर आहे. कांतर असें केल्यानें त्या शरीराचे उरलेले अवयव शोधून काढून जमिनींत पुरण्याचे किंवा पाण्यांत बुडविण्याचे श्रम करावे लागत नाहींत. (१०९) अग्नींत घालून प्रेत जाळलें तरी जर पुनः बाकी उरण्याचें भय आहेच तर त्यापेक्षां लिंगायत मनुष्याचें प्रेत प्रथमच जमिनींत खांच खणून पुरणें चांगलें. (११०) इष्टलिंग हें फार श्रेष्ठ आहे, जो मनुष्य शिवपूजा करण्यांत निमग्न असेल त्यानें आपल्या डोळ्याच्या पापण्यांस-पापण्या न लावतां सारखी इष्टलिंगाकडे दृष्टि लावावी. दुसऱ्या कोणत्याही वस्तूंकडे त्यानें पाहूं नये. (१११) मनाचे इतर सर्व व्यापार सोडून देऊन एकाग्रमन करावें. परमात्म्याचे ठिकाणीं क्षेत्रज्ञास ( आत्म्यास ) ऐक्य करून जो कोणी पाहतो, त्याला योगमुक्त आणि भोगवान् असें ह्मणावें. (११२) तंत्रावतारिकेंत ह्मटलें आहे कीं, नेहमीं इष्टलिंग शरीरावर धारण करणाऱ्या शिवयोग्याचीं सर्व इंद्रियें आणि शरीर हीं शिवस्वरूप आहेत. त्याचें तोंड प्रत्यक्ष श्रीशिव आहे. हेंच प्राणलिंगाचें लक्षण आहे. (११३) तैतरीयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जो प्राणी ब्रह्मवस्तूला असत्स्वरूपानें पाहतो, तो प्राणी असत्स्वरूपी होतो. जो प्राणी परशिवाला सत्स्वरूपानें पाहतो, तो सत्स्वरूपी होतो. याप्रमाणें जाणणाऱ्या पुरुषाचें शरीरच त्या परशिवाचें अंगस्वरूप

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्यैष एव शरीर आत्मा ॥११३॥ शंभुप्रभायाम् ॥ यल्लिंगं शुद्धदेहस्थम-लिंगं लिंगसंयुतम् ॥ तल्लिंगं विदितं येन सभवेदंगलिंगवान् ॥११४॥ यत्र लिंगे वरारोहे त्रैलोक्यं सचराचरम् ॥ तल्लिंगं पूजितं येन स भवेदं-गलिंगवान् ॥११५॥ यदा योगी निजं देहं शिवाय विनिवेदयेत् ॥ तदा भवति तद्रूपं शिवरूपं न संशयः ॥११६॥ स्कांदे ॥ चिन्तयामि शिवं केन जातं शिवमयं मनः॥ पयोनिमग्नवपुषः पयस्तृष्णा न जायते ॥११७॥ शिवयोगदीपिकायाम् ॥ वृत्तम् ॥ आमस्तकात्पादतलावसानमन्तर्ब-हिश्चर्मपटावबद्धम् ॥ तत्कृत्स्नमेवामृतरूपमाहुश्चिद्रूपमात्मानममर्त्यरू-पम् ॥११८॥ ईश्वर उवाच ॥ बहिस्थास्सर्वदा सर्वे त्वं नंदिगणनायकाः ॥ ममात्मा प्राणलिंगैक्यः स एवाहं न संशयः ॥११९॥

इति श्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्य वीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण्य-श्रीसिद्धवीरशिवयोगिविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे प्राणलिंगि-स्थलं नाम पंचविंशतितमं प्रकरणं समाप्तम् ॥

---

होऊन राहिलें आहे, असें वेद सांगतो. (११४) शंभुप्रभेंत ह्मटलें आहे कीं, जें लिंग ह्मणून कांहीं आहे तें निष्पाप शरीरांत राहतें. त्यास अलिंग असें ह्मणतात, तें लिं-गयुक्त असतें, तें लिंग ज्यानें यथार्थरीतीनें जाणलें त्यास अंगलिंगवान् असें ह्मणावें ( तो अंगलिंगि होय). (११५) शिव ह्मणतात—पार्वती, ज्या लिंगांत हें सर्व स्थावर जंगम त्रैलोक्य राहतें, तें लिंग ज्यानें पूजिलें तो अंगलिंगवान् असें ह्मणावें. (११६) जेव्हां योगी आपलें शरीर शिवास समर्पण करितो, तेव्हां तो शिवस्वरूप होतो. तो योगी शिवस्वरूपच आहे ह्यांत शंका नाहीं. (११७) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, मी शिवाचें कोणत्या रीतीनें ध्यान करूं? कांतर माझें मन शिवस्वरूपच झालें आहे, पाण्यांत अंग बुडवून बसलेल्या मनुष्याला पुनः पाणी पिण्याची इच्छा होत नाहीं. (११८) शिवयोगदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, मस्तकापासून तों तहत तळपायां-पर्यंत मनुष्याचें सर्व शरीर आंतून बाहेरून कातड्यानें मढविलेलें आहे तें सर्व श-रीर अमृतस्वरूप आहे, तें चिद्रूप आहे; आत्म्याला देवस्वरूप असें मानतात. (११९) शिव म्हणतात, नंदिकेश्वर वगैरे सर्व प्रमथगणांनो, तुह्मी सर्व जण बाहेर राहणारे आहां, प्राणलिंगाचीं ऐक्य पावलेला माझा भक्त प्रत्यक्ष माझा आत्मा आहे, तो मीच आहें ह्यांत शंका नाहीं.

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वरांत मुख्य आचार्य ह्मणविणाऱ्या वीरशैवांच्या षट्स्थलमार्गाची स्थापना करण्यांत पुढारीपण मिळविणाऱ्या श्रीसिद्धवीर नांवाच्या शिवयोगीश्वरानें के-लेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील प्राणलिंगिस्थल नांवाचें पंचविसावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

# ॥ शरणस्थलं प्रारभ्यते ॥

## ॥ षड्विंशतिप्रकरणम् ॥

एवं प्राणलिंगिस्थलमनुष्ठाय लिंगलीनसर्वावयववान् प्राणलिंगी सुज्ञानमुखेनानुष्ठाय समरसभूतभेदः कथमित्याकांक्षायामनन्तरं शरणस्थलमित्युच्यते ॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ ज्ञानप्रकाशबलतः स्वयमेव लिंगं देहेंद्रियादि मम रूपमिति प्रबुध्वा ॥ युक्ते समस्तविषयेऽसति यद्विशुद्धं तत्प्राहुरागमविदः शरणस्थलं हि ॥१॥ पतिर्लिंगं सती चाहमिति युक्तं सदा तथा ॥ पंचेंद्रियसुखं नास्ति शरणस्थलमुत्तमम् ॥२॥ वासिष्ठपुराणे ॥ ज्ञानरूपोऽगलिंगी स्यात्सती ज्ञेयः पतिः शिवः ॥ तयोर्योगेन सौख्यं यत्तद्वशाच्छरणाभिधा ॥३॥ वीरागमे ॥ शिवं शरणसम्बन्धं शरणं शिवसंयुतम् ॥ महाज्ञानेन संयोगः शरणं सकलनिष्कलम् ॥४॥ शिवधर्मपुराणे ॥ शिवांगं शरणस्साक्षाच्छरणांगं शिवो भवेत् ॥ शिव-

---

श्रीगुरूस नमस्कार असो. ह्याप्रमाणें प्राणलिंगिस्थलाचा अनुभव घेऊन ज्याचे सर्व अवयव लिंगस्वरूपांत समरसभाव पावले आहेत तो प्राणलिंगी उत्तम तऱ्हेच्या साधनानें समरससुखाचा अनुभव घेतो, त्या समरस सुखाची स्थिति कशी असते, अशी कल्पना मनांत आल्यावर आतां ह्यापुढें शरणस्थल ह्मणून स्थल आहे तें सांगतों. (१) वातुलांत सांगितलें आहे कीं, जो शिवयोगी ज्ञानतेजाच्या सामर्थ्यानें स्वतःच लिंगशरीर आहे; शरीर आणि इंद्रियें हीं सर्व माझेंच स्वरूप आहे असें जो मानतो; तो जरी सर्व प्रकारचीं विषयसुखें उपभोगीत असला तरी वास्तविक तो उपभोगीत नाहीं; तो फार निर्दोष स्वभावाचा असतो. अशी ज्या शिवयोग्याची स्थिति असते, त्याला शास्त्र जाणणारे विद्वान् लोक शरणस्थल असें ह्मणतात. (२) लिंग हें पति असून मी सती आहे, त्याची आणि माझी कधींही तुटातूट होऊं नये असें ज्यास वाटत असतें व ज्याला पंचेंद्रियांचें सुख मुळींच नाहीं, त्यास शरणस्थल असें ह्मणावें. हें स्थल सर्व स्थलांत उत्तम आहे. (३) वासिष्ठपुराणांत सांगितलें आहे कीं, मूर्तिमन्त ज्ञानी असा ह्या अंगलिंगी सती ( स्त्री ) आहे, आणि श्रीशिव ह्या पति आहे; त्या सतीपतींचा समागम झाला ह्मणजे परस्परांपासून परस्परांस जें सुख लागतें, त्या स्थितीला शरण असें ह्मणतात. (४) वीरागमांत सांगितलें आहे कीं, शिव नेहमीं शरणाशीं संबंध ठेवितो, आणि शरण नेहमीं शिवाशीं संबंध ठेवितो, शरण ह्या मोठा ज्ञानवान् आहे, तो सकल ( सप्रपंच ) आणि निष्कल ( निष्प्रपंच ) ही आहे. (५) शिवधर्मपुराणांत सांगितलें आहे कीं, शरण ह्या प्रत्यक्ष शिवाचें अंग

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शरणसमायोगे स्वेच्छाविग्रहधारिणौ ॥५॥ वासिष्ठपुराणे ॥ तस्य शून्यं च नाशून्यं न चिद्रूपं न चिन्मयम् ॥ आत्मरूपं नान्यरूपं भुवनं तस्य भासते॥६॥अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ समयानां तु सर्वेषां ज्ञानसारं परायणम् ॥ शिवानुभूतिसंयुक्तः संशयच्छिन्नसंशयः ॥७॥ शिवभावप्रकाशेन नष्टे भेदतमस्यथ ॥ पुनः स विमलो ह्येव शिव एव प्रकाशते ॥८॥ न चेंद्रियभवं दुःखं त्यक्त्वा देहाभिमानकम् ॥ देहाभिमानहीनस्य जीवभावस्थितात्मनः ॥९॥ वासिष्ठे ॥ वृत्तम् ॥ संकोचमाचरति तत्कमठोंगकानामंगे यथा भुवि तथा निखिलेंद्रियाणि ॥ प्रत्याहरत्यनिशमात्मनिशायितात्मा जानीमहे परमतत्वमिदं तमेव ॥१०॥ त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं हृदींद्रियाणां मनसा निवेश्य ॥ ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वान्

---

आहे, आणि शिव हा शरणाचें अंग आहे; शिवाचा आणि शरणाचा नेहमीं सहवास असतो. ते दोघेही आपल्या इच्छेप्रमाणें शरीर धारण करितात. (६) वासिष्ठपुराणांत सांगितलें आहे कीं, त्या शरणाला शून्यही नाहीं आणि अशून्यही नाहीं, चिद्रूप नाहीं आणि चिन्मयही नाहीं, त्या शरणाला सर्व त्रैलोक्य आत्मस्वरूपच आहे, असें वाटतें, आत्मस्वरूपाखेरीज त्याला दुसरें कांहीं एक दिसत नाहीं. (७) अचिंत्यविश्वसादाख्य ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, तो शरण सर्व प्राणिमात्रांशीं समानभावानें वागतो, त्याला कोणी जास्ती नाहीं कोणी कमी नाहीं, त्याचें ज्ञान हें मुख्य तत्व आहे ( तो मोठा ज्ञानी असतो ) तो सर्व कामांत प्रवीण असतो, त्यास शिवानुभव झाला असतो, व त्याचे सर्व संशय दूर झालेले असतात, त्याचे मनांत कोणताही संशय नसतो. (८) शिवानुभवरूपदीपाच्या प्रकाशानें भेदरूपी अंधःकार नाहींसा झाल्यावर, पुनः तो निष्पाप असा श्रीशिवच स्पष्ट दिसावयास लागतो. (९) शरीराचाच अभिमान सोडून दिला, ह्मणजे इंद्रियांपासून उत्पन्न होणारें दुःख मुळींच होत नाहीं; ज्याचा देहाभिमान नाहींसा झाला आहे, त्याचा जीव आत्मस्वरूप पावला आहे असें मानावें. (१०) वासिष्ठपुराणांत सांगितलें आहे कीं, जसें कांसव आपलें अंग आपल्याच अंगांत आंखडून घेतें, त्याप्रमाणें ह्या जगांत जो शिवयोगी असेल तो आपलीं सर्व इंद्रियें आत्मस्वरूपांत लय करितो; आणि आत्मसुखांत निमग्न असतो. त्यालाच कायतें मुख्य तत्व समजलें, व त्या शिवयोग्यालाच आह्मी मानतो. (११) विद्वान् मनुष्य आपलें तीन ठिकाणीं उंच असणारें सर्व शरीर सारखें ताठ करून, शरीर इंद्रियें आणि मन एकाग्र करून योगसाधन करितो; आणि ब्रह्मरूपी नावेच्या साधनानें भयंकर भयंकर असे जन्म मरण वगैरे भवसमुद्रांतील

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ॥११॥ शिवाद्वैते ॥ बहिर्मुखानींद्रियाणि जनयन्ति भवोदयम् ॥ अन्तर्मुखानि तान्येव संसारक्षयहेतवः ॥१२॥ स्कांदे ॥ मनोबुद्धिरहंकारश्चेंद्रियाणि गुणत्रयम् ॥ न स्पृशन्ति महात्मानं विकारस्तस्य नैव हि ॥१३॥ सिद्धांतरहस्ये ॥ पृथिव्यां यानि भूतानि जिव्होपस्थपराणि च ॥ जिव्होपस्थपरित्यागी निर्देही स महेश्वरः ॥१४॥ स्वच्छन्दललितभैरवे ॥ वृत्तम् ॥ न शब्दनं चाभिरतस्य मोक्षे न चास्य रम्यं वसनं प्रियं स्यात् ॥ न भोजनाच्छादनकाममस्य न लोकचिंताग्रहणं च तस्य ॥१५॥ अरिषड्वर्गसंदग्धं संहृत्या च षडूर्मिकम् ॥ पंचकोशं परित्यज्य क्लेशपंचकनाशनम् ॥१६॥ सौरसंहितायाम् ॥ वेदशास्त्रपुराणाद्याः स्पष्टा वेश्यांगना इव ॥ या पुनः शांकरी

---

प्रवाह तरून जातो. (१२) शिवाद्वैतांत सांगितलें आहे कीं, आपलीं हीं इंद्रियें बहिर्मुख ( विषयसुखाकडे गेलीं ) झालीं, म्हणजे तीं संसार वाढविण्यास कारण होतात; आणि तींच इंद्रियें अन्तर्मुख ( विषयसुखाविषयीं पराङ्मुख होऊन आत्मस्वरूपाकडे लागलीं ) झालीं, म्हणजे मोक्षप्राप्तीस कारण होतात. (१३) स्कंदपुराणांत सांगितलें आहे कीं, मन, बुद्धि, गर्व, पांच ज्ञानेंद्रियें, आणि पांच कर्मेंद्रियें, सत्व, रज, तमोगुण वगैरे विकार त्या महात्म्या शरणाला मुळींच असत नाहींत; शरणाला कोणताही विकार होत नाहीं. (१४) सिद्धान्तरहस्यांत सांगितलें आहे कीं, पृथ्वीवर जितके कांहीं प्राणिमात्र आहेत, तितके सर्व जिभेस आणि विषयसुखास लंपट झालेले आहेत; जिभेच्या आणि विषयसुखाच्या पाशांत जो सांपडला नाहीं, तो प्रत्यक्ष श्रीशंकर आहे असें समजावें. (१५) स्वच्छंदललितभैरवांत सांगितलें आहे कीं ज्या शिवयोग्याला मोक्षसुखाची वास्तविक योग्यता समजली असते म्हणून त्या मोक्षसुखावर ज्याची आवड बसलेली असते, त्याला मंजुलस्वराचें गायन आवडत नाहीं, सुशोभित असें वस्त्र आवडत नाहीं, त्याला जेवणखाण व आंथरूणपांघरूण मनापासून मुळींच आवडत नाहीं, व इतर लोक संसारासंबंधाची जी कांहीं चिंता करितात, ती चिंताही तो करीत नाहीं. (१६) त्याचे काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर अहंकार वगैरे सहा शत्रु जळून जातात, त्याची भूक, तहान, आशा, म्हातारपण, जन्ममरण वगैरे षडूर्मि नाहींशा होतात, त्याचे अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय, हे पांच कोश दूर होतात, आणि त्या शरणाचे ( शिवयोग्याचे ) पांच प्रकारचे क्लेश ( अविद्या, अस्मित, राग, द्वेष, अभिनिवेश ) दूर होतात. (१७) सौरसंहितेंत म्हटलें आहे कीं, वेद, शास्त्रें, पुराणें वगैरे ज्या कांहीं विद्या आहेत, त्या सर्व वेश्यांप्रमाणें सारख्या आहेत; जी शिवविद्या त्यांवाची एक विद्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विद्या गुप्ता कुलवधूरिव ॥१७॥ योगार्णवे ॥ वर्णाश्रमाभिमानेन श्रुतेर्दासो भवेन्नरः ॥ अभिमानविहीनश्चेद्वर्तते श्रुतिमूर्धनि ॥१८॥ सूतसंहितायाम् ॥ यस्य वर्णाश्रमाचारो गलितः स्वात्मदर्शनात् ॥ सर्ववर्णाश्रमान् सर्वानतीत्य स्वात्मनि स्थितः ॥१९॥ वृत्तम् ॥ नापि प्रदीपमहसा न च रत्नदीप्त्या नापि प्रभाकरकरैः प्रति वारणीयम् ॥ अन्तस्तमः परिविनश्यति यस्य भासा तेजोनिधिः स गुरुरस्तु सदा प्रसन्नः ॥२०॥ वीरागमे ॥ संदेहवनसंदोहसमुच्छेदकुठारिका ॥ यत्सूक्तिधारा विमला गुरूणां स शिखामणिः ॥२१॥ कुलाचाररतास्सन्ति बहवो गुरवो मुने॥ कुलाचारविहीनस्तु गुरुरेकोऽपि दुर्लभः ॥२२॥ योगशतके ॥ वृत्तम् ॥ न स्याज्जन्म यथा तथा गुरुवरः सेव्यः स नोड्डीशवत् नो नाट्यागमत-

---

आहे ती मात्र फार महत्वाची असून पतिव्रता बायकोसारखी आहे. (१८) योगार्णवांत सांगितलें आहे कीं, वर्णांच्या अभिमानामुळें आणि आश्रमांच्या अभिमानामुळें मनुष्यप्राणी हा वेदांचा दास बनतो; तोच त्याचा अभिमान नाहींसा झाल्यावर तो वेदाच्या देखील मस्तकावर लाथ मारण्यास तयार होतो ( त्याला वेद देखील मानतात ). (१९) सूतसंहितेंत झटलें आहे कीं, ज्याला आत्मज्ञान झालें असल्यामुळें आश्रमधर्म आणि वर्णधर्म पाळण्याचें कारण उरलें नाहीं, तो मनुष्य सर्व वर्णधर्म आणि आश्रमधर्म सोडून देऊन आत्मस्वरूपांतच निमग्न होऊन राहतो. (२०) प्राणिमात्रांच्या मनांत अज्ञानपणा नांवाचा जो एक अंधार आहे तो अंधार दिव्याच्या उजेडानें नाहींसा होत नाहीं. रत्नदीपाच्या प्रकाशानें नाहींसा होत नाहीं, फार काय परंतु सूर्याच्या प्रकाशानें देखील नाहींसा होत नाहीं, तो अज्ञानरूपी अंधकार ज्याच्या प्रकाशानें दूर होतो तो एक प्रकाशाचा मूर्तिमन्त समुद्र असा गुरुच समर्थ आहे. तो गुरु आपल्यावर नेहमीं कृपादृष्टि ठेवो. (२१) वीरागमांत झटलें आहे कीं, संशयरूपी दाट वनाला नाश करणाऱ्या कुऱ्हाडीप्रमाणें असलेली ज्याची निर्मळ सूक्तिधारा (वाणीची परंपरा) आहे, तो गुरूंमध्यें श्रेष्ठ झणवितो. (२२) हे मुनीश्वरा, कुलाचारास अनुसरून चालावें झणून उपदेश आपापल्या शिष्यांस करणारे असे गुरु हजारों आहेत; परंतु कुलधर्म आणि आचारधर्म सोडून फक्त शिवज्ञानाच्या साधनानें आपलें व आपल्या शिष्याचें कल्याण करणारा एक देखील गुरु मिळणें दुर्मिळ आहे. (२३) योगशतकांत झटलें आहे कीं, ज्या गुरूची सेवा केली असतां सेवा करणाऱ्या शिष्याचें जन्ममरण चुकेल, असा गुरु पाहून शिष्यानें त्याची सेवा करावी. जारणमारण, उच्चाटण वगैरे कर्मांत प्रवीण असणाऱ्या वड्डीशसिद्ध पुरुषासारखा जो गुरु असेल त्या गुरूची सेवा करूं नये. नाट्यशास्त्र इतर आगम, तर्कशास्त्र, आणि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

केतंत्रहतधीर्नो बाह्यविज्ञानवित् ॥ शिष्यांतर्गतसंशयच्छिदमलं स्वं स्वेन विज्ञापयन्नास्ते यस्तु गुरुः स धन्य उदितो नान्यः स्वमौढ्यप्रदः ॥२३॥ तन्त्रसारे ॥ सुंदरः सुमुखः स्वच्छः सुलभः सर्वतन्त्रवित् ॥ असंशयः संशयछिन्निरपेक्षो गुरुर्मतः ॥२४॥ सिद्धांतशेखरे ॥ ज्ञानहीनं गुरुं प्राप्य कुतो मुक्तिमवाप्नुयात् ॥ भिन्ननावाश्रितः सिन्धोर्यथा पारं न गच्छति ॥२५॥ योगषट्सहस्रिकायाम् ॥ गुरुश्च गुणवान् प्राज्ञः परानन्दावभासकः ॥ तत्ववित्तत्वसम्पन्नो मुक्तिदो न तु चापरः ॥२६॥ लैंग्ये ॥ ज्ञानवैराग्यसंतोषक्षमाधृतिसमाधिभिः ॥ शिवस्य लक्षणैर्युक्तो भक्त एव स्वयं शिवः ॥२७॥ वासिष्ठपुराणे ॥ स्वं संविदात्मदेवं हि नो-

---

तंत्रशास्त्र वगैरे शिकल्यामुळें मतिभ्रष्ट झालेल्या गुरूची उपासना करूं नये. इतर शिल्पज्ञानांत व व्यवहारज्ञानांत प्रवीण असणाऱ्या गुरूचें आराधन करूं नये. शिष्याचे मनांत जे अनेक प्रकारचे भलते भलते संशय येतात, ते सर्व दूर करून आपलें आत्मतत्व त्यास यथार्थरीतीनें समजाऊन देऊन जो त्याचे मनांत पुरतेपणें ठसवून देतो, तोच गुरु धन्य होय. आणि त्याच्याच जन्माचें सार्थक्य झालें. जो गुरु आपण स्वतः अज्ञान असून आपल्या शिष्यालाही आपल्या बरोबरच अज्ञानांत पाडतो, तो गुरु उपयोगीं नाहीं. (२४) " तंत्रसारांत ह्मटलें आहे कीं, " गुरु हा स्वरूपानें सुंदर असावा, तो हास्यमुख असावा, तो निर्मळपणानें वागणारा असावा तो सहजरीतीनें संशय दूर करील असा असावा, त्याला सर्व तंत्रांची माहिती असावी, त्याचें मन निःसंशय असावें, तो शिष्याचे मनांतील संशय दूर करण्यास समर्थ असून त्याचा स्वभाव निर्लोभ असावा, अशालाच गुरु ह्मणावें. (२५) सिद्धान्तशेखरांत सांगितलें आहे कीं, शिष्यानें अज्ञान गुरूचा आश्रय केला तर त्याला मोक्षप्राप्ति कशी होईल? कधींच होणार नाहीं. फुटक्या नावेंत बसून समुद्राच्या पलीकडे जाऊं इच्छिणारा मनुष्य कधीं समुद्राच्या पलीकडे जाईल काय? (२६) योगषट्साहस्त्रिकेंत ह्मटलें आहे कीं, गुरु करणें झालें तर तो गुणवान् असा असावा, तो मोठा ज्ञानी असावा, परानंदाची यथार्थ माहिती करून देण्यास तो समर्थ असावा, तो तत्वज्ञानी असावा, व तत्वाची त्याला चांगली माहिती असावी; असा असला तरच तो शिष्याला मोक्षप्राप्ति करून देईल, इतर गुरु उपयोगीं नाहीं. (२७) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, ज्ञान, वैराग्य, संतोष, क्षमा, धैर्य, समाधि वगैरे शिवाचे अंगीं जे जे गुण आहेत, ते ते सर्व गुण ज्या भक्ताच्या अंगीं आहेत तो भक्त प्रत्यक्ष श्रीशिवच आहे, असें समजावें. (२८) वासिष्ठपुराणांत सांगितलें आहे कीं, आपणच स्वतः आपल्या आत्म्याचें ज्ञानानें पूजन करावें. इतर पूजनाच्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

पहारेण पूजयेत् ॥ एकेनैवामृतेनैष बोधेन स्वेन पूज्यते ॥२८॥ शिवधर्मे ॥ वृत्तम् ॥ अक्रोधमाचारजितेंद्रियत्वं क्षमादयासर्वजनप्रियत्वम् ॥ निर्मोहदानं सुगुणश्च शीलं ज्ञानस्य चिन्हं दशलक्षणं च ॥२९॥ कूर्मपुराणे ॥ परस्य शिवतत्वस्य जिज्ञासामधिकृत्य यत् ॥ ईषणासु च वैराग्यं तच्छीलं परमं स्मृतम् ॥३०॥ शैवपुराणे ॥ व्रतं शिवैकविषयं नियमश्च सनातनः ॥ शीलमित्युच्यते सद्भिर्येन शीली भवेत्पुमान् ॥३१॥ स्कांदे ॥ सुचित्तं च सुशीलं च निर्मलं हि सुभाषितम् ॥ लिंगात्मभावस्तत्संग उत्तमः शरणस्थलम् ॥३२॥ लैंग्ये ॥ शिव एव परं ज्योतिर्नान्यत्किंच न विद्यते ॥ इति यस्य स्थिरीभावस्तच्छीलं परमं विदुः ॥३३॥ षट्सहस्रिकायाम् ॥ शिवैक्यतास्वभावेन तापत्रयविमर्षणम् ॥ शीलं यस्य स वै प्राज्ञः परमानन्दभुग्भवेत् ॥३४॥ स्वच्छन्दललितभैरवीये ॥

---

वस्तूंनीं पूजन करावयाचें कारण नाहीं. आत्मज्ञान हेंच एक अमृत आहे, त्या अमृतानेंच आत्म्याची पूजा करावी. (२९) शांतपणा, सदाचार, इंद्रियनिग्रह, क्षमा, दया, सर्व लोकांस आवडेल असें गोडबोलणें, अज्ञानपणा नसणें, परोपकार करावयाची बुद्धि असणें, स्वभाव चांगला असणें, हीं ज्ञानाचीं दहा लक्षणें आहेत. (३०) कूर्मपुराणांत ह्मटलें कीं, शिवतत्व हें फार श्रेष्ठ आहे, त्या शिवतत्वाला अनुसरून ईषणेमध्यें ( दारेषणा, पुत्रेषणा, धनेषणा ) यांमध्यें जें वैराग्य असतें, तेंच उत्तम शील होय. (३१) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवालाच उद्देशून व्रत करणें हा उत्तम नियम आहे, ह्याच नियमाला सज्जन लोक शील असें ह्मणतात. तें शील ज्याचें अंगीं आहे, त्या पुरुषाला शीली असें ह्मणतात. (३२) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, मन निष्पाप असणें स्वभाव चांगला असणें, गोड आणि सत्यभाषण करणें, लिंगाकडे आपलें निश्चल मन लावणें, त्या लिंगाचा नेहमीं सहवास करणें, इतके सर्व गुण ज्या सज्जनमनुष्याचे अंगीं असतील, त्यास शरण असें ह्मणावें. (३३) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव हेंच कायतें एक श्रेष्ठ तेज आहे, त्याखेरीज दुसरें कोणतेंही श्रेष्ठ तेज नाहीं; असा जो दृढ निश्चय आहे, त्यालाच ( त्या निश्चयालाच ) उत्तम शील असें मानतात. (३४) षट्साहस्रिकेंत ह्मटलें आहे कीं, शिवाशीं ऐक्य पावल्यामुळें ज्याचे आधिभौतिक, आध्यात्मिक, आणि आधिदैविक असे तीन प्रकारचे ताप दूर झाले आहेत, व अशा रीतीचा ज्याचा स्वभाव असेल, तोच ज्ञानी होय; आणि तोच परमानंदाचा अनुभव अथवा उपभोग घेतो. (३५) स्वच्छंदललितभैरवीयांत ह्मटलें आहे कीं, ज्याचा एकान्त ठिकाणीं वास करण्याचाच स्वभाव

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वृत्तम् ॥ एकान्तशीलस्य दृढव्रतस्य पंचेंद्रियप्रीतिनिवर्तकस्य ॥ अध्यात्मयोगं गतमानसस्य मोक्षो ध्रुवं नित्यमहिंसकस्य ॥३५॥ महाभारते ॥ वनवासं नदीवासं कन्दमूलादिभक्षणम् ॥ चराणामपि कर्तव्यं व्रतं किंचिन्न कारयेत् ॥३६॥ रुद्रयामले ॥ दृश्यजातमशेषं च शिवतत्वेन पश्यतः ॥ क्रियाकलापस्तस्यैव चिद्रूपं चाखिलं भवेत् ॥३७॥ स्कांदे ॥ गंगातोयेन सर्वेण मृद्भारैश्च नगोपमैः ॥ आमृत्योराचरेच्छौचं भावदुष्टो न शुध्यते ॥ ज्ञानशुद्धिपरं शौचं प्रधानं सर्वकर्मसु ॥३८॥ अन्यथालिंग्यते कांताभावेन दुहितान्यथा ॥ मनसा भिद्यते वृत्तिरभिन्नेष्वेव वस्तुषु ॥३९॥ अन्यथैव स्तनं पुत्रः स्पृशते पतिरन्यथा ॥ पश्य पश्य च भावस्य तन्माहात्म्यमशेषतः ॥४०॥ परिष्वक्तः प्रियो नार्या भावहीनो न कामयेत्॥नाद्याद्विविधमन्नाद्यं भक्ष्याणि सुरभीणि च॥अभावेन नरस्त-

---

आहे, जो मनोभावानें व्रत करितो, पंचेंद्रियांवर ज्याची प्रीति नाहीं, अध्यात्मयोगाकडे ज्याचें लक्ष लागलेलें आहे, आणि जो कधींही हिंसा करीत नाहीं, त्याला खरोखर मोक्षप्राप्ति होते. (३६) महाभारतांत सांगितलें आहे कीं, अरण्यांत राहवें नदीच्या कांठीं राहवें, कंद, मूल, फल, भक्षण करावें, आणि जंगमलोक जें व्रत करितात तें व्रत करावें; दुसरें कांहीं करावयास नको. (३७) रुद्रयामलांत म्हटलें आहे कीं, सृष्टींत जितके कांहीं प्राणिमात्र आपले दृष्टीस पडतात, ते सर्व शिवस्वरूप आहेत; असें मानणाऱ्याच्या हातून ज्या ज्या कांहीं क्रिया घडतील, त्या त्या सर्व चित्स्वरूपच आहेत. (३८) स्कंदपुराणांत म्हटलें आहे कीं, ज्याचें मन दुष्ट आहे तो मनुष्य नेहमीं गंगानदीत स्नान करो. पर्वता एवढा मातीचा ढीग अंगास लावून स्नान करो, किंवा मरेपर्यंत निर्मळपणानें वागो, तो कधींही शुद्ध होणार नाहीं. ज्ञानशुद्धि हीच शुद्धता सर्व कृत्यांत मुख्य मानली आहे; शरीराचा स्वच्छपणा कांहीं उपयोगीं नाहीं. (३९) एखादा मनुष्य आपल्या बायकोस ज्या शरीरानें भेटतो, त्याच शरीरानें मुलीसही भेटतो; परंतु त्या दोन्हीही ठिकाणीं त्याच्या मनाच्या समजुती वेगवेगळ्या असतात. (४०) एखाद्या बाईच्या स्तनाला तिचा लहान मुलगा निराळ्या समजुतीनें हात लावतो, आणि त्या बाईचा नवरा निराळ्या समजुतीनें हात लावितो. विचार करून पहा कीं, त्या दोघांच्या हात लावण्यामध्यें कसें निरनिराळे विचार आहेत ते? (४१) ज्या पुरुषाचे मनांत मैथुन करावयाची इच्छा नाहीं, त्याला त्या बायकोनें त्यावेळीं कडकडून आलिंगन दिलें, तरी त्याच्या मनाला कांहीं विकार होत नाहीं; मनुष्याच्या मनांत अगोदर विचार आल्यावांचून ( त्यास इच्छा झाल्यावांचून ) तो अनेक प्रकारचीं मधुर मधुर अन्नें आणि अनेक प्रकारचे



CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्याद्भावस्सर्वत्र कारणम् ॥४१॥ ज्ञानामलांभसा पुंसां सद्वैराग्यमृदा भवेत् ॥ अविद्यारागविण्मूत्रलेपगन्धविशोधनम् ॥४२॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ ज्ञानशौचस्वभावेन नष्टागममिहोच्यते ॥ एकीभूते निराकारे संविदा निष्प्रपंचकः ॥४३॥ शिवसूत्रे ॥ आर्यावृत्तम् ॥ प्रत्यक्स्रोतसि सततं प्रवृत्त (त्ति) निजधाम्नि निर्मले गगने ॥ अवगाह्यानन्दमये स्नातो निःशेषदुष्टमलः ॥४४॥ स्वात्मयोगप्रदीपिकायाम् ॥ वृत्तम् ॥ तत्तध्दृषीकविषयाख्यतरंगसंघसंघट्टजं निजमनोमरुतोपनीतम् ॥ यत्सौख्यबिंदुमुपजीवति जीवलोकः सोऽनन्तसत्यसुखबोधसुधाब्धिरस्मि ॥४५॥ योगार्णवे ॥ वृत्तम् ॥ मीनः स्नानपरः फणी पवनभुङ्मेषस्तु पर्णाशनो नीराशी स तु चातकः प्रतिदिनं शेते बिले मूषकः ॥ भस्मो-

---

दुसरें खाण्याचे पदार्थ कधींच खात नाहीं. ह्यासाठीं कोणतीही गोष्ट करण्याला भावच मूलकारण आहे (४२) ज्ञानी मनुष्य उत्तम वैराग्यरूपी मृत्तिका ( माती ) लावून व ज्ञानरूपी निर्मळ पाणी घेऊन, अज्ञानरूप मलमूत्राचा दुर्गंध दूर करितो. (४३) अचिंत्यविश्वसादाख्यांत ह्मटलें आहे कीं, प्रपंचापासून मुक्त झालेला शरण निराकार वस्तूशीं ऐक्य पावून ज्ञानाच्या शुद्धीच्या योगानें नष्टागम या पदवीला प्राप्त होतो. (४४) शिवसूत्रांत ह्मटलें आहे कीं, ज्यांत नेहमीं आत्मस्वरूप हा प्रवाह आहे, जें निर्मळ असून आकाशासारखें आहे, जें आनंदस्वरूप आहे, त्या आपणास समजून आलेल्या आत्मस्वरूपांत स्नान केलें, ह्मणजे आपणास आपले दुर्गुण समजूं लागतात. (४५) स्वात्मबोधप्रदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, आपल्या मनोरूपी वायूनें निरनिराळ्या इंद्रियांच्या आवडीच्या, निरनिराळ्या विषयांचे तरंग उठवून, ते एकत्र करून, त्याच्या संघट्टनानें प्राणिमात्रास जें कांहीं थोडें सुख लाभतें, तेंच सुख, अनंत, सत्य आणि ज्ञान आहे. असें तो समजतो; तें सुख ह्मणजे एक अमृताचा समुद्रच होय, असें त्याला वाटतें. (४६) योगार्णवांत ह्मटलें आहे कीं, मासा नेहमीं पाण्यांत बुडालेला असतो, तरी तो मुक्त होत नाहीं, त्यावरून स्नान केल्यानें मुक्ति होते हें ह्मणणें चुकीचें आहे; साप नेहमीं वारा पिऊन राहतो, तरी तो मुक्त होत नाहीं, त्यावरून वायु भक्षण केल्यानें मुक्ति होते हें ह्मणणें चुकीचें आहे. बोकड नेहमीं गवत खातो, तरी तो मुक्त होत नाहीं, त्यावरून गवत खाऊन राहिल्यानें मुक्ति होते हें ह्मणणें चुकीचें आहे; चातकपक्षी नेहमीं पाणी पिऊन राहतो, तरी तो मुक्त होत नाहीं त्यावरून पाणी पिऊन राहिल्यानें मुक्ति होतें हें ह्मणणें चुकीचें आहे; उंदीर नेहमींच बिळांत राहतो तरी तो मुक्त होत नाहीं, त्यावरून गुहेंत राहिल्यानें मुक्ति

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

द्धूलनतत्परः खलु खरो ध्यानानुरक्तो बकः सर्वं निष्फलितं विवेकरहितं ज्ञानप्रधानं तपः ॥४६॥ वीरागमे ॥ प्रसादलिंगः प्राणी स्यादात्मनिग्रहवर्जितः ॥ इति प्रसादलिंगैक्यव्रती गणपदं व्रजेत् ॥४७॥ योगार्णवे ॥ प्राणिमार्गं परित्यज्य सन्मार्गी लिंगसंयुतः॥ शिवज्ञानवतां पुंसां संगमिच्छन् स गच्छति ॥४८॥ शिवरहस्ये ॥ सद्भावस्सद्गुणश्चैव सध्द्मस्सावधानकः ॥ सत्संगेषु च यो वेद्यस्तत्र तिष्ठामि पार्वति ॥४९॥ स्कांदे ॥ यथा चिंतामणिं स्पृष्ट्वा लोहं कांचनतां व्रजेत् ॥ यथा जंबूनदीं प्राप्य मृत्तिका स्वर्णतां व्रजेत् ॥५०॥ यथा मानसमासाद्य वायसो हंसतां गतः ॥ यथाऽमृतं सकृत् पीत्वा नरो देवत्वमाप्नुयात् ॥५१॥ तथैव हि महात्मानो दर्शनस्पर्शनादिभिः ॥ सद्यः पुनन्त्यघोपेतांस्तत्संगो

---

होते, हें ह्मणणें चुकीचें आहे; गाढव नेहमींच राखेंत लोळतो तरी तो मुक्त होत नाहीं, त्यावरून अंगास भस्म लावल्यानें मुक्ति मिळते हें ह्मणणें चुकीचें आहे; बगळा मासे धरण्याकरितां नेहमीं ध्यान लावून बसलेला असतो, तरी तो मुक्त होत नाहीं, त्यावरून ध्यान धरिल्यानें मुक्ति होते हें ह्मणणें चुकीचें आहे. सारांश विचारावांचून केलेलें कोणतेंही कर्म असो, तें निष्फळ आहे. तपश्चर्या करणें ती ज्ञानपूर्वक केली पाहिजे, तरच तिचा उपयोग होतो; नाहींपेक्षां त्या तपश्चर्येचा कांहींएक उपयोग नाहीं. (४७) वीरागमांत सांगितलें आहे कीं, जो प्राणी प्रसादलिंगि आहे तो आपलीं इंद्रियें आपले ताब्यांत ठेवणारा नसला तरी तो प्रसादलिंगाचें व्रत पाळणारा मनुष्य शिवगण होतो. ( त्यास शिवगणाचा अधिकार मिळतो. )(४८) योगार्णवांत ह्मटलें आहे कीं, इतर प्राणिमात्र ज्यारीतीनें चालतात ती रीति सोडून सन्मार्गानें जाणारा, इष्टलिंग आपले शरीरावर धारण करणारा, व शिवज्ञान असणाऱ्या शिवयोग्यांचा समागम करूं इच्छिणारा मनुष्य मोक्षपदास जातो. (४९) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, चांगला भाव, चांगला गुण, चांगला धर्म, सावधपणा, आणि सज्जनांचा सहवास ह्यांची योग्यता जेथें जाणतात, तेथें मी रहातों असें पार्वतीला शिवांनीं ह्मटलें. (५०) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, जसें चिंतामणि रत्नाला ( परिसाला ) लोखंड लागल्यावरोवर त्याचें सोनें होतें, जंबूनदींत माती पडली असतां ती माती जशी सोनें होतें, (५१) मानससरोवरास कावळा गेला तर तो जसा राजहंसपक्षी होतो, एक वेळच अमृत प्याल्यानें मनुष्य जसा अमर होतो, (५२) तसेच सज्जनलोक दुष्ट लोकांस (पातकी लोकांस) दर्शन देऊन किंवा त्यांच्या अंगावर हात फिरवून त्यांस पवित्र करितात; अशा सज्जनलोकांचा सहवास होणें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

दुर्लभो यतः ॥५२॥ वृत्तम् ॥ कर्पूरजातीमृगनाभिमिश्रमामोदमागान्मतिवर्धनं च ॥ तथैव तैले निहितं विषं स्यात्संसर्गदोषा हि गुणा भवंति ॥५३॥ शिवरहस्ये ॥ शिवशास्त्रं शिवज्ञानं शिवभक्तस्य मेलनम् ॥ शिवपूजा शिवध्यानं चोत्तमं जंगमस्थलम् ॥५४॥ भागवते ॥ अनपेक्ष्यं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शनम् ॥ अनुव्रजाम्यहं नित्यं पूज्योऽहं त्वंघ्रिरेणुभिः ॥५५॥ अथर्वशिखोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ सम्यक् समस्तानपि पदान् जयति स्वयं स्वयं ब्रह्म भवत्येष सिद्धिकरः ॥५६॥ वीरागमे ॥ आत्मलिंगपरिज्ञानान्नन्दी स शिवलांछनः ॥ बाह्यकर्मपरित्यागी स स्वयं लिंगमुच्यते ॥५७॥ स्कांदे ॥ ध्यानं शैवं तथा भिक्षा नित्यमेकान्तशीलता ॥ एवं चत्वारि कर्माणि पंचमं नोपपद्यते ॥५८॥ सूतसंहितायाम् ॥ दातॄनपि जनान् भक्तान् याचयित्वा सुदुर्लभम् ॥ क्षुभितस्तदभावेन क्षोभ-

---

सोपें काम नव्हे, ही गोष्ट होणें फार दुरापास्त आहे. (५३) कापूर, जुईचें (बटमोगऱ्याचें) फूल आणि कस्तुरी हे तिन्ही पदार्थ एकत्र केले ह्मणजे फारच सुवास सुटतो आणि, त्यापासून बुद्धिही वाढते. आणि हेच पदार्थ तेलांत मिसळले तर विष होतात. सहवासामुळें वाईटाचें चांगलें होतें, व चांगल्याचें वाईट होतें. (५४) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिवशास्त्र, शिवज्ञान, शिवभक्तांचा समागम, शिवपूजन, आणि शिवध्यान इतक्या गोष्टी ज्या मनुष्याजवळ आहेत तो मनुष्यच उत्तम जंगमस्थल होय. (५५) भागवतांत ह्मटलें आहे कीं, मुनीश्वर हा निरपेक्ष असतो, त्याचा स्वभाव शांत असतो, तो कोणाबरोबर वैर करीत नाहीं, तो सर्व प्राणिमात्रांस सारखें समजतो. शिव म्हणतात त्याला मी शरण जातों, त्याच्या पायाच्या धूळीनें माझी इतकी योग्यता वाढली. (५६) अथर्वशिखोपनिषदांत ह्मटलें आहे कीं वेद ह्मणतो कीं, हा जंगम स्वतः चांगल्यारीतीनें सर्व स्थानें (ब्रह्मादि पदाला) जिंकतो, तो स्वतः ब्रह्मस्वरूप असतो, तो सर्व प्रकारचे मनोरथ परिपूर्ण करितो. (५७) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, आत्मलिंगाचें यथार्थज्ञान झाल्यामुळें तो नेहमीं आनंदांत असतो, तो शिवाचें चिन्ह धारण करितो, तो बाह्यकर्में सर्व सोडून देतो, त्याला स्वतःला लिंग असें ह्मणतात. (५८) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, नेहमीं ध्यान करावयाचें, शिवधर्माप्रमाणें आचरण करावयाचें, भिक्षा मागावयाची, आणि नेहमीं एकांत जागेंत बसावयाचें, हीं चार जंगमाचीं मुख्य कामें आहेत. त्यांखेरीज पांचवें कोणतेंही कर्तव्यकर्म दिसत नाहीं. (५९) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जे उदारस्वभावाचे दान करणारे भक्त लोक आहेत त्यांच्याजवळ एखादा सहज मिळणारा नसेल असा पदार्थ मागावा; तो त्यांकडून मिळाला नाहीं तर आपले मनास

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

येन्न कदाचन ॥५९॥ वासिष्ठे ॥ विधिना शिवभावेन सत्कृत्य भावभक्तितः ॥ आददानो ( आददीत ) मुनिर्दत्तं तद्भैक्ष्यममृतं भवेत् ॥६०॥ शिवधर्मोत्तरे ॥ तदेवाश्रद्धया दत्तं नाददीत कदाचन ॥ अनन्यमानसः शान्तः शिवविद्यां जपेत्सदा ॥६१॥ स्कांदे ॥ सर्वारंभपरित्यागो भैक्ष्याशी वृक्षमूलताम् ॥ निष्परिग्रहताद्रोहसमता योगिवर्तनम् ॥६२॥ समप्रियाप्रियो धीरः समनिंदास्तुतिश्च यः ॥ सर्वारंभपरित्यागी सुखदुःखसमस्तथा ॥६३॥ यद्भावज्ञापकज्ञानलयवान् स स्वयाभिधः ॥ सर्वसंगविमुक्तात्मक्रियावानपि दृश्यते ॥६४॥ योगार्णवे ॥ स्वस्थानं च परित्यज्य परस्थानं समाश्रितः ॥ स्त्रीहेमभुक्तिलाभाय आशा गच्छन्ति प्राणिनः ॥६५॥ परमहंसोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ जटां धृत्वा चीरवासाश्च भूत्वा लोकान्

---

वाईट वाटूं देऊं नये, व त्या दात्यांचें मनही दुखवूं नये. (६०) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, एखाद्या भक्तानें सत्कार करून जंगमास आपले घरीं भिक्षेस बोलावून यथाविधीनें त्याची पूजा करून त्यास भिक्षा घातली असतां, त्या भिक्षेचें अन्न अमृत होतें. (६१) शिवधर्मोत्तरांत सांगितलें आहे कीं, तेंच अन्न त्या भक्तानें भक्तिभावानें दिलें नाहीं तर तें त्यानें कधींही घेऊं नये. त्या जंगमानें भलत्या कामाकडे आपलें लक्ष्य देऊं नये, त्याचा स्वभाव शांत असावा, व त्यानें नेहमीं शिवविद्येचा जप करावा. (६२) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगमानें प्रपंचसंबंधी आपले सर्व व्यवसाय सोडून द्यावे, भिक्षा मागावी, झाडाच्या सावलींत रहावें, परिग्रहाचा स्वीकार करूं नये; कोणाचा द्वेष करूं नये, आणि सर्व प्राणिमात्र सारखे आहेत असें समजून त्यांचे बरोबर तसें वागावें. (६३) शिवयोग्याला सुख आणि दुःख सारखेंच आहे, तो मोठा धैर्यवान् असतो, त्याला निंदा आणि स्तुति ह्या दोन्हीही गोष्टी अगदीं सारख्या असतात, त्यानें आपले सर्व प्रकारचे प्रपंचांतील व्यवहार सोडून दिलेले असतात, व त्याला सुख आणि दुःख ह्या दोन गोष्टी सारख्या असतात. (६४) परवस्तूला दाखविणाऱ्या ज्ञानामध्यें लय ज्याचा लागला आहे, त्यास स्वयं असें ह्मणावें; त्यानें आपले सर्व प्रकारचे संग सोडून दिलेले असतात, तरी एखादे वेळीं तो आपलीं कर्तव्यकर्में करीत आहे असेंही पाहण्यांत येतें. (६५) योगार्णवांत ह्मटलें आहे कीं, आपली स्वतःची जागा सोडून मनुष्यप्राणी दुसऱ्या ठिकाणीं आला आहे ( मूळ परब्रह्मस्वरूप विसरून जीवपणा पावला आहे ); त्यामुळें प्राणिमात्राच्या वासना बायको सोनें वगैरे पदार्थ मिळविण्याकडे जातात. (६६) परमहंसोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, वेद असें ह्मणतो कीं, मस्तकावर जटा वाढवून झाडांच्या साली नेसून

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वहन्नेव चरत्यथ स्वयम् ॥६६॥ ऋग्वेदे ॥ चरैवेति चरैवेति चरन् वै मधु विंदति ॥६७॥ किंच ॥ परमहंसोपनिषदि ॥ एकशाटीपरिवृतो मुण्डी उदरपात्री भिक्षार्थे ग्रामे प्रविशेदासायम् ॥ प्रदक्षिणेनाविचिकित्सन् सार्ववर्णिकं भैक्षाचर्यं अभिशस्तं पतितवर्ज्यम् ॥६८॥ वीरागमे ॥ शिवलिंगादभेदात्मा तन्निक्षिप्तेंद्रियव्रजः ॥ स्वेच्छाविहारी स्वानन्दः स चरो लिंगमुच्यते ॥६९॥ स्कांदे ॥ निवृत्तः सर्वसंगेभ्यः शिवध्यानरतस्सदा ॥ ज्ञेयः शिवयतीन्द्रोऽयं भस्मनिष्ठो जितेंद्रियः ॥७०॥ छांदोग्योपनिषदि ॥ श्रुतिः ॥ आत्मैवेदं सर्वमिति सर्वं एषः एतं पश्यन्नियतं मन्वानः एतं विज्ञायमानः आत्मरतिरात्मक्रीडः आत्ममिथुन आत्मानन्दः सर्वस्वराड्भवति तस्य सर्वेषु लोकेषु कामचारो भवति ॥७१॥ ग्रन्था-

---

लोकांचें कल्याण करण्याकरितांच स्वयं हा पृथ्वीवर संचार करितो. (६७) ऋग्वेदांत झटलें आहे कीं, या प्रकारानें फिरत रहा. आह्मीही असेंच संचार करून अमृतस्वरूपी मोक्ष मिळवितो. (६८) आणखी परमहंसोपनिषदांत झटलें आहे कीं, सन्याशानें ( जंगमानें ) आपल्या अंगावर एक शाटी पांघरावी, मुंडन करावें, पोटापुरतें अन्न मिळेपर्यंत भिक्षा मागावी, जास्त मागू नये. संध्याकाळपर्यंत गांवांत फिरावें, संध्याकाळचे वेळेस परत रानांत जावें. गांवांत फिरत असतां अमुक चांगला अमुक वाईट अशी त्यानें आवडनिवड करूं नये. सर्व प्रकारच्या वर्णांच्या घरीं त्यानें भिक्षा मागितली तरी चिन्ता नाहीं त्यानें पतिताच्या घरीं मात्र भिक्षा मागूं नये. (६९) वीरागमांत सांगितलें आहे कीं, जो जंगम शिवलिंगाशीं ऐक्य पावला आहे, ज्यानें आपलीं सर्व इंद्रियं शिवलिंगाकडे लावलेलीं आहेत, जो स्वच्छंदपणानें पृथ्वीवर संचार करितो, जो नेहमीं निजानंदस्वरूप आहे, त्या जंगमास चरलिंग असें झणतात. (७०) स्कंदपुराणांत झटलें आहे कीं, ज्यानें सर्वसंगपरित्याग केला आहे, जो नेहमीं शिवध्यानांत निमग्न असतो, ज्याची भस्मावर फार श्रद्धा असते, ज्यानें आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेविलेलीं असतात, त्यास शिवयोगीश्वर असें झणावें. (७१) छांदोग्योपनिषदांत झटलें आहे कीं, वेद असें झणतो कीं, आत्मा हेंच एक सर्व कांहीं आहे, तो शिवयोगी नेहमीं त्या आत्म्यास पाहतो, त्या आत्म्यास योग्य रीतीनें ओळखून त्या आत्म्यावरच प्रेम करितो, त्या आत्म्यावरोबरच खेळतो, आत्मा हेंच जोडपें ( मिथुन ) आहे असें मानतो, तो नेहमीं आत्मस्वरूपानंदांत निमग्न असतो, तो सर्व आपलेंच राज्य आहे असें मानतो, त्याचें सर्व त्रलोक्यांत स्वच्छंदपणानें फिरणें होतें. (७२) इतर ग्रंथांत झटलें आहे कीं, [illegible] लंगोटी, निः-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

न्तरे ॥ निर्मोहत्वं च कौपीनं निस्संगत्वं च मेखला ॥ शांतिर्यज्ञोपवीतं च ह्याधारं च दया परा ॥७२॥ पंचेंद्रियं विना दण्डः पंच मुद्राः प्रकीर्तिताः ॥ इत्येतैर्लक्षणैर्युक्तं जंगमस्थलमुच्यते ॥७३॥ महाभारते ॥ वाङ्मनोभ्यां शरीरेण शुचिः स्यादनहंकृतिः ॥ प्रशांतो ज्ञानवान् भिक्षुर्निरपेक्षश्चरेत्सुखम् ॥७४॥ मैत्रीं कुरु सुखाढ्येषु दुःखितेषु दयां कुरु ॥ पुण्यं कुर्वत्सु संतोषमौदासीन्यं कुबुद्धिषु ॥७५ ॥महाभारते ॥ सत्यदुर्गे समारूढं शीलप्राकारवेष्टितम् ॥ शांतिखड्गधरं नित्यं दुर्जनः किं करिष्यति ॥७६॥ स्कांदे ॥ एवं विचरतस्तस्य भवन्त्येते परिग्रहाः ॥ विद्या भार्या सुतस्तोषः क्षमा हि परिचारिका ॥७७॥ माता भक्तिः पिताऽऽचारः सत्यं नप्ता शमस्सखा ॥ वैराग्यं सुहृदाचार्यो दमः श्रद्धा स्वसा मता ॥७८॥ दासी त्वहिंसा दासः स्यादस्तेयं परिकीर्तितम् ॥ मैत्र्याद्यास्तनयाः प्रोक्ता धर्मोऽसौ वाहनं मतम् ॥७९॥ ज्ञानं देहस्तथा क्षेत्रं विचार-

---

संगपणा, मेखला, शान्ति, यज्ञोपवीत, आधार आणि मोठी दया. (७३) दंडाखेरीज पांच इंद्रियें, ह्या पांच मुद्रा सांगितल्या हीं इतकीं वर सांगितलेलीं सर्व लक्षणें ज्याचे अंगीं आहेत त्यास जंगमस्थल असें ह्मणतात. (७४) महाभारतांत ह्मटलें आहे कीं, जो कायावाचामनानें शुद्ध असतो, ज्याला अभिमान मुळींच नसतो, ज्याचा स्वभाव शांत असतो, जो ज्ञानी आहे आणि ज्याचा स्वभाव निर्लोभ आहे असा सन्यासी सुखानें राहतो. (७५) जे लोक अतिशय सुखी आहेत, त्यांचेबरोबर स्नेह कर, जे लोक दुःखी आहेत त्यांच्यावर दया कर, जे लोक पुण्यकर्में करितात त्याविषयीं संतोष मान, आणि जे वाईट स्वभावाचे लोक आहेत, त्यांविषयीं उदासीन रहा. (७६) महाभारतांत सांगितलें आहे कीं, जो खरेपणारूप किल्यावर चढला आहे, ज्याला सदाचाररूप गांवकोश ( तट ) आहे, शांतिरूप तरवार ज्याचे हातांत आहे, त्याचें दुर्जन मनुष्य काय करणार आहे? (७७) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, अशा रीतीनें फिरणाऱ्या त्या शिवयोग्याचे, पुढें सांगितलेले सद्गुण नातलग असतात ते असे विद्या ही त्याची बायको असून संतोष हा त्याचा मुलगा होय; आणि क्षमा ही त्याची दासी होते. (७८) भक्ति ही त्याची माता असून सदाचार हा त्याचा बाप होय. खरेपण हें त्याचा नातु असून इंद्रियनिग्रह हा त्याचा गुरु आहे; वैराग्य हें त्याचा मित्र असून दम हा त्याचा गुरु आणि श्रद्धा ही त्याची वहीण आहे. (७९) अहिंसा ही त्याची दासी असून अस्तेय ( चोरी न करणें ) हा गुण त्याचा सेवक आहे; मैत्री वगैरे त्याच्या मुली असून धर्म हा त्याचें वाहन मानलें आहे. (८०) त्या प्राणलिंगांगसंगी शिवयोग्याचें ज्ञान हें शरीर असून सर्व व-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्सर्वगोचरः ॥ देशो मोक्षः सुगम्योऽयं प्राणलिंगांगसंगिनः ॥८०॥ एता-न्परिग्रहान्सद्यो गृहीत्वा शुद्धमानसः ॥ परिपूर्णचिदानन्दश्चरेदुर्वीमिमां नरः ॥८१॥ वृत्तम् ॥ लोभो महाकर्दम इंद्रियाणि दुष्टारयो मोहमहापिशाचः ॥ क्रोधस्तरक्षुर्ममता हि कन्या मारस्स चोरो हि मदोऽन्धकारः ॥८२॥ तापत्रयो महागर्तो विषयः कण्टकांकुरम् ॥ असूया विषवल्ली स्या दहंकारो विषन्हदः ॥८३॥ एतानुपद्रवान् सर्वान् विचार्य सुधिया नरः ॥ संसारकानने भक्तो विचरन् सुखमश्नुते ॥८४॥ स्वयमेव स्वयंभावाच्चरतीति चराभिधः ॥ कामक्रोधादिनिर्मुक्तः क्षांतिदांतिसमन्वितः ॥८५॥ निष्प्रपंचे निजे देहे न धर्मो न च दुष्कृतम् ॥ गतैनसि महाधीरो शुद्धदेहश्चरेद्भुवि ॥८६॥ स्कांदे ॥ सर्वाचारं समस्तेषु भिक्षाभैक्ष्यक्रमं शृणु ॥ चरस्थली गुणाभावात्सर्वमुक्त्यर्थकारणम् ॥८७॥ जंगमस्या-

---

स्तूंविषयीं विचार हें त्याचें शेत आहे; आणि मोक्षस्थान हा त्याचा राहण्याचा देश आहे, व तो त्याला सहज मिळतो. (८१) तो निष्पाप स्वभावाचा शिवयोगी मनुष्य ह्या सर्व परिवारास बरोबर घेऊन परिपूर्ण चित्स्वरूप असा होऊन ह्या सर्व पृथ्वीवर फिरतो. (८२) लोभ हा एक अतिशय चिखल असलेला प्रदेश आहे, इंद्रियें हीं दुष्ट शत्रु आहेत, अज्ञान, हा जबरदस्त शत्रु आहे, रागीटस्वभाव हा तरस ( लहानसान प्राणी मारून खाणारा हिंसक प्राणी ) आहे, ममता ही मुलगी असून मदन हा मुलगा आणि गर्व हा अंधकार आहे. (८३) आध्यात्मिक, आधिभौतिक, आणि आधिदैविक हे तीन प्रकारचे महाताप ही मोठी थोरली गार आहे, विषयसुख हें कांट्याचें टोंक आहे, दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होण्याचा दुर्गुण हा विषाची वेली असून अभिमान हा अतिशय खोल असा विषाचा डोह आहे; (८४) ह्या सर्व उपद्रवांचा विचारपूर्वक नीट विचार करून शिवभक्त मनुष्य संसाररूप अरण्यांत फिरत असतांना सुख पावतो. (८५) स्वयं ह्याच स्वयंपणामुळें फिरतो ह्मणून त्याला चर ह्मणतात, त्याचे अंगीं काम, क्रोध वगैरे दुर्गुण नसतात व शांति दांति वगैरे सद्गुण असतात. (८६) प्रपंचहीन व पापरहित अशा आपल्या शरीरांत धर्मही नाहीं व पातकही नाहीं; अशा रीतीची त्या शिवयोग्याची स्थिति असल्यानें तो मोठा धैर्यशाली मनुष्य निष्पापशरीर असा होऊन पृथ्वीवर फिरतो. (८७) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, सर्व प्राणिमात्रांपेक्षां त्या जंगमाचा आचार श्रेष्ठ असतो, त्याचे भिक्षेचा आणि भिक्षेच्या पदार्थांचा प्रकार मी तुला सांगतों ऐक. चरस्थलीचा गुणाभाव झाल्यामुळें त्याचें सर्व वर्तन मोक्षप्राप्तिलाच कारण आहे. (८८) जंगमाला

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

गमो नास्ति भक्तस्य ग्रहमाचरेत् ॥ अन्यस्य चेद्गृहं याति सद्यो गोमांसभक्षणम् ॥८८॥ वीरागमे ॥ अभक्तेभ्यो न गृण्हीत चात्मेच्छा यदि लभ्यते ॥ न वस्तुसंग्रहं कुर्यात्स निराशी च जंगमः ॥८९॥ सूतसंहितायाम् ॥ दम्भलोभविनिर्मुक्तः सन्तुष्टः संचरेत्सदा ॥ निंदितेभ्यो न गृण्हीत भिक्षां भिक्षाशनो मुने ॥९०॥ शिवरहस्ये ॥ जटी मुण्डी शिखी व ापि मुद्रापंचकभूषितः ॥ प्रमादान्मैथुनं कुर्याच्छिवद्रोही न संशयः ॥९१॥ कामक्रोधविनिर्मुक्तं लोभमोहविवर्जितम् ॥ वेषांगरहितं देवि श्रेष्ठं तल्लिंगजंगमम् ॥९२॥ शिवधर्मे ॥ मनः शांतिमयं यस्य जगत्पीयूषमाप्नुयात् ॥ मनः क्रोधमयं यस्य हालाहलमयं जगत् ॥९३॥ भागवते॥ निर्मोहो निरहंकारो निस्संगो निष्परिग्रहः ॥ रागद्वेषविनिर्मुक्तस्त-

---

इतर लोकांच्या घरीं भिक्षेस जाण्याचा अधिकार नाहीं, त्यानें भक्तांच्या घरींच भिक्षा मागावी, तो जर इतर जातींच्या लोकांचे येथें भिक्षा मागून तें अन्न भक्षण करील त र त्यानें गाईचें मांस खाल्लयासारखें आहे. (८९) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमानें भक्तलोक नव्हेत अशांच्या घरीं कधींही अन्न घेऊं नये. भक्ताच्या घरचेंच अन्न घ्याव. तें कधीं इच्छेप्रमाणें मिळेल, कधीं इच्छेप्रमाणें मिळणार नाहीं; त्याबद्दल त्यानें सुखदुःख मानूं नये. त्यानें फारसा वस्तूंचा संग्रह करूं नये. त्याचा स्वभाव निर्लोभ असावा, त्यालाच जंगम ह्मणावें. (९०) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जंगमाला दंभ आणि लोभ हे नसावेत, त्यानें नेहमीं संतुष्टमनानें पृथ्वीवर फिरावें त्यानें भिक्षा मागून खावी हें खरें, तरी मुनिश्रेष्ठा त्यानें पतिताचे घरीं भिक्षा मागूं नये. (९१) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, कोणी शिवयोग्यानें जटा राखल्या असतील, मुण्डन केलें असेल शेंडी राखिली असेल किंवा पांच मुद्रा धारण केल्या असतील त्यानें चुकून जरी एखादेवेळीं मैथुन केलें, तरी तो शिवद्रोही होतो, ह्यांत शंका नाहीं (९२) हे पार्वती, ज्याचे अंगीं काम आणि क्रोध असत नाहींत, तसेंच लोभ आणि मोह हेही दुर्गुण असत नाहींत, ज्याला डामडौल करण्याची मुळींच इच्छा नसते, तो उत्तम जंगम ( तें उत्तम जंगमलिंग ) होय असें जाणावें. (९३) ज्याचें मन शांत आहे ( ज्याचें मन समाधानी आहे, ) त्याला सर्व त्रैलोक्य अमृतासारखें सुखकारक वाटतें; आणि ज्याचें मन अतिशय रागीट आहे, त्यास सर्व जग विषासारखें तीव्र वाटतें. (९४) भागवतांत ह्मटलें आहे कीं, ज्याचे अंगा मोह ( अज्ञान ) नाहीं, ज्याला अभिमान नाहीं, ज्याला कोणाशीं स्नेह करणें आवडत नाहीं ( जो निस्संग आहे ), ज्याला परिग्रह नाहीं, ज्याचे अंगीं राग आणि द्वेष

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मेव पुरुषं विदुः ॥९४॥ वीरागमे ॥ निर्मन्थ्य सर्वशास्त्राणि नवनीताद्यथा घृतम् ॥ शरणः पिबते सर्पिस्तक्रं पिबति पण्डितः ॥९५॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ मन्त्रजालं महादुःखं तन्त्रजालं तथैवच ॥ शास्त्रजालमनेकार्थं त्रयं त्यक्त्वा सुखी भवेत् ॥९६॥ सूतसंहितायाम् ॥ न तस्यापि भवेच्छिष्यः यथाहं पुरुषोत्तमः ॥ अतिवर्णाश्रमी साक्षाद्गुरूणां गुरुरुच्यते ॥९७॥ वीरागमे ॥ गुरौ भक्तिः शिवे भक्तिः शिवध्यानपरायणः ॥ नित्याभ्यासी शिवज्ञाने स विभुर्जंगमोत्तमः ॥९८॥ स्कांदे ॥ नित्यार्चनं नित्यपदं नित्यसौख्यं निरामयम् ॥ निर्गुणं ज्ञानसंपन्नमुत्तमं जंगमस्थलम् ॥९९॥ वीरागमे ॥ अहिंसाऽनिंदितं चैवममायं समदर्शनम् ॥ निरुपाधि निरापेक्षं स्वतंत्रं जंगमस्थलम् ॥१००॥ स्कांदे ॥ मनःपीडा च

---

हे दोन दुर्गुण नाहींत त्यालाच पुरुष असें मानतात. (९५) वीरागमांत म्हटलें आहे कीं, दूध घुसळून त्यापासून लोणी काढून त्याचें तूप होतें; त्याचप्रमाणें सर्व शास्त्रांचा यथार्थ रीतीनें विचार करून, शरण हा तुपासारखा त्या शास्त्रांतील सारांश घेतो; आणि दुसरा विद्वान् ताकासारखा त्यांतील निःसत्व पदार्थ पितो. (९६) सिद्धान्तशिखामणींत म्हटलें आहे कीं, मंत्रांचा समुदाय अतिशय दुःखकारक आहे, तंत्रांचा समुदायही तसाच आहे, शास्त्रांच्या समुदायाचे तर अनेक अर्थ होतात; ह्यासाठीं विद्वान् मनुष्यानें हीं तिन्ही टाकून देऊन सुखी व्हावें (९७) सूतसंहितेंत म्हटलें आहे कीं, मी त्रैलोक्यपति जसा त्याचा शिष्य आहे, तसा त्याचा दुसरा शिष्यच नाहीं, कांतर अतिवर्णाश्रमी मनुष्य प्रत्यक्ष गुरूचाही गुरु होय असें म्हटलें आहे. (९८) वीरागमांत म्हटलें आहे कीं, गुरूविषयीं भक्ति, शिवाविषयीं भक्ति, शिवाचें ध्यान करण्यांत नेहमीं निमग्न असणें, आणि शिवज्ञानाविषयीं नेहमीं अभ्यास करणें, इतक्या गोष्टी करण्यास समर्थ असणारा प्राणी तोच सर्व जंगमांत श्रेष्ठ जंगम समजावा. (९९) स्कंदपुराणांत म्हटलें आहे कीं, जंगम हा नेहमीं शिवपूजनांत निमग्न असतो, त्याचें स्थान नित्य आहे, त्याला नित्यसुख आहे त्याला कोणत्याही रीतीचा रोग असत नाहीं, जंगमस्थल हें निर्गुण असून ज्ञानसंपन्न आहे, जंगमस्थल हें सर्वांत उत्तमस्थल आहे. (१००) वीरागमांत म्हटलें आहे कीं, जंगमस्थल हें अहिंसक आहे, तें कोणत्याही प्राण्याचा जीव नाश करीत नाहीं, जंगमस्थल हें निर्दोष असून निष्कपट आहे, त्याला सर्व प्राणिमात्र अगदीं सारखे आहेत, जंगमस्थलास कोणतीही उपाधि नाहीं, जंगमस्थलास कोणतीही अपेक्षा नसते, व जंगमस्थल हें स्वतंत्र आहे. (१०१) स्कंदपुराणांत म्हटलें आहे कीं, शिव म्हणतात—पार्वती, जंगमस्थलानें (जंगमानें) मनांत दुःख करूं नये, शोक करूं नये,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शोकश्च गतागतविचारणा ॥ वर्जनीया महादेवि निश्चलं जंगमस्थलम् ॥१०१॥ मुग्धत्वं मूर्तिमत्वं च मदमोहादिवर्जितम् ॥ मायादेहमलं नास्ति तच्च जंगमलक्षणम् ॥१०२॥ सत्यभाषासमायुक्तो नित्यं भिक्षान्नभक्षणः ॥ पंचमुद्राधरः कश्चित्स विभुर्जंगमोत्तमः ॥१०३॥ इष्टलिंगे महाप्रेमी प्राणलिंगं तु पश्यति ॥ भावलिंगात्मसंबंधी तच्च जंगमलक्षणम् ॥१०४॥ शिवे भक्तिः सदा शांतिः येऽहिताश्च हितास्समाः ॥ संतोषः सत्यमाचारं स्वतन्त्रं जंगमस्थलम् ॥१०५॥ वीरागमे ॥ जंगमो जंगमं दृष्ट्वा नमस्कारं तु संभ्रमात् ॥ आलिंगनं महाप्रीत्या कुर्याज्जंगमलक्षणम् ॥१०६॥ निर्मदो निरहंकारो निस्संगो निष्परिग्रहः ॥ निराशी चैव निर्मायो निर्देही ( सच ) निजजंगमः ॥१०७॥ धनधान्ये च वस्त्रे च फले पुष्पे स्त्रियामपि ॥ कश्चित्कामलवो नास्ति स निराशश्च जंगमः ॥१०८॥ निष्कलंकं निरापेक्षं निर्दोषं निस्पृहं तथा ॥ सत्यवाक्यं दयाशान्तमु-

---

अमुक एक आला आणि अमुक एक गेला ह्याचाही विचार करूं नये. जंगमस्थल हें निश्चित आहे. (१०२) जंगमस्थलाला मुग्धपणा नाहीं, त्याला आकार नाहीं, त्याला मद, मोह वगैरे विकार होत नाहींत. त्याला मायादेहाचा दोष नाहीं, तेंच जंगमलक्षण होय. (१०३) जो नेहमीं खरें बोलतो, जो नेहमीं भिक्षा मागून आपला चरितार्थ चालवितो, व जो पंचमुद्रा धारण करितो, तोच उत्तम जंगम होय. (१०४) जो इष्टलिंगावर अतिशय प्रेम ठेवितो, प्राणलिंगाचें नेहमीं दर्शन घेतो, व भावलिंगाशीं आत्म्याचा संबंध ठेवितो, तोच जंगम होय, हेंच जंगमलक्षण होय. (१०५) जे नेहमीं शिवाची भक्ति करितात, ज्यांचा स्वभाव नेहमीं शांत असतो, ज्यांस शत्रु आणि मित्र हे दोघेही सारखे असतात, जे नेहमीं संतुष्ट असतात, जे नेहमीं खरेपणानें वागतात, जे सद्वर्तनी असतात, व जे स्वतंत्र असतात, तेच जंगम होत. (१०६) वीरागमांत झटलें आहे कीं, जंगमानें जंगमास पाहिल्याबरोबर आधीं एकमेकांनीं एकमेकांस नमस्कार करावा, व मोठ्या प्रेमानें एकमेकांनीं एकमेकांस आलिंगन द्यावें. ही जंगमाची रीति आहे. (१०७) जंगमास मद नसतो, जंगमास अहंकार नसतो. जंगमास एकटें राहणें बरें वाटतें, त्याला परिवार असत नाहीं, तो नेहमीं उदासीनपणानें राहतो, त्याला कपट ठाऊक नसतें; त्याला देह असत नाहीं, त्याला निजजंगम असें झणतात. (१०८) द्रव्यावर, धान्यावर, वस्त्रांवर, फळांवर फुलांवर, बायकांवर देखील ज्याची काडीमात्र प्रीति नसते, त्या जंगमास निराशी ( उदासीन ) असें झणावें. (१०९) जंगमस्थल हें निर्दोष आहे, त्याला कोणताही दोष नसतो, त्याला कोणतीही आशा नसते, सो नेहमीं खरें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

त्तमं जंगमस्थलम् ॥१०९॥ निस्संगत्वं निराभारी निस्सीमं निरुपाधिकम् ॥ निराश्रयं गुणातीतमित्येतज्जंगमस्थलम् ॥११०॥ वीरागमे ॥ तृणं ब्रह्मा तृणं विष्णुस्तृणं त्रिभुवनं जगत् ॥ तृणं देवपदं यस्य तच्च जंगमलक्षणम् ॥१११॥ महाभारते ॥ विरक्तस्य तृणं नारी धीरस्य मरणं तृणम् ॥ उदारस्य तृणं वित्तं निस्पृहस्य तृणं जगत् ॥११२॥ शिवरहस्ये ॥ अणिमाद्यष्टसिद्धीनां निधीनामाप्तिरेव च ॥ सर्वसिद्धिस्तृणं यस्य तच्च जंगमलक्षणम् ॥११३॥ ब्रह्मोवाच ॥ गोपदं पृथिवी मेरुः स्थाणुराशाःसमुद्गिका ॥ तृणं त्रिभुवनं राम नैराश्यालंकृताकृतेः॥११४॥ भर्तृहरिकृतग्रन्थे ॥ वृत्तम् ॥ शंभो त्वच्चरणारविंदयुगलध्यानामृतस्वादिनः स्वर्गः स्वप्नफलायते ऋतुभुजामीशो वराकायते ॥ रम्भा निंबफलायते

---

बोलतो, त्याचा स्वभाव दयाळु असून शांत असतो, तेंच उत्तम जंगमस्थल होय. (११०) ज्याचे अंगीं निस्संगपणा असतो, जो निराभारी आहे, ज्याचे गुणांची इयत्ता करितां येत नाहीं, ज्याला कोणतीही उपाधि असत नाहीं, ज्याला कोणताही आश्रय असत नाहीं, जें त्रिगुणापेक्षांही पलीकडे आहे, त्यास जंगमस्थल असें ह्मणावें. (१११) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, ज्याला ब्रह्मदेव कसपटासारखा आहे, विष्णु कसपटासारखा आहे, हें सर्व त्रैलोक्य कसपटासारखें आहे, देवांचें स्थान स्वर्गलोक त्याला कसपटासारखें आहे, इतके सर्व गुण ज्याचे अंगीं आहेत तेंच जंगमाचें लक्षण आहे. (११२) महाभारतांत ह्मटलें आहे कीं, जो विरक्त आहे त्याला बायको कसपटासारखी आहे, जो धैर्यवान् आहे त्याला मरण कसपटासारखें आहे, जो उदार आहे त्याला पैसा हा कसपटासारखा आहे, जो निरिच्छ आहे, त्याला त्रैलोक्य कसपटासारखें आहे. (११३) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, अणिमा महिमा वगैरे अष्टमहासिद्धींची प्राप्ति, मुकुंद, कुंद वगैरे नऊ निधींची प्राप्ति, आणि इतर सर्व सिद्धींची प्राप्ति, कसपटासारखी मानण्या इतका निस्पृहपणा अंगीं असणें हें जंगमाचें लक्षण आहे. (११४) ब्रह्मदेवानें ह्मटलें आहे कीं, रामचंद्रा, ज्याचें अंग वैराग्यरूप अलंकारानें सुशोभित झालें आहे ( जो वैराग्यवान् आहे ), त्याला सर्व पृथ्वी गाईनें खूर ठेवलेल्या जमिनी इतकी थोडी दिसते, सोन्याचा मेरुपर्वत एखाद्या लहानशा डोंगरासारखा दिसतो, सर्व दाहीदिशा एखाद्या संबळी ( पेटी ) सारख्या वाटतात, त्रैलोक्य हें गवतासारखें वाटतें; सारांश, त्याला कशाचीच आशा नसते. (११५) भर्तृहरीनें केलेल्या ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, हे श्रीशंकरा, तुझ्या दोन्ही चरणकमलांचे ध्यानाची गोडी अनुभवणाऱ्या लोकांस स्वर्ग लोकांतील सुख स्वप्नांतील सुखासारखें क्षणभंगुर वाटतें, यज्ञभाग घेणाऱ्या देवांचा अधिपति ( इंद्र ) हा क-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विधिपरो वेदः पिशाचायते लक्ष्मीस्तूलकणायते भवमहासिंधुश्च बिंद्वायते ॥११५॥ स्कांदे ॥ ब्रह्मोत्तरखंडे ॥ शिवज्ञानसुधापानमदमत्तस्य योगिनः॥ इंद्रभोगस्तृणं भाति का कथा नृपकीटके ॥ ॥११६॥ वातुले॥ वृत्तम्॥ अतत्वसंसारविनाशनेन श्रुतिप्रमाणेन च तर्कवर्त्मना॥ प्रबोधमानश्च शिवस्य तं पुनः स्वमेव गायन् विचरेत् स लीलया ॥११७॥ योगसारे ॥ स्वेच्छया चरति क्षोणिं भुंजानो विषयानपि ॥ अकर्तांतर्बहिःकर्ता स योगी राजयोगिराट् ॥११८॥ शिवयोगदीपिकायाम् ॥ पुण्यक्षेत्रेषु सर्वेषु संचरन्नात्मवृत्तये ॥ याचमानो जनान्साधून्न जातु क्लेशयेत्कृशान्॥११९॥ वातुले ॥ यथा मध्वा दधानोऽपि भृंगः पुष्पं न बाधते ॥ तथा माधुकरीं भिक्षामाददीत गृहाधिपात् ॥१२०॥ वीरागमे ॥ जटी मुंडी शिखी वापि भिक्षाशी विगतस्पृहः ॥ मौनी भूतानु-

---

वडीच्या किंमतीचा वाटतो, रंभा नांवाची अप्सरा कडूलिंबाच्या फळासारखी वाटते, ज्यांत अनेक प्रकारचे विधि सांगितले आहेत असा वेद पिशाचासारखा वाटतो, संपत्ति कापसाच्या लहानशा गोळ्यासारखी क्षुल्लक वाटते, व संसारसमुद्र एखाद्या पाण्याच्या थेंबासारखा भासतो. (११६) स्कंदपुराणांत ब्रह्मोत्तरखण्डांत ह्मटलें आहे कीं, शिवज्ञानरूपी अमृतपान करून तृप्त झालेल्या योगीश्वरास इंद्राची संपत्ति तृणासारखी यःकश्चित् वाटते; मग इतर लहानसान राजाचे संपत्तीची त्यांस काय प्रतिष्ठा आहे. (११७) वातुलांत ह्मटलें आहे कीं, ज्यांत कांहींच अर्थ नाहीं अशा संसाराचा नाश झाल्यामुळें, वेद प्रमाण मानल्यामुळें, व तर्कशास्त्राच्या अनुरोधानें शिवाचें यथार्थ तत्व समजलेला शिवयोगी पुनः आपले आपणच त्या शिवाला यथार्थ रीतीनें जाणून स्वतः स्वच्छंदपणानें सर्व पृथ्वीवर फिरतो. (११८) योगसारांत ह्मटलें आहे कीं, जो शिवयोगी स्वच्छंदपणानें पृथ्वीवर फिरतो, तो विषयसुखाचा उपभोग घेत असला तरी त्यास अंतर्बाह्य कोणत्याही कर्माचा दोष लागत नाहीं, त्या शिवयोग्याला राजयोगीश्वर असें ह्मणावें. (११९) शिवयोगदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, शिवयोगी सर्व पुण्यक्षेत्रांत संचार करीत असतां सज्जन लोकांजवळ आपल्या निर्वाहापुरतीच भिक्षा मागतो खरा; परंतु अशक्त आणि दुर्बळ ( गरीब ) अशा लोकांजवळ भिक्षामागून त्यांस कधींही त्रास देत नाहीं. (१२०) वातुलांत ह्मटलें आहे कीं, जसा भुंगा फुलांतील मध घेतो, परंतु त्या फुलाला दुखवीत नाहीं; त्याचप्रमाणें शिवयोगी माधुकरी वृत्तीनें गृहस्थाश्रमी मनुष्यापासून भिक्षा घेऊन आपला निर्वाह करितोः परंतु त्यास त्रास देत नाहीं. (१२१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जटा वाढविणें, मुंडन करणें किंवा शिखी असणें, भिक्षा मागून खाणें, निरिच्छप-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

कंपी च जंगमानां च लक्षणम् ॥१२१॥ पाराताख्यतन्त्रे ॥ जटानां वेष्टनं कार्यं शिरो मुण्डी न वेष्टयेत् ॥१२२॥ लैंग्ये ॥ जटिनो मुण्डिनो वापि तथा नानाप्रकारिणः ॥सद्भस्म धारयेयुस्ते कर्मणा मनसा गिरा ॥१२३॥ शिवेयागदीपिकायाम् ॥ परस्य ज्ञानचिन्हानि यानि संति शरीरिणाम्॥ तानि ज्ञानागमत्वेन प्रवर्तंते विमुक्तये ॥१२४॥ योगजागमे ॥ वृत्तम् ॥ नाहं मनुष्यो न च देवयक्षौ न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः ॥ न ब्रह्मचारी न गृही वनस्थो न भिक्षुकोऽहं निजवोधरूपः ॥१२५॥ वीरागमे॥ सदाशिवस्य तत्वस्य यदधिष्ठानमुत्तमम् ॥ स्थावरं जंगमं चैतत्परलिंगमुदीरितम् ॥१२६॥ कामिकागमे ॥ परात्परप्रसादस्य जंगमो नामरूपकः ॥ परानंदश्चरश्चैव पावनः कर्तृरूपकः ॥१२७॥ अचिन्त्यविश्वसादाख्ये ॥ स्वयं स्वयत्वमासाद्य चरतो न परः स्वतः ॥ आस्ते ततोऽतीतवर्णः समत्वेन परः

---

णानें वागणें, मौन धारण करणें, आणि सर्व प्राणिमात्रांवर दया करणें, हीं जंगमाचीं लक्षणें आहेत. (१२२) पारात नांवाच्या तंत्रांत ह्मटलें आहे कीं, शिवयोग्यानें डोक्यास कांहीं गुंडाळणें झालें तर जटाच गुंडाळाव्या त्यानें मुंडन केलें असलें तर डोक्यास दुसरें कांहीं त्यानें वांधूं नये. (१२३) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवयोगी जटाधारी असोत, मस्तकाचें मुंडन केलेलें असोत, किंवा दुसरें अनेक तऱ्हेचे वेष घेतलेले असोत, त्यांनीं कायावाचामनानें उत्तम भस्म आपल्या आंगास लावावें ह्मणजे झालें. शिवयोगी लोकांनीं भस्मधारण केलेंच पाहिजे. (१२४) शिवयोगदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, परयोग्याचीं जीं कांहीं ज्ञानाचीं लक्षणें आहेत, तीं सर्व प्राणिमात्रांस ज्ञानागमत्वाच्या साधनानें मोक्षप्राप्ति करून देण्यास कारण होतात. (१२५) योगजागमांत ह्मटलें आहे कीं, मी मनुष्य नव्हें देव नव्हें किंवा यक्ष नव्हें, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्यांपैकींही कोणी नव्हें, ब्रह्मचारी नव्हें, गृहस्थाश्रमी नव्हें, वानप्रस्थाश्रमी नव्हें, किंवा सन्याशीही नव्हें; मी आत्मबोधस्वरूप आहें. (१२६) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, सदाशिवतत्वाचें जें कांहीं उत्तम अधिष्ठान आहे, त्या स्थावरजंगमलिंगास परलिंग असें ह्मणतात. (१२७) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं, श्रेष्ठाहून श्रेष्ठ, जो प्रसाद आहे त्या श्रेष्ठ प्रसादाचा जंगम हा नामरूप धारण करणारा आहे, तो अतिशय आनंदी असतो, त्याला चर ह्मणतात, तो पवित्र आहे, आणि तो कर्तृस्वरूप आहे. (१२८) अचिंत्यविश्वसादाख्य ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, स्वयं हा स्वयंपणास पाऊन फिरत असतां त्याच्यापेक्षां कोणी पर नाहीं, तो अतीतवर्ण होऊन राहतो, त्या स्वयंच्या योग्यतेची दुसरी कोण-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्मृतः ॥१२८॥ ईश्वर उवाच ॥ नात्मार्थं याचयेद्भिक्षां शिवार्थं याचयेत्सुधीः ॥ तस्माल्लिंगार्पितां भिक्षां देहीति वचनं वदेत् ॥१२९॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ गुरोर्लब्धमहाज्ञानः संसारामयभेषजः ॥ मोदते यत्सुखी शान्तः स जीवन्मुक्त एव हि ॥१३०॥ वीरागमे ॥ सर्वसंगपरित्यागी लिंगसंगी निरंतरम् ॥ भिक्षाहारी सुचित्तः स्यात्क्रियामुण्डी सुलक्षणः ॥१३१॥ लैंग्ये ॥ मुण्डी वा शिवचिन्हानि धारयेदजिनादिकम् ॥ भिक्षाशी नियताहारः सुखी संसारवर्जितः ॥१३२॥ वासिष्ठे ॥ असौ माधुकरं कुर्यात्पाकनतिमयाचितम् ॥ तात्कालिकं चोपपन्नं पंचभैक्ष्यमिति स्मृतम् ॥१३३॥ भर्तृलहर्यां ॥ वृत्तम् ॥ भिक्षाहारमदैन्यमप्रतिसुखं भीतिच्छिदं सर्वदा दुर्मात्सर्यमदाभिमानमथनं दुःखौघविध्वंस-

---

तीही वस्तु नसल्यामुळें त्यास परजंगम असें ह्मणतात. (१२९) परमेश्वर ह्मणतात, चांगल्या बुद्धीच्या मनुष्यानें आपल्याकरितां भिक्षा मागूं नये, शिवाकरितां भिक्षा मागावी. ह्याकरितां त्यानें लिंगास समर्पण करावयाची भिक्षा द्या असें ह्मणावें. (१३०) सिद्धान्तशिखामणींत ह्मटलें आहे कीं, गुरूपासून शिष्याला जें उत्तमप्रकारचें ज्ञान झालें आहे, तें ज्ञान संसाररूप रोगास औषधासारखें आहे; आणि त्यामुळेंच तो सुखानें राहतो, तो स्वभावानें शांत असतो, व तो प्रत्यक्ष जीवन्मुक्तच आहे असें ह्मटलें तरी चिंता नाहीं. (१३१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जो सर्वसंग परित्याग करून नेहमीं लिंगाला आपले शरीरावर वागवितो, भिक्षा मागून खातो, त्याचें मन चांगलें आहे, त्याचें लक्षण चांगलें आहे, त्यास क्रियामुंडी असें ह्मणावें. (१३२) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, एखादा शिवयोगी जटा न राखतां मस्तकाचें मुंडन करितो, भस्म रुद्राक्ष धारण करून हरिणाजिन वगैरे बाळगितो, भिक्षा मागून खातो, आणि खाणें झालें तरी फारच थोडें अन्न खातो, व संसार सोडून देऊन सुखानें राहतो. (१३३) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, हा शिवयोगी मधुकरी मागून चरितार्थ करितो; कोणी हांक मारून जेवावयास घातलें तर जातो, न मागतां कोणी आपण होऊन आणून दिलें तर घेतो, आयत्यावेळीं जें मिळेल तें भक्षण करितो, किंवा सहजरीतीनें मिळेल तें घेऊन आपला चरितार्थ करितो- अशा पांच प्रकारच्या भिक्षांपैकीं कोणत्यातरी एक प्रकारची भिक्षा तो मागतो. (१३४) भर्तृलहरींत ह्मटलें आहे कीं, योगीश्वर लोक भिक्षा मागून आपला चरितार्थ करितात, ते कधींही दुःखी असत नाहींत, त्यांचे सुखाची मर्यादा करितां येत नाहीं, त्यांस कशाचा लवलेश नसतो, मत्सर, मद, अभिमान हे दुर्गुण त्यांनीं नेहमीं टाकून दि-

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

नम् ॥ सर्वत्रान्वहमप्रयत्नसुलभं साधुप्रियं पावनं शंभोस्सत्रमवार्यमक्षयनिधिं शंसन्ति योगीश्वराः ॥१३४॥ मूर्तिश्च लिंगमूर्तिश्च सुशीलं लिंगशीलवत् ॥ गुणं सर्वस्य लिंगस्य तत्स्याज्जंगमलक्षणम् ॥१३५॥ वीरागमे ॥ चित्तवुद्धिशिवज्ञानं भिक्षाहारं जितेंद्रियम् ॥ शिवलिंगार्चनं नित्यमुत्तमं जंगमस्थलम् ॥१३६॥ गमनागमनं नास्ति सत्यवाक्यं दृढव्रतम् ॥ क्षुधाभोगादिरहितं तस्य भिक्षा विधीयते ॥१३७॥ वासिष्ठे ॥ विभ्यत्यखिलपापानि क्षीयते च मलत्रयम् ॥ भिक्षा रक्षा मुमुक्षा च भिक्षाशब्देन गीयते ॥१३८॥ देविकालोत्तरे ॥ सर्वद्वंद्वविनिर्मुक्तः सततं जनवर्जितः ॥ अनेनैव शरीरेण सर्वज्ञः संप्रकाशते ॥१३९॥ सप्तावल्याम् ॥ सर्वत्र दृश्यते स्वस्थः सर्वत्र विमलाश्रयः ॥ सर्वत्र च सदा युक्तः सोऽयं सर्वत्र राजते ॥१४०॥ द्रव्याणां समदर्शी यः स मुक्तस्सर्ववंधनैः ॥ सर्व

---

लेले असतात, दुःखरूप प्रवाहाचा त्यांनीं नाश केलेला असतो, सर्वत्र मीच भरलेला आहे असें त्यांस वाटतें, व त्यांना शंकराचें सत्र ( दीक्षा व्रत ) हें सहज रीतीनें पाळतां येतें. हें व्रत फार चांगलें असून इच्छितवस्तु देणारें व पवित्र आहे, तें कधींही चुकावयाचें नाहीं, त्याचा कधींही नाश होत नाहीं, तें निधीसारखें आहे ह्मणून त्याची प्रशंसा करितात. (१३५) लिंगासारखी मूर्ति व लिंगशीलासारखें चांगलें शील असावें. लिंगाचे अंगीं जितके कांहीं गुण आहेत तितके सर्व गुण अंगीं असणें हें जंगमाचें लक्षण आहे. (१३६) जंगमस्थलाला चित्तशुद्धि आणि शिवज्ञान हीं असतात. जंगम हा भिक्षा मागून आपला चरितार्थ करितो, त्याचीं इंद्रियें त्याच्या स्वाधीन असतात, तो नेहमीं शिवलिंगाचें पूजन करितो तेंच उत्तम जंगमस्थल होय. (१३७) जंगमाला जाणे येणें वगैरे कांहीं नाहीं, तो नेहमीं खरें बोलतो, त्याचें व्रत दृढ असतें, त्याला भूक आणि विषयसुख ह्यांची वाधा असत नाहीं अशा जंगमालाच भिक्षा घालावी. (१३८) वासिष्ठपुराणांत ह्मटलें आहे कीं, भिक्षा असें तिला नांव पडण्याचें कारण " भि " ह्या अक्षराचा अर्थ सर्व पापें भितात असा होतो, व " क्षा " ह्या अक्षराचा अर्थ आणव, माया, कार्मिक ह्या तीन मलांचा नाश करणें असा होतो; भिक्षेलाच भिक्षा, रक्षा आणि मुमुक्षा अशीं तीन नांवें आहेत. (१३९) देविकालोत्तरांत ह्मटलें आहे कीं, जंगमाचे सर्व प्रकारचे द्वैतभाव नाहींसे झालेले असतात, तो नेहमीं एकांतांत राहतो, तो ह्याच शरीरानें सर्वज्ञ असल्यासारखा दिसतो. (१४०) सप्तावलींत ह्मटलें आहे कीं, सर्व ठिकाणीं स्वस्थ असल्यासारखा दिसतो, सर्व ठिकाणीं त्याचा आश्रय निर्दोष असतो, तो सर्व ठिकाणीं व्यापलेला असतो, तो ह्या सर्व ठिकाणीं शोभतो. (१४१) जो द्रव्याला सर्वदा सारखें पाहतो, त्याचीं सर्व प्रकारचीं बंधनें नाहींशीं झालेलीं आहेत,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शिवमयं भाति नाशिवं विद्यते क्वचित् ॥१४१॥ भगवद्गीतायाम् ॥ तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केन चित् ॥ अनिर्देश्यः स्थिरमतिर्भक्तिमान् यस्स मे प्रियः ॥१४२॥ लिंगं शिवो भवेत्क्षेत्रमंगं संयोगमाश्रयः ॥ तस्माल्लिंगांगसंयुक्तो योऽपि सोऽत्याश्रमी भवेत् ॥१४३॥ ईश्वर उवाच॥ स्वच्छंदगतियोगेन स्वच्छंदगतिचारणः॥ स्वच्छन्ददेही यो नित्यं स्वच्छन्दः समतान्वितः ॥१४४॥ ग्रन्थान्तरे ॥ परतत्वपरज्ञानपरमार्थे परात्परे ॥ वाचामगोचरे शब्दगंभीरेऽप्युपमातिगे ॥१४५॥ शिवज्ञानमहाज्योतिः प्रभायां कृतखेलनाः ॥ यतयो ज्ञानशृंगारमहाज्योतिर्विभूतयः ॥१४६॥ पंचब्रह्माख्यदर्शाढ्या व्योमकंथास्वलंकृताः ॥ चिदाकाशकिरीटाश्च ब्रह्माण्डश्रुतिकुण्डलाः ॥१४७॥ आद्याधारमहोदारकक्षपात्रवि-

---

त्याला शिव सर्व ठिकाणीं परिपूर्ण रीतीनें भरलेला आहे असें वाटतें. शिव नाहीं असें एक देखील स्थान त्याला कोठें दिसत नाहीं. (१४२) भगवद्गीतेंत ह्मटलें आहे कीं, ज्याला निंदा आणि स्तुति दोन्ही सारख्याच वाटतात, कोणी स्तुति केली तर जो गर्व मानीत नाहीं, किंवा कोणी निंदा केली तर त्यावर रागावत नाहीं, जो नेहमीं मौन धारण करितो, जो जें कांहीं सहजरीतीनें मिळेल त्यांत संतोष मानतो ज्याची स्थिति अमुक एक प्रकारची आहे ह्मणून सांगतां येत नाहीं, ज्याची चंचल बुद्धि नसते, जो मनापासून भक्ति करितो, तो मनुष्य मला फार आवडतो. (१४३) लिंग ह्याच शिव आहे, आणि अंग हें क्षेत्र आहे. लिंगाच्या आणि अंगाच्या संयोगाला आश्रय ह्मणतात. ह्यासाठीं लिंगाचा अंगाशीं संयोग पावलेला जो कोणी असेल, तोच अत्याश्रमी होतो. (१४४) परमेश्वर ह्मणतात, स्वच्छंदगमनाच्या सहायानें स्वच्छंदपणानें वागणारा जो कोणी स्वच्छंदशरीरी असेल, त्यास स्वच्छंद असें ह्मणावें. त्याला सर्व प्राणिमात्र सारख्या योग्यतेचे वाटतात. (१४५) इतर ग्रंथांत सांगितलें आहे कीं, परतत्व, परज्ञान आणि परमार्थ हीं तीन श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहेत, त्यांचें वाचेनें वर्णन करितां येत नाहीं, तीं शब्दशक्तीहून गंभीर ( प्रौढ ) आहेत, त्यांची बरोबरी करील असा जगांत दुसरा पदार्थच नाहीं. (१४६) सन्यासीलोक शिवज्ञानरूप दीपाच्या प्रकाशांत अनेक प्रकारचे खेळ खेळतात, शिवज्ञान हेंच त्यांचा शृंगाररस असून, शिवज्ञानज्योति हींच त्यांचीं ऐश्वर्यें आहेत. (१४७) पंचब्रह्मनांवाचे त्यांचे आरसे आहेत, त्यांत ते आपलीं रूपें पाहतात, आकाशरूप कांबळी ते आपले अंगावर पांघरण्याकरितां घेतात, आणि त्यामुळें ते सुशोभित दिसतात; आपले मस्तकावर चिदाकाशरूप मुकुट घालितात, ब्रह्माण्डश्रुति ( जगांत जितके वेद आहेत ते वेद ) आपल्या कानांत कुंडलासारखे घालतात. (१४८) आद्यचक्र आणि

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

शोभिताः ॥ अनाहतोड्यानबंधाद्वैतभूयोगपट्टिकाः ॥१४८॥ अगम्यभावनायोगपादुकालंकृतांघ्रयः ॥ अमलत्वभ्राजमानखर्परा लोकविश्रुताः ॥१४९॥ अप्रमाणत्वसंशोभिलाकुलादण्डमण्डिताः ॥ अकल्पतत्वभिक्षाश्च स्वीकारगमनोज्वलाः ॥१५०॥ संस्थानिवासिनैश्चित्यभावाश्रमविहारिणः ॥ निरालंबनतासिंहपीठिकासुखसंस्थिताः ॥१५१॥ पुनन्ति सततं लोकान् दर्शनस्पर्शनादपि॥ यतयः शिवसाकारा जगत्पावनमूर्तयः ॥१५२॥ सूतसंहितायाम् ॥ अकल्पितरसं भैक्ष्यमकल्पितसुखासनम् ॥ अनुपम्यसुखं शांतमुत्तमं जंगमस्थलम् ॥१५३॥ शिवरहस्ये ॥ गुरुकल्पितभिक्षान्नमकल्पितशिवाज्ञया ॥ द्वयहीनं देवि भुंक्ते स पापी जंगमाधमः ॥१५४॥ शिवाद्वैते ॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य किमन्यैर्भोज्यराशिभिः॥

---

आधारचक्र हीं दोन मोठमोलालीं भिक्षापात्रें त्यांच्या जवळ असल्यामुळें ते कुरूप दिसतात. अनाहतचक्र, उड्यानबंध आणि अद्वैतभू ह्या त्यांच्या योगपट्टिका होत. (१४९) ज्याची कल्पनाच करितां येत नाहीं अशा तऱ्हेचें योगसामर्थ्य ह्याच त्यांनीं आपले पायांत खडावा घातल्यानें त्यांचे पाय सुशोभित दिसतात. निर्दोष स्वभाव हेंच त्यांचे हातांतील सुशोभित खापर होय; ते सर्व जगांत प्रसिद्ध असतात. (१५०) अप्रमाणपणामुळें ( अनुपमेयतेमुळें ) शोभणारा लाकुल ( शिवागमांत एक भेद आहे) तो त्यांच्या हातांतील दंड होय. अकल्पतत्व ही त्याची भिक्षा होय. आणि मनास वाटेल तिकडे जाण्याची शक्ति ( स्वच्छंदगमन ) असल्यामुळें ते शोभतात. (१५१) संस्था, निवासि आणि नैश्चित्यभाव ह्या आश्रमांमध्यें ते विहार करितात. तसेंच निरालंबनतारूप सिंहासनावर ते सुखानें बसतात. (१५२) ते सन्यासीलोक प्रत्यक्ष शिवस्वरूप होत, त्रैलोक्यांतील लोकांच्या शरीरांपेक्षां त्यांचीं शरीरें पूज्य आहेत; ते आपल्या दर्शनानें आणि लोकांच्या अंगावर हात फिरवून त्यांस पवित्र करितात. (१५३) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, मुद्दाम आवडीचे ह्मणून तयार केलेले पदार्थ ज्या भिक्षेंत नसतील ती भिक्षा आनंदानें भक्षण करणें, मुद्दाम मनाप्रमाणें तयार न केलेल्या, जशी असेल तशा शय्येवर सुखानें निजणें, ह्या दोन्ही गोष्टींतच परमावधीचें सुख मानणें हेंच उत्तम जंगमाचें लक्षण आहे. (१५४) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, गुरुनें जशी भिक्षा मागावी ह्मणून सांगितली आहे व शिवागमांत जशा रीतीनें वागावें ह्मणून सांगितलें आहे तशा तऱ्हेनें न वागतां, हे पार्वती, जो जंगम मनास वाटेल तसें वर्तन करून मनास वाटेल ते पदार्थ भक्षण करितो, तो जंगम महापातकी समजावा. (१५५) शिवाद्वैतांत सांगितलें आहे कीं, जो मनुष्य

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ज्ञानमेव परानंदं प्रकाशयति शैवकम् ॥१५५॥ शिवधर्मोत्तरे ॥ ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः ॥नैवास्ति किंचित्कर्तव्यमस्ति चेन्न स तत्ववित् ॥१५६॥ जगतां पतिरर्थित्वाद्विष्णुर्वामनतां गतः ॥ अधिको यः परस्तस्माद्यो न यास्यति लाघवम् ॥१५७॥ शिवरहस्ये ॥ रूपारूपं समाख्यातं कामनिष्कामवर्जितम् ॥ मायानिर्मायनिर्मुक्तमेतज्जंगमलक्षणम् ॥१५८॥ स्वच्छंदललितभैरवीये ॥ वृत्तम् ॥ यथा रविस्सर्वरसान्प्रभुंक्ते हुताशनस्सर्वगतं हि भक्षयेत् ॥ तथाहि योगी विषयान् प्रभुंजन्न लिप्यते सर्वशुभाशुभैश्च ॥ १५९॥ पुंखानपुंखविषयेक्षणतत्परोऽपि ब्रह्मावलोकननिरूढमनाश्च योगी ॥ संगीततालयवाद्यसुसंगतापि मौलि-

---

शिवज्ञानामुळें तृप्त झाला आहे, त्याला दुसरे खाण्याच्या पदार्थांचे ढीग कशाला पाहिजेत? शिवाचें अद्वैतज्ञान हें त्याला अतिशय आनंद मिळवून देतें. (१५६) शिवधर्मोत्तरांत म्हटलें आहे कीं, जो योगीश्वर शिवज्ञानानें तृप्त आहे व त्यामुळें कृतार्थ झालेला आहे, त्याला ह्या जगांत करावयाचें असें कोणतेंही कृत्य राहिलेलें नाहीं. आणि जर राहिलें असेल, तर त्यास तत्वज्ञान झालें नाहीं असें म्हटलें पाहिजे. (१५७) दुसऱ्याजवळ मला अमुक वस्तु द्या म्हणून मागणें फार कमीपणा आणतें, श्रीविष्णु हा त्रैलोक्याचा अधिपति होता तरी त्याला बलीजवळ मागण्यास जातांना वामन ( लहान ) रूप घ्यावें लागलें मग त्यापेक्षां आणखी दुसरा कोण श्रेष्ठ आहे, कीं, त्याला दुसऱ्याजवळ मागण्यास गेल्यावर कमीपणा येणार नाहीं? (१५८) शिवरहस्यांत म्हटलें आहे कीं, रूपामुळें आणि रूप नसल्यामुळें जंगमाची प्रसिद्धि आहे, जंगम हा सकामही नव्हे आणि निष्कामही नव्हे. त्याला मायेचा संबंध आहे आणि मायेचा संबंध नाहीं, अशा रीतीचें जंगमाचें रूप आहे. (१५९) स्वच्छंदललितभैरवांत म्हटलें आहे कीं, जसा सूर्य आपल्या किरणांनीं पृथ्वीवरील सर्व तऱ्हेच्या ओल्यापदार्थांतून ओलावा शोषून घेऊन त्यांस कोरडे करितो, जसा विस्तव कोणतेही नासके कुजके पदार्थ जाळून टाकितो, त्याप्रमाणेंच योगी विषयांचा उपभोग घेतो; त्यास त्याबद्दल पुण्य किंवा पाप मुळींच लागत नाहीं. (१६०) ज्याप्रमाणें एखाद्या नियमानें हटकून निशाण मारणाऱ्या धनुर्धराचें लक्ष बाणाच्या पिसाऱ्याकडे असतें व नसतें; त्याचप्रमाणें योगीश्वर संसारसुखाचा अनुभव घेतो असें दिसलें तरी त्याचें वास्तविक लक्ष ब्रह्मस्वरूप पाहण्यांत गुंतलेलें असतें, एखादी नाच करणारी वेश्या आपल्या डोकीवर घागर ठेवून तालसुराला न सोडतां नर्तन करिते, आणि तिचें लक्ष जसें डोकीवरील घागरीकडे आणि तालसुराकडेही

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्वकुंभपरिरक्षणधीर्नटीव ॥१६०॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ परपुरुषरता नारी भर्तारमनुवर्तते॥ परब्रह्मरतो योगी संसारमनुवर्तते ॥१६१॥ पाराशरपुराणे ॥ सर्वं त्यक्त्वा यथा ज्ञानी मामेकं लब्धवान् प्रिये ॥ सर्वं त्यक्त्वा तथा चाहं तमेकं लब्धवान् प्रिये ॥१६२॥ वासिष्ठे ॥ एवं तत्वे परे शुद्धे धीरो विश्रान्तिमाश्रितः॥तदेव स्वादयत्यन्तं बहिर्व्यवहरन्नपि ॥१६३॥ तंत्रसारे ॥ शान्तसंसारकलवः कलावानपि निष्कलः ॥ यस्सुचित्तोऽप्यचित्तस्तु स जीवन्मुक्त उच्यते ॥१६४॥ मुक्तिरेव परं तृप्तिः परमानंदलक्षणा ॥ नित्यतृप्तस्य मुक्तस्य किमन्यैर्भोगसारदैः ॥१६५॥ देविकालोत्तरे ॥ हेतुर्नास्ति फलं नास्ति नास्ति कर्म स्वभावतः ॥असद्भूतमिदं सर्वं नास्ति लोको न लौकिकः ॥१६६॥ हंसोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ आशांबरो ऽनमस्कारो ऽष्टधा स्वधाकारः न निंदास्तुतिर्यादृच्छिको

---

असतें, तसेंच योगीश्वराचें मन संसारांत असून परब्रह्मस्वरूपाकडे असतें. (१६१) अचिंत्यविश्वसादाख्य ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, जशी व्यभिचार करणारी बायको वरवर आपल्या नवऱ्याच्या मनाप्रमाणें वागते; त्याप्रमाणें परब्रह्मस्वरूपास लुब्ध झालेला योगीश्वर संसारांत वागतो; त्याचें संसारसुखाकडे मुळींच लक्ष नसतें. (१६२) पाराशरपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, जसा शिवयोगी जगांतील सर्व प्रकारचे व्यवसाय सोडून मला एकालाच एकाग्रमनानें भजतो; त्याप्रमाणें मीही जगांतील दुसरे सर्व व्यवसाय सोडून त्याचेवरच प्रेम करितो. इतरांवर करीत नाहीं (१६३) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, शिवतत्व हें श्रेष्ठ असून शुद्ध आहे, त्या शिवतत्वांत जो धैर्यवान् मनुष्य विश्रांतिसुख घेऊं लागतो; तो संसारकृत्यांत वापरत असला तरी आंत बाहेर त्या शिवतत्वाचे सुखाचाच उपभोग घेतो. (१६४) तंत्रसारांत ह्मटलें आहे कीं, ज्याचा संसारसंबंधीं सर्व प्रकारचा व्यवसाय बंद पडला आहे ( ज्याची संसारसुखावर आसक्ति राहिली नाहीं, ) जो संसारी असून विरक्त आहे, जो सुचित्त असून अचित्त आहे ( ज्याला मन असून मन नाहीं ), त्यास जीवन्मुक्त असें ह्मणावें. (१६५) मुक्ति हीच मोठी तृप्ति आहे, मुक्तीसारखी तृप्ति दुसरी नाहीं, अतिशय आनंद हें त्या मुक्तीचें लक्षण आहे. जो मुक्त नेहमीं तृप्त आहे, त्याला दुसरीं संसारसुखें कशाला पाहिजेत? मुळींच नकोत.(१६६) देविकालोत्तरांत ह्मटलें आहे कीं, कर्मांच्या स्वभावाप्रमाणें पाहिलें तर हेतु नाहीं व फळही नाहीं, खरें असल्याप्रमाणें भासणारें हें दिसत असलेलें सर्व कांहीं नाहीं; लोक नाहीं व लोकस्थितिही नाहीं. (१६७) हंसोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जंगम हा नग्न असतो, त्याला कोणास साष्टांग नमस्कार करावा लागत नाहीं ( तो कोणास साष्टांग नमस्कार करीत नाहीं ) तो यज्ञयाग करीत नाहीं, त्याला निंदा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

भिक्षुर्नावाहनं न विसर्जनं न मंत्रं न ध्यानं नोपासना नोपासितं च न लक्ष्यं नालक्ष्यं न पृथगपृथक् सर्वत्रानिकेतनस्थितिरेव भिक्षुः ॥१६७॥ देविकालोत्तरे ॥ नात्र पूजा नमस्कारो न जपो ध्यानमेव च॥ केवलं ज्ञेयमित्युक्तं वेदितव्यं न किंचन ॥१६८॥ वीरागमे ॥ न सुखं तस्य दुःखं च न ज्ञानं ज्ञानमेव च ॥ नोत्कृष्टत्वं न हीनत्वं नारिष्टं चेष्टमेव च ॥१६९॥ योगसारे ॥ तत्वत्रयविनिर्मुक्तः शाश्वतं चाचलं ध्रुवम्॥ दिव्यमार्गेण योगेन दृष्ट्वा भूयो न जायते ॥१७०॥ स्कान्दे ॥ संचारात्पावना भूमिर्दर्शनात्पावनं नभः ॥ भाषणात्पावनो मंत्रो गानात्सामं च पावनम् ॥१७१॥ वासिष्ठे ॥ अपिशीतरुचामर्के सुतीक्ष्णेऽपीन्दुमण्डले॥अधःप्रसरणे त्वग्नौ जीवन्मुक्तो न विस्मयी॥१७२॥कल्पान्तपवना वान्तु यांतु चैकत्वमर्णवाः॥

---

आणि स्तुति ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. तो स्वच्छंदपणानें भिक्षा मागत फिरतो. त्याला आवाहन नाहीं, विसर्जन नाहीं, मंत्र नाहीं, ध्यान नाहीं. उपासना नाहीं, उपासना करावयाचें दैवत नाहीं, लक्ष्य नाहीं, अलक्ष्य नाहीं, वेगळेपणा नाहीं, एकपणा नाहीं. सन्याशाला कोठेंही एकेजागीं फार दिवस राहतांच येत नाहीं. (१६८) देविकालोत्तरांत ह्मटलें आहे कीं, ह्या जंगमाचे स्थितींत पूजा नाहीं नमस्कार नाहीं, जप नाहीं, ध्यान देखील नाहीं. फक्त जाणावयाचें आहे असें ह्मटलें ह्मणजे झालें, मग जाणावयाचें असें कांहींच उरलें नाहीं. (१६९) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, त्याला सुख नाहीं, किंवा दुःख नाहीं, ज्ञान नाहीं किंवा अज्ञान नाहीं, त्याला चांगलें नाहीं, किंवा वाईट नाहीं, त्याला नावडतें असें कांहीं नाहीं, किंवा आवडतें असेंही कांहीं नाहीं. (१७०) जो मनुष्य तत्वत्रयापासून मुक्त झाला आहे, ब्रह्मशाश्वत अचल आणि नित्य आहे, असें दिव्यमार्ग असणाऱ्या योगदृष्टीनें ज्याला समजलें आहे, तो पुनः जन्मास येत नाहीं. (१७१) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगम ज्या जमिनीवरून जातो येतो, ती जमीन त्याच्या जाण्या येण्यामुळें पवित्र होते, जंगमाचे दर्शनामुळें आकाश पवित्र होतें, त्या जंगमाशीं गोड दोन शब्द बोलल्यानें पवित्र मंत्र जपल्यासारखें आहे, त्या जंगमानें गायन केलेलें ऐकणारास सामवेद पठण केल्याचें फळ आहे. (१७२) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, सूर्याच्या उन्हांत थंडपणा आला, चंद्राच्या चांदण्यांत उष्णता भासूं लागली आणि अग्नीच्या ज्वाला स्वाभाविकपणानें वर जावयाच्या त्या वर न जातां जरी खालीं पसरूं लागल्या, तरी त्याबद्दल जीवन्मुक्ताला आश्चर्य वाटत नाहीं. (१७३) प्रलयकाळच्या वेळीं जसे भयंकर वारे सुटतात तसे वारे सुटोत, चोहोंकडे समुद्राचें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ तपंतु द्वादशादित्या नास्ति निर्मनसः क्षतिः ॥१७३॥ गर्भशिखायाम्॥ वृत्तम् ॥ मृत्युं च कालिं ( लं ) च कलाकलापं विकारजातं प्रतिपत्तिजातम् ॥ एकात्मना नात्मवितर्कजातं तथा च सर्वं कवलीकरोति ॥१७४॥ वीरागमे ॥ भक्तो महेशः प्रसादी प्राणलिंगी शरण्यकः॥ ऐक्यो यश्चिदहंकारी षट्स्थलैः किं प्रयोजनम् ॥१७५॥ शरीरमिंद्रियं प्राणा मनोबुद्धिरहंकृतिः॥ सर्वमात्मतया भाति प्रसादात्परमेशितुः ॥१७६॥ शिवधर्मपुराणे ॥ एवमर्चनमीशस्य स्वेच्छाचारानिवंधनात् ॥ भवत्येव न संदेहः शिवोऽहमिति संस्मृतेः ॥१७७॥ पैंगलशाखायाम् ॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्तेषु परावस्थामुपेयुषः ॥ किं विज्ञानप्रमाणं वा किंवा ज्ञानस्य साधनम् ॥१७८॥ वीरागमे ॥ दृष्टिः स्थिरत्वमापन्ने जागृतां नाशयेत्सदा ॥ मनः स्थिरत्वमापन्ने स्वप्नं नाशयति ध्रुवम् ॥ पवने निश्चले यत्र सुषुप्तिः

---

पाणी पसरून जिकडे तिकडे समुद्रच समुद्र दिसावयास लागो, बारा सूर्य एकदम उगवून दोन प्रहरच्या वेळेसारखें कडक ऊन्ह पाडोत, जो उदासीन होऊन राहिलेला आहे त्याचे मनास त्याबद्दल मुळींच कांहीं वाटत नाहीं. तो स्वस्थ असतो. (१७४) गर्भशिखेंत ह्मटलें आहे कीं, मृत्यु, यम, कलांचे समुदाय, विकारांचें समुदाय, वादविवादांचे ( प्रतिपत्तींचे ) समुदाय, एकपणा किंवा अनेकपणा, ह्याबद्दलच्या अनेक तऱ्हेच्या कल्पना, आणि बाकीचें सर्व कांहीं तो गिळून टाकितो. (१७५) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जो प्राणी चित्स्वरूप बनलेला आहे त्याला भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण, व ऐक्य ह्या सहा स्थलांशीं काय करावयाचें आहे? त्याला षट्स्थलांचें मुळींच कारण नाहीं. (१७६) परमेश्वराच्या कृपेनें शरीर, अवयव, प्राण, मन, बुद्धि, आणि अहंकार हीं सर्व आत्मस्वरूपासारखीं वाटावयास लागतात. (१७७) शिवधर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनाची प्रवृत्ति सदोदित शिवपूजन करण्याकडेच असली, ह्मणजे मी स्वतःच शिव आहे असें वाटावयास लागतें; ह्यांत संसय नाहीं. (१७८) पैंगलशाखेंत ह्मटलें आहे कीं, जागेपणा, स्वप्न, आणि गाढझोंप, ह्या तिन्ही अवस्थांमध्यें परावस्था ह्मणून एक स्थिति आहे; ती येऊन पोंचली असतां विज्ञानाचें तरी प्रमाण काय? आणि ज्ञानाचें तरी साधन काय आहे? मग विज्ञानाचें व ज्ञानाचें मुळींच प्रयोजन नाहीं. (१७९) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, दृष्टि स्थिरपणा पावली असतां जागेपणाचा नेहमीं नाश होतो, तसेंच मन स्थिरपणा पावलें असतां स्वप्नाचा खरोखर नाश होतो, ज्यावेळीं वारा वाहत नाहीं श्वासोच्छ्वास स्तब्ध होतात अशा झोंपेलाच मरण असें ह्मणतात.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

क्षय मागता ॥१७९॥ स्वच्छंदललितभैरवीये ॥ शिरसा लिंगरूपं च पीठिकांगे प्रतिष्ठयेत् ॥ इंद्रियैरर्चयेत्तस्मात्पुण्यपापं विनाशयेत् ॥१८०॥ शैवरत्नाकरे ॥ चिदग्निप्लुष्टसंसारबीजांकुरकलेवरः ॥ चिल्लिंगालंबनो यश्च पराख्यांगी स चेरितः ॥१८१॥ स्वायंभुवसूत्रे ॥ शिवधामार्पितस्यास्य भोगभोक्तुर्न जातुचित् ॥ भोक्तृत्वमधिकारित्वं पतिकृत्यानुकारिता ॥१८२॥ अमृतबिंदूपनिषदि ॥ गवामनेकवर्णानां क्षीरस्याप्येकवर्णता ॥ क्षीरवत्पश्यते ज्ञानं लिंगिनस्तु गवां यथा ॥१८३॥ स्वावबोधे ॥ न किंचिच्चिन्तयेद्योगी उदासीनपरो भवेत् ॥ न किंचिच्चिन्तनादेव स्वयं तत्वं प्रकाशते ॥१८४॥ त्रिपुरद्वारमध्ये तु ये यान्ति परमात्मनि ॥ कर्मपाशविनिर्मुक्तास्ते यांति परमां गतिम् ॥१८५॥ वीरागमे ॥ न प्राणलिंगिनः कालो न लिंगप्राणिनः क्रिया ॥ कालकर्मद्वयं नास्ति शरणस्य महात्मनः

---

(१८०) स्वच्छंदललितभैरवीयांत ह्मटलें आहे कीं, लिंगस्वरूप हें मस्तकानें वंदन करावें आणि अंगांत पीठ ( लिंगाचें सिंहासन ) ठेवावें, आणि सर्व इंद्रियांनीं त्या पीठासहित लिंगाची पूजा करावी; त्यामुळें पुण्य पापाचा नाश होतो, (१८१) शैवरत्नाकरांत ह्मटलें आहे कीं, चैतन्यरूप अग्नीनें संसाररूप बीजांचा अंकुरच असें शरीर ज्याचें जळून गेलें आहे, व चिल्लिंगाचाच ज्यानें आश्रय केला आहे, त्याला परांगी असें म्हणतात. (१८२) स्वायंभुवसूत्रांत ह्मटलें आहे कीं, ज्यानें आपलें सर्व शरीर शिवास अर्पण केलें आहे, त्यानें विषयसुखाचा उपभोग घेतला तरी उपभोग घेणाराचा अधिकार त्याला पोंचत नाहीं, कांतर शरीराचा पति शिव असल्यानें शिवाकडेच सर्व अधिकार जातो. शिवाचे आज्ञेप्रमाणें वागण्याचेंच फक्त जीवाचें काम आहे, जीव हा स्वतंत्र नव्हे. (१८३) अमृतबिंदूपनिषदांत ह्मटलें आहे कीं, अनेक रंगांच्या गाई असल्या तरी सर्वांच्या दुधाचा रंग एकसारखाच असतो; तसेंच ज्ञान हें दुधासारखें एकाच स्वरूपाचें असून लिंगि अनेक रंगांच्या गाईंसारखे आहेत. प्रत्येकाचीं मतें भिन्न भिन्न असलीं तरीं तात्पर्यार्थे सर्वांचा एकच असतो. (१८४) स्वावबोधांत ह्मटलें आहे कीं, योगीश्वरानें आपले मनांत कांहीं एक चिंतन करूं नये, त्यानें नेहमीं उदासीनपणानें रहावें; मनांत कांहीं एक विचार न केल्यामुळेंच स्वयंतत्व आपोआप प्रकट होतें. (१८५) ह्या शरीररूप नगरास तीन दारें आहेत; त्यांपैकीं जे कोणी लोक परमात्मनांवाचे दारानें आंत जातात, त्यांच्या कर्मरूप पाशांचा नाश होऊन ते उत्तम गतीला जातात. (१८६) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, प्राणलिंगीला काळ नाहीं, लिंगप्राणीला क्रिया नाहीं, आणि त्या महात्म्या

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥१८६॥ विज्ञानभैरवीये ॥ सर्वज्ञस्सर्वकर्ता च व्यापकः परमेश्वरः ॥ स एवाहं शैवधर्मं इति दार्ढ्याच्छिवो भवेत् ॥१८७॥ वीरागमे ॥ अत्याश्रमस्थः कालज्ञः संज्ञ धीरमनाः स्वकम् ॥ देहं विच्छेदरोगाद्यैः स्वयमन्ते परित्यजेत् ॥१८८॥ वातुले ॥ तनुं त्यजत्यालये वा श्वपचस्य गृहेऽपि वा ॥ ज्ञानसंप्राप्तिसमये मुक्तोऽसौ विगताशयः ॥१८९॥ उत्कृष्टसौख्यसंपन्नः शरणाख्यः शिवेन सः ॥ ऐक्यमेत्य शिवो भूत्वा ऐक्य इत्यभिधीयते ॥१९०॥

इतिश्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यवीरशैवमार्गस्थापनाग्रगण्यश्रीसंपादनसिद्धवीराख्यशिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसारसंग्रहे शरणस्थलं नाम षड्विंशतितमं प्रकरणं समाप्तम्

---

शरणाला काल नाहीं व कर्मही नाहीं. (१८७) विज्ञानभैरवीयांत झटलें आहे कीं, जो परमेश्वर सर्व कांहीं जाणतो व सर्व कांहीं करितो, जो परमेश्वर सर्व ठिकाणीं सारखा व्यापलेला आहे, तो परमेश्वरच मी आहें; अशा तऱ्हेचा एकनिष्ठपणानें शिवधर्म पाळला तर तो पाळणारा शिव होतो. (१८८) वीरागमांत झटलें आहे कीं, अत्याश्रमांत ( सन्यासधर्मांत ) राहणारा मनुष्य आपली मरण वेळ जाणतो, तो मोठा धैर्यवान् असतो, तो आपल्या शरीरास मरणकाळीं तोडणें, रोग होणें वगैरे अनेक करणांनीं सोडून देतो. (१८९) वातुलांत झटलें आहे कीं, शिवज्ञानी मनुष्य आपले स्वताचे घरीं मरण पावो, किंवा एखाद्या चांडाळाच्या घरीं मरण पावो; त्याबद्दल त्यास मुळीं पुण्य किंवा पाप नाहीं, त्यास शिवज्ञान झाल्यावेळींच तो मुक्त झालेला असतो. त्याची कोणतीही आशा उरलेली नसते. (१९०) जो शरण शिवाशीं ऐक्य पावून, शिवाबरोबर उत्तम प्रकारचें सुख भोगतो त्या शरणास ऐक्य असें म्हणतात.

ह्याप्रमाणें वीरमाहेश्वराचार्यांत मुख्य आचार्य झणविणाऱ्या वीरशैवधर्माची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या व ऐश्वर्य प्राप्त करून देणाऱ्या सिद्धवीरनांवाच्या शिवयोगिश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील शरणस्थल नांवाचें सव्विसावें प्रकरण संपलें.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

# ॥ अथ ऐक्यस्थलं प्रारभ्यते ॥

## ॥सप्तविंशतिप्रकरणम्॥

एवं शरणस्थले महाज्ञानेन सकलसंशयं निवर्त्य निजस्वरूपं साक्षात्कृत्य परमानन्दस्वरूपः शरणः स्वस्य ज्ञानं विस्मृत्य तद्विस्मरणमपि विनाश्य महालिंगैक्यगतभेदः कथमित्याकांक्षायामनन्तरमैक्यस्थलमित्युच्यते ॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ नाहं त्वमप्रथितशब्दविभेदवृत्तिर्न प्राणदेहमनइंद्रियभौतिकानि ॥ सर्वं भ्रमात्मकमिदं मयि नेतिभावादैक्यस्थलं समरसं सुखरूपमाहुः ॥१॥ उत्तरतापनीयोपनिषदि ॥ अथ लिंगान् संहृत्य तेजसो शरीरत्रयं संव्याप्य तदधिष्ठानमात्मानं संज्वालय तत्तेज आत्मा चैतन्यरूपं बलमवष्टभ्य गुणैरैक्यं संपाद्य महास्थूलं महासूक्ष्मं महाकारणं संहृत्य मात्राभि ओतानुज्ञात्रनुज्ञाविकल्परूपं चिंतयन् ग्रसेत् ॥२॥ कैवल्योपनिषदि ॥ वृत्तम् ॥ न भूमिरापो मम नास्ति वन्हिर्न

---

श्रीगुरूस नमस्कार असो. ह्याप्रमाणें शरणस्थलांत महाज्ञान झाल्यामुळें सर्व प्रकारचे संशय दूर करून ( होऊन ) स्वस्वरूप ( आत्मरूप ) प्रत्यक्ष झाल्यामुळें परमानंदस्वरूप झालेला शरण आपलें ज्ञानविसरून व त्याच्या विस्मरणाचा नाश करून महालिंगस्वरूपांत समरस पावलेला पुरुष कसा असतो अशी शंका आली असतां ह्यापुढें ऐक्यस्थल म्हणून आहे त्याची स्थिति कशी आहे तें सांगतों. (१) वातुलांत म्हटलें आहे कीं, ऐक्यस्थलांत मीपणा आणि तूंपणा असा निराळेपणा दाखविणारे शब्द नाहींतच सर्व एकच आहे. प्राण, देह, मन, इंद्रियें आणि पंचमहाभूतें नाहींत भ्रमात्मक दिसणारें हें सर्व संसारचक्र ऐक्यस्थलांत नाहीं, ऐक्यस्थल हें समरस आणि सुखस्वरूप आहे. (२) उत्तरतापनीयोपनिषदांत म्हटलें आहे कीं, मग तेजोलिंगास आकर्षण करून स्थूल, सूक्ष्म आणि कारण ह्या तीन शरीरास व्यापून त्यांमध्यें स्थान करून राहिलेल्या आत्म्यास पेटवून त्याचें तेजच आत्मा चैतन्यरूप बलाला वेढून गुणांनीं ऐक्य संपादन करून महास्थूल, महासूक्ष्म आणि महाकारण अशा शरीरांस आकर्षण करून मात्रामुळें ओत, अनुज्ञात्र, अनुज्ञा आणि विकल्पस्वरूप ह्यांचा विचार करीत ग्रास करितो. (३) कैवल्योपनिषदांत म्हटलें आहे कीं, मला भूमि नाहीं, पाणी नाहीं. विस्तव नाहीं, वायु नाहीं, व आकाशही नाहीं,

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

चानिलो मेऽस्ति न चांबरं च ॥ एवं विदित्वा परमात्मरूपं गुहाशयं निष्कलमद्वितीयम् ॥ समस्तसाक्षी सदसद्विहीनं प्रयाति शुद्धः परमात्मरूपम् ॥३॥ देविकालोत्तरे ॥ अहमेको न मे कश्चिन्नाहमन्यस्य कस्य चित् ॥ न तं पश्यामि यस्याहं तं न पश्यामि यो मम ॥४॥ वासिष्ठे ॥ विलीनाशेषबाह्यार्थबुद्धेरभ्यासयोगतः ॥ जीवस्य ब्रह्मताप्राप्तिर्मुक्तिरित्यभिधीयते ॥५॥ शिवाद्वैते ॥ अखण्डपरिपूर्णेशस्वात्मसंभावनोर्जितः ॥ स्वप्नेऽप्यभेदसंभ्रान्तो यस्य ऐक्य इहोदितः ॥६॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ परिपूर्णनिजानंदसमं तत्वमहासुखी ॥ भेदशून्ये महाबोधे ज्ञात्रादित्रयहीनतः ॥७॥ योगसारे ॥ षडूर्मयश्च षड्वर्गा नास्ति चाष्टविधार्चनम् ॥ निर्भावं निजलिंगैक्यं शिखिकर्पूरयोगवत् ॥८॥ योगजागमे ॥ फलप्रकाशकं पुष्पं फलं पुष्पविनाशकम् ॥ ज्ञानप्रकाशकं कर्म ज्ञानं कर्मविनाशकम् ॥९॥

---

असें जाणून परमेश्वराचें स्वरूप गुहेंत राहणारें, निष्प्रपंच आणि अद्वितीय आहे असें जाणावें. तें परमेश्वराचें स्वरूप सर्व कांहीं पहातें (सर्वांस साक्षी आहे) तें सत्‌ही नाहीं व असत्‌ही नाहीं, तें स्थूल, सूक्ष्म आणि कारण ह्यांपेक्षां फार शुद्ध आहे. (४) देविकालोत्तरांत ह्मटलें आहे कीं, मी एक आहें, मला कोणी नाहीं व मी कोणाचा नाहीं, मी ज्याचा आहें त्याला मी पहात नाहीं, व जो माझा आहे त्याला मी पहात नाहीं. (५) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, सर्वप्रकारचे बाह्य विषय जीमध्यें लय पावले आहेत अशा बुद्धीचा अभ्यास केल्यामुळें जीवाला जी ब्रह्मता प्राप्ति होते त्या ब्रह्मत्वप्राप्तीलाच मुक्ति असें ह्मणतात. (६) शिवाद्वैतांत ह्मटलें आहे कीं, अखंड आणि परिपूर्ण अशा ईश्वरस्वरूपाचा स्वतः संपूर्ण अनुभव आल्यामुळें ऊर्जित दशेस पोहोंचलेला जो कोणी मनुष्य स्वप्नामध्यें देखील मी निराळा आणि परमेश्वर निराळा असें मानीत नाहीं, त्यास ऐक्य असें ह्मणावें. (७) सिद्धान्तशिखामणींत ह्मटलें आहे कीं, ऐक्यस्थितीस पोहोंचलेला मनुष्य नेहमीं अत्यानंदांत असतो, त्याला दुःखाचा लवलेशही नसतो, मी वेगळा आणि परमेश्वर वेगळा अशी समजूत नसलेलें अभेद नांवाचें श्रेष्ठ ज्ञान प्राप्त झाल्यामुळें त्याला तीन प्रकारच्या ज्ञानाचें कारण लागत नाहीं. (८) ऐक्यस्थितींत षडूर्मि नाहींत, सहा वर्ग नाहींत किंवा आठ प्रकारचें पूजनही नाहीं, ऐक्यस्थितींत भाव (कल्पना) नाहीं. कापुराला दिव्याची ज्योति लागली ह्मणजे जी काय स्थिति असते, तीच स्थिति आत्मलिंगाशीं ऐक्य पावलेल्या मनुष्याची असते. (९) योगजागमांत ह्मटलें आहे कीं, फूल हें फळ नजरेस पाडतें व तेंच फळ फुलाचा नाश करितें. (फळ आल्यावर त्याचे अगोदर येणारें फूल जळून जातें), तसें कर्म हें ज्ञानाला प्रकाश करितें (प्राप्त करून देतें) आणि तेंच

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वासिष्ठपुराणे ॥ स्वच्छंदचारी सर्वत्र सुखी भवति संयमी ॥ न जराकर्म नैवास्ति न च पाशो न च क्षुधा ॥१०॥ तावत्तत्वं कुतस्तस्य भेदः स्वपरयोर्भवेत् ॥ नगरारण्ययोर्भेदः कथमेकत्वमाप्नुयात् ॥११॥ वीरागमे ॥ दग्धांबरं हि कर्माणि चेंद्रियाणि मनो वचः ॥ भावसद्भावनिर्वाणः परेयस्य विलीयते ॥१२॥ रूपं कर्पूरमंगं च तद्गन्धः प्राण ईरितः ॥ यथा लिंगांगसंयोगः शिखिकर्पूरयोगवत् ॥१३॥ कर्पूरस्यानलाक्रान्तौ काठिन्यं नास्य विद्यते ॥ अहंकारक्षयात्तस्य ( तत्वं ) देहे काठिनता कथम् ॥१४॥ शिवगीतायाम् ॥ शिवोऽहमिति यो बुध्द्या तस्य किं देहकर्मणा ॥ शिवज्ञानैकनिष्ठस्य अहंकारभवो भ्रमः ॥१५॥ वातुले ॥ कर्मज्ञानभक्तिकाण्डानांलक्षणमाह ॥ अहं कर्ता समस्तस्य धर्माधर्मस्य कर्मणः ॥ इत्यनेनाभि-

---

ज्ञान कर्मांचा नाश करितें ( ज्ञान झाल्यावर कर्म करण्याचें कारण राहत नाहीं ). (१०) वासिष्ठ पुराणांत म्हटलें आहे कीं, इंद्रियनिग्रहवान् मनुष्य स्वच्छंदपणानें पृथ्वीवर फिरत असतो, त्याला सर्व ठिकाणीं सुखच लागतें. त्याला ज्ञातारपण नाहीं, त्याला कर्म नाहीं, त्याला पाश नाहीं किंवा त्याला भूक नाहीं. (११) जोंपर्यन्त मनुष्याला आपलेपणा आणि परकेपणा आहे, तोंपर्यंत त्याला तत्वज्ञान कसें होईल ? शहरांत आणि भयंकर अरण्यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे; असें असतां नगर आणि अरण्य सारखेंच असें कसें होईल ? (१२) ज्या मनुष्याचीं कर्में, इंद्रियें मन, वाचा, भाव आणि सद्भाव परब्रह्मस्वरूपांत लय पावलीं आहेत; त्याची स्थिति जळालेल्या वस्त्रासारखी आहे. (१३) रूप आणि अंग हीं दोन कापुरासारखीं आहेत आणि प्राण हा त्या कापुराच्या वासासारखा आहे; असें म्हटलें आहे. कापूर विस्तवास ( दिव्याचे ज्योतीस ) लागला असतां त्याची जशी स्थिति होते तशीच स्थिति लिंगाशीं अंगाचें ऐक्य पावलेल्याची होते. (१४) कापूर एकवेळ विस्तवानें पेटला म्हणजे त्याचा कठिणपणा जसा नाहींसा होतो; तसा त्या मनुष्याच्या अभिमानाचा नाश झाल्यावर अंगांत ताठा कसा राहील ? मुळींच राहणार नाहीं. (१५) शिवगीतेंत म्हटलें आहे कीं, जो मनुष्य मी स्वतःच शिव आहें, असें मानीत असेल त्याला देहाच्या कर्माशीं काय करावयाचें आहे ? जो मनुष्य शिवज्ञानांत पूर्णपणानें गढून गेला आहे त्याला अहंकारा ( गर्वा ) पासून होणारा भ्रम मुळींच नसतो. (१६) वातुलागमांत म्हटलें आहे कीं, कर्मकांड ज्ञानकांड आणि भक्तिकांड ह्यांचीं लक्षणें सांगितलेलीं आहेत, तीं अशीं:—धर्म आणि अधर्म वृद्धिंगत करणारें जें कांहीं कर्म आहे त्या सर्व कर्मांचा मी कर्ता आहें, अशा अभिमानामुळें त्याला कर्मकांड असें म्हटलें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

मानेन कर्मकाण्डोऽयमुच्यते ॥१६॥ नाहंकर्तास्य कर्तृत्वं शिवस्साक्षी स्वभावतः ॥ इत्यनेनाभिमानेन ज्ञानकाण्डोऽयमुच्यते ॥१७॥ न कर्ताहं न साक्षी च शिव एवेति कर्मणः ॥ द्वयाभिमानराहित्यं भक्तिकाण्डोऽयमुच्यते ॥१८॥ नैव लुप्येच्छिलालेखा स्थललेखा हि लुप्यते ॥ नादौ लेखायते चान्ते जललेखा न लुप्यते ॥१९॥ अद्वैतभक्तियुक्तस्य योगिनः सकला क्रिया ॥ आस्ते दग्धपटन्यायात्क्रियामात्रा हि नः क्रिया ॥२०॥ यथा चित्रपटे स्त्रीणां विलासो नैव बाधते ॥ तथाद्वैतविलासश्च क्रियाणां नैव बाधते ॥२१॥ न प्ररोहन्ति बीजानि यथा भ्रष्टानि भूतले ॥ अद्वैतभक्तियुक्तानि कर्माणि च तथैव हि ॥२२॥ यथा वन्ध्यास्त्रियो लोके फलाय न कदाचन ॥ तथाद्वैतक्रिया लोके फलाय न कदाचन ॥२३॥ षट्सहस्रिकायाम् ॥परामृतरसास्वादनिर्भरानंदसुंदरः॥ निराका-

---

आहे. (१७) मी ह्याचा कर्ता नाहीं, व करविता नाहीं; वास्तविक पाहतां सर्व कर्ता करविणारा शिव आहे अशा प्रकारची समजूत असल्यामुळें, त्याला ज्ञानकांड असें ह्मणतात. (१८) मी कर्ता नाहीं व मी साक्षीही नाहीं, शिव ह्राच सर्व कर्में करितो व सर्व कर्मांचा साक्षी आहे; मी कर्ता नव्हें व साक्षीही नव्हें असे दोन्ही प्रकारचे अभिमान (समजूत) नसल्यामुळें त्यास भक्तिकांड असें ह्मणतात. (१९) एखाद्या दगडावर जर लेख कोरला (लिहिला) तर तो पुसत नाहीं, जमिनीवर लेख लिहिला तर मात्र तो पुसतो. पाण्यावर लिहिलेलें तर तेव्हांच पुसून जातें, ह्यासाठीं पाण्यावर अगोदर लिहीत नाहींत, आणि मागाहूनही लिहीत नाहींत. (२०) अद्वैतभक्ति करणाऱ्या शिवयोग्याची सर्व क्रिया जळून गेलेल्या वस्त्रासारखी आहे, ती नांवाची मात्र क्रिया आहे, वास्तविक ती क्रिया नव्हे. (२१) प्रत्यक्ष एखाद्या स्त्रीचें विलासाचे हावभाव पाहिले ह्मणजे पुरुष मोहित होऊन त्या स्त्रीवर आसक्त होतो, तसें एखाद्या स्त्रीचें सुंदर चित्र काढून त्या चित्रांत पुष्कळ मोहकपणा दाखविला तरी त्या चित्रावर कोणी विषयी पुरुष खऱ्या स्त्रीप्रमाणें मोहित होत नाहीं; त्याप्रमाणें अद्वैतशास्त्राचा विलास ह्या क्रियांस बाधक होत नाहीं, (२२) जसें भाजलेलें बीं पुनः जमिनींत पेरलें तर त्यास अंकुर फुटत नाहीं, त्याप्रमाणें अद्वैतभक्तियुक्त असणारीं कर्में पुनः संसारवृद्धीला कारण होत नाहींत. (२३) जसें वांझ बायकोला जगांत कधींही मूलबाळ ह्मणून कांहीं होत नाहीं; त्याप्रमाणें अद्वैतक्रिया जगांत पुनः कधींही संसारवृद्धि करूं शकत नाहीं. (२४) षट्साहस्रिकेंत ह्मटलें आहे कीं, ऐक्य पावलेला शिवयोगी उत्तम प्रकारच्या ब्रह्मरसाचा अनुभव आल्यामुळें नेहमीं आनंदांत मग्न असतो. निराकार परमेश्वर आहे असें समजून त्यासंबंधाचे सर्व आचार

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

राखिलाचारचरणैकान्ततत्परः ॥२४॥ वासिष्ठे ॥ गच्छतस्तिष्ठतश्चैव जाग्रतः स्वप्नतोऽपि वा ॥ सर्वाचारगता पूजा नित्यमाध्यात्मिका त्वियम् ॥२५॥ वातुले ॥ क्षेत्रमाचारलिंगं स्याद्भक्तांगं क्षितिलक्षणम् ॥ तीर्थं हि गुरुलिंगं स्यान्महेशांगाम्बुलक्षणम् ॥२६॥ होमस्तु शिवलिंगं स्यात्प्रसादांगाग्निलक्षणम् ॥ जपश्चराख्यलिंगं स्यात्प्राणलिंगांगमारुतः ॥२७॥ ध्यानं प्रसादलिंगं स्याच्छरणांगं खलक्षणम् ॥ समाधिः स्यान्महालिंगमैक्यांगं जीवलक्षणम् ॥२८॥ वीरागमे ॥ भक्तो माहेश्वरश्चैव प्रसादी स्थावरं भवेत् ॥ प्राणलिंगी शरण्यं च लिंगैक्यं जंगमस्तथा ॥२९॥ शिवधर्मोत्तरे ॥ भक्तादिशरणान्तं च पंचस्थलमुदाहृतम् ॥ कर्पूरमनलग्राह्यमिवैक्यस्थलमुच्यते ॥३०॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ मृत्पिण्डमेघोपलविस्फुलिंगावर्तेन्द्रचापास्तनवः क्रमेण ॥ स्युः पार्थिवापोमलतैजसाख्या वायव्यव्योमं च

---

पाळण्यांत तो मनापासून तयार असतो. (२५) वासिष्ठ पुराणांत ह्मटलें आहे कीं, शिवयोगी रस्त्यानें जात असो, एके जागीं बसलेला असो, जागा असो, किंवा झोंपीं गेलेला असो, तो नेहमीं ईश्वर हा सर्व ठिकाणीं परिपूर्णपणानें भरलेला आहे असें समजून त्याची नित्यपूजा करितो. ती आध्यात्मिकपूजा होय. (२६) वातुलांत ह्मटलें आहे कीं, क्षेत्र हें आचारलिंग आहे, त्याला भक्तांग असें ह्मणतात, पृथ्वी हें त्याचें लक्षण आहे. तीर्थ हें गुरुलिंग आहे, त्याला माहेश्वरांग असें ह्मणतात, पाणी हें त्याचें लक्षण आहे. (२७) होम हें शिवलिंग आहे, त्याला प्रसादांग असें ह्मणतात अग्नि हें त्याचें लक्षण आहे. जप हें जंगमनांवाचें लिंग आहे, त्याला प्राणलिंगांग असें ह्मणतात, वायु हें त्याचें लक्षण आहे. (२८) ध्यान हें प्रसादलिंग आहे, त्याला शरणांग असें ह्मणतात, आकाश हें त्याचें लक्षण आहे, समाधि हें महालिंग आहे, त्याला ऐक्यांग असें ह्मणतात, जीव हें त्याचें लक्षण आहे. (२९) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, भक्त, माहेश्वर आणि प्रसादी हीं तीन स्थलें स्थावरलिंग होय. आणि प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य हीं तीन स्थलें जंगमलिंग होय. (३०) शिवधर्मोत्तरांत ह्मटलें आहे कीं, भक्त, माहेश्वर प्रसादि, प्राणलिंगी, आणि शरण ह्या पांचांस पंचस्थल असें ह्मटलें आहे आणि कापूर दिव्याची ज्योति लागून पेटला ह्मणजे त्या कापुराची जी स्थिति असते तशा स्थितीला ऐक्यस्थल असें ह्मणतात. (३१) वातुलांत ह्मटलें आहे कीं, मातीचें ढेंकूळ, पावसाच्या गारा, विस्तवाच्या ठिणग्या, पाण्यांतील भोंवरे, आणि इंद्रधनुष्यें, हीं अनुक्रमानें पांच शरीरें आहेत. हे पांच भेद पृथ्वी, पाणी, तेज, वायु, आणि आकाश या पंचमहातत्वांचा

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

विभेदभिन्नाः ॥३१॥ मण्डूकोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्व एकीभवन्ति ॥३२॥ शिवरहस्ये ॥ यस्त्वेकान्तेन मनसा शिवलिंगैक्यतत्परः ॥ लिंगे विलीनस्सर्वत्र शिव एव न संशयः ॥३३॥ सूत्रार्णवे ॥ प्रभुणा भवता यस्य जातं हृदयमेलनम् ॥ प्राभवीनां विभूतीनां परमेकस्स भाजनम् ॥३४॥ वासिष्ठे ॥ अखंडपरिपूर्णं यत्सच्चिदानन्दलक्षणम् ॥ तद्येन ज्ञाप्यते तादृक् ज्ञानं स्वाभिन्नभाजनम् ॥३५॥ शिवसूत्रे ॥ विज्ञाजनं भाजनेभ्यो बाह्येभ्यो हि विशिष्यते ॥ वस्तु यद्गतमेतत्स्यादितरे नैवमित्यतः ॥३६॥ तैत्तिरीयोपनिषदि ॥ यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन्सोऽश्नुते सर्वान् कामान् सहब्रह्मणा विपश्चितेति ॥३७॥ शिवधर्मपुराणे ॥ भक्तदेहो महादेवो भक्तात्मा च सदाशिवः ॥ सर्वभोगोपभोगांश्च भुंक्ते परमया मुदा ॥३८॥ शिवरहस्ये ॥ हृदयं हृदयं चैव श्रोत्रं श्रोत्रं तथैव च ॥ स्पर्शनं स्पर्शनं चैव दृष्टिर्दृष्टि

---

होय. ह्या पंचमहातत्वांचें पांच वर सांगितलेले निरनिराळे भेद होत. (३२) " मण्डूकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं " सर्व प्रकारचीं कर्मे; आणि ज्ञानसंपन्न आत्मा, हीं सर्व श्रेष्ठ आणि अविनाशी अशा परब्रह्म स्वरूपांत मिसळून जातात. (३३) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य एकनिष्ठपणानें शिवलिंगपूजन करण्यांत नेहमीं तत्पर असतो, व जो सर्व प्रकारांनीं लिंगस्वरूपांतच तल्लीन होतो, तो प्रत्यक्ष शंकर होय; ह्यांत शंका नाहीं. (३४) सूत्रार्णवांत ह्मटलें आहे कीं, हे ईश्वरा, तूं प्रभु आहेस, तुझ्या स्वरूपांत ज्याचें मन गढून गेलें त्याला परमेश्वराची अलौकिक शक्ति प्राप्त होते. तो मनुष्य परमेश्वरीशक्तीचें स्थान बनतो. (३५) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, परमेश्वराचें स्वरूप अखण्ड आहे, परिपूर्ण आहे तें सत् चित् आणि आनंद लक्षण आहे. तें तशा प्रकारचें ज्ञान शिकविलें तो गुरु धन्य आहे आणि तें ज्ञान शिवाद्वैताचें मुख्य पात्र आहे. (३६) शिवसूत्रांत ह्मटलें आहे कीं, ज्ञानरूपी पात्र इतर सर्व बाह्य पात्रांपेक्षां श्रेष्ठ आहे हें दिसणारें जग ज्ञानभाजन झालेलें आहे यामुळें ज्ञान हें सर्वांत श्रेष्ठ आहे असें समजावें. (३७) तैत्तिरीयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, जो मनुष्य अतिशय विस्तृत अशा चिदाकाशांत व गुहेंत असलेलें परब्रह्मस्वरूप जाणतो, तो ब्रम्हस्वरूप जाणतो; आणि त्याप्रमाणें त्याचे सर्व मनोरथही पूर्ण होतात. त्याला विद्वान ह्मणतात. (३८) शिवधर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, भक्ताचें शरीर हा महादेव होय. भक्ताचा आत्मा सदाशिव होय. तो महादेव भक्ताचे रूपानें मोठ्या आनंदानें सर्व भोग आणि उपभोग ह्यांचा अनुभव घेतो. (३९) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, भक्ताचें हृदय हें शिवाचें हृदय आहे, तसेच भक्ताचे कान हे

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

स्तथैव च ॥३९॥ जिव्हापि जिव्हा तस्येयं घ्राणं घ्राणं तथैव च ॥ एकैकः प्राण आख्यात इत्येतः सहवर्तिनः ॥४०॥ बृहदारण्यकोपनिषदि ॥ यत्र वा अस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं जिघ्रेत्तत्केन कं स्पृशेत्तत्केन कमास्वादयेत् ॥४१॥ वृद्धजाबालोपनिषदि ॥ भुक्तशेषं भगवतस्त्रैलोक्यं सचराचरम् ॥४२॥ लिंगसारे ॥ आधिव्याधिमहाशाखं तथा लिंगार्पितं सदा ॥ बाल्ययौवनवृद्धत्वं त्रिधा लिंगार्पितं सदा ॥४३॥ विस्मयं जननं निद्रा सर्वं लिंगे समर्पितम् ॥ कृष्णः श्वेतश्च पीतश्च स्वयं लिंगे समर्पितम् ॥४४॥ उत्पत्तिस्थितिपर्यंतं सुखदुःखानि सर्वदा ॥ सम्पदश्च व्युदासोऽहं सर्वं द्रव्ये समर्पितम् ॥४५॥ रुद्रयामले ॥ चरणाचरणं चैव लिंगैक्यं नियतो भवेत् ॥ द्वन्द्वभावादतो नास्ति चराचरमिति स्मृतम् ॥४६॥ वासिष्ठे ॥ नान्यत्पश्यति योगीन्द्रो नान्य-

---

शिवाचे कान होत, भक्ताचे शरीरास स्पर्श करणें म्हणजे शिवलिंगास स्पर्श करण्यासारखें आहे, आणि तसेंच भक्ताचें दर्शन घेणें म्हणजे शिवलिंगाचें दर्शन घेण्यासारखें आहे. (४०) भक्ताची जीभ ती शिवाची जीभ होय, तसेंच भक्ताचें नाक तें शिवाचें नाक असल्यासारखें आहे, भक्ताचें प्रत्येक इंद्रिय तेंच शिवाचें इंद्रिय असल्यासारखें आहे. म्हणून भक्त आणि शिव हे दोन्ही एकच आहेत असें म्हटलें आहे. (४१) वास्तविक रीतीनें पाहिलें तर सर्व ठिकाणीं ज्या परमेश्वराचाच आत्मा व्यापलेला आहे तेथें कोणास कोणी पहावें? कोणास कोणी हुंगावें? कोणास कोणी स्पर्श करावा? आणि कोणाच्या मस्तकाचें कोणी आवघ्राण करावें? (४२) वृद्धजाबालोपनिषदांत म्हटलें आहे कीं, हें सर्व स्थावरजंगम त्रैलोक्य परमेश्वरानें उपभोग घेतलेल्या वस्तूंपैकीं बाकी उरलेलें आहे. (४३) लिंगसारांत म्हटलें आहे कीं, आधि ( मनोदुःख ), व्याधि ( शारीरिक दुःख ) ह्या नेहमीं लिंगास अर्पण केल्या आहेत. लहानपण, तरुणपण आणि म्हातारपण ह्या तिन्ही अवस्था नेहमीं लिंगास अर्पण केल्या आहेत. (४४) आश्चर्य, जन्म, झोंप हीं सर्व लिंगास अर्पण केलीं. काळा, पांढरा, पिंवळा हे सर्व रंग लिंगास अर्पण केलें. (४५) जन्मापासून तारुण्यापर्यंत जीं कांहीं सुखदुःखें आहेत तीं, व संपत्ति आणि विपत्ति ( दुःखें ) हीं सर्व मी द्रव्याचे ठिकाणीं अर्पण केलीं. (४६) रुद्रयामलांत लिहिलें आहे कीं, लिंगाशीं ऐक्य पावल्यानें चरण आणि अचरण हें सर्व कांहीं केल्यासारखें आहे. ह्यासाठीं म्हटलें आहे कीं, मी तूंपणाखेरीज हें स्थावरजंगम विश्व नाहींच ( विश्वांत सर्वत्र मी तूंपणा भरलेला आहे. ) (४७) वासिष्ठांत म्हटलें आहे कीं, योगीश्वर चिदानंदस्वरूप

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

ज्ञानाति किंचन ॥ नान्यच्छ्रुणोति सन्दृष्टे चिदानन्दमये शिवे ॥४७॥ वृहदारण्यकोपनिषदि ॥ श्रुतिः ॥ यथा प्रियया स्त्रिया संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरमेवमेवायं पुरुषः प्राज्ञेनात्मना संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरं तद्वदसौ तथा काममात्मकाममकामं रूपं शोकान्तरम् ॥४८॥ वासिष्ठे ॥ सर्वज्ञता स शिवता सावस्था परमात्मिका ॥ स सत्यता सा च तृप्तिर्न यत्र स्वपरे क्षणम् ॥४९॥ अमृतबिन्दूपनिषदि ॥ न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः ॥ न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥५०॥ योगजागमे ॥ भावाभावद्वयातीतं स्वप्नजागरणातिगम् ॥ मृत्युजीवननिर्मुक्तं तत्वं तत्वविदो विदुः ॥५१॥ वासिष्ठे ॥अहंभावो यदा नास्ति निरहन्ता तदा न हि॥ न यत्राहं न निरहं तद्भावाभावनाशनम् ॥५२॥ त्वन्ताऽहन्तात्मता यत्र परता नास्ति

---

शिवास पाहिल्यावर दुसरें कांहीं पहात नाहीं: त्याखेरीज दुसरें कांहीं जाणत नाहीं, आणि त्याखेरीज दुसरे कांहींही ऐकत नाहीं. (४८) वृहदारण्यकोपनिषदांत झटलें आहे कीं, ज्याप्रमाणें एखाद्या तरुण विषयी पुरुषास त्याच्या अतिशय प्रीतींतील तरुण वायकोनें प्रेमानें कडकडून मिठी मारली झणजे त्यावेळीं त्याला त्या वायकोखेरीज आंत बाहेर दुसरें कांहीं दिसत नाहीं, त्याप्रमाणें त्या जीवास (आत्म्यास) अतिशय ज्ञानवान् अशा परमात्म्यानें आलिंगन दिलें झणजे त्याला आंत बाहेर कांहीं दिसत नाहीं. त्यावेळीं त्याला इच्छा नाहीं, आत्म्याची इच्छा नाहीं, माझी स्वतःची इच्छा नाहीं, रूप नाहीं व शोक नाहीं काहींएक नाहीं. (४९) वासिष्ठांत झटलें आहे कीं, ज्या स्थितीमध्यें आपलेपणा आणि परकेपणा नाहीं, ती मुक्तपणाची स्थितिच सर्वज्ञता होय, तीच शिवता होय, तीच परब्रह्मस्वरूपावस्था होय. तीच सत्यता होय आणि तीच तृप्ति होय. (५०) अमृतबिंदूपनिषदांत झटलें आहे कीं, ज्या मुक्तिस्थितींत निरोध (प्रतिबंध) नाहीं, उत्पत्ति नाहीं, बद्ध नाहीं, मुमुक्षु नाहीं आणि मुक्तही नाहीं, अशी ही वास्तविक परब्रह्माची स्थिति आहे. (५१) योगजागमांत झटलें आहे कीं, ज्या परब्रह्मतत्वाला भाव (असणें) अभाव (मुळींच नसणें) ह्या दोन्ही अवस्था मुळींच नाहींत, ज्याला स्वप्न आणि जागृदवस्था नाहींत, ज्याला मृत्यु आणि सजीवपणा हे दोन्ही नाहींत तें तत्व, तत्ववेत्ते-लोक मात्र जाणतात. (५२) वासिष्ठांत झटलें आहे कीं, ज्यावेळीं मीपणा नाहीं, त्यावेळीं निराभिमानही नाहीं, जेथें मी नाहीं व मी नाहीं असेंही नाहीं तें भावाभावांचा नाश करणारें आहे. (५३) जेथें तूंपणा नाहीं, मीपणा नाहीं, आपलेपणा नाहीं व

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

काचन ॥ न किंचिद्भेदकलना न भावाभावरंजना ॥५३॥ वासिष्ठे ॥ प्रतीयमानौ नैवस्थो भावाभावौ स्वमन्यथा ॥ लिंगैकस्य च यत्तस्मात्स-भावाभावनाशकः ॥५४॥ नेत्रोद्योते ॥ केवलं केवलं भावः स्वस्वतैवावशिष्यते ॥ भावनातिगतो भावो वस्तु निर्भावनं पदम् ॥५५॥ वासिष्ठपुराणे ॥ न संयोगो वियोगश्च न ज्ञेयं ज्ञातृकल्पना ॥ न बन्धो न च मुक्तिश्च न देवो न च राक्षसः ॥५६॥ वीरागमे ॥ ज्ञानादिव्यवहारार्थं कुतो ज्ञानं विभाव्यते ॥ निर्विकारो निराकारो नित्यः सीमाविवर्जितः ॥५७॥ योगजागमे ॥ ज्ञानाचारसमायुक्ता ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ ज्ञानिनः शिवभावेन ज्ञानशून्यैकभागिनः ॥५८॥ निश्वासकारिकायाम् ॥ उल्काहस्तो यथा कश्चित् द्रव्यमालोक्य तां त्यजेत् ॥ ज्ञानेन ज्ञेयमालोक्य पश्चाज्ज्ञानं परित्यजेत् ॥५९॥ नेत्रोद्योते ॥ स्फटिकस्वच्छयोर्दीप-

---

परकेपणा नाहीं, तेथें कांहीं नाहीं भेदाची कल्पनाही नाहीं, व भाव आणि अभावही तेथें नाहींत. (५४) वासिष्ठांत ह्मटलें आहे कीं, आपल्या स्वतः खेरीज जेथें असणें नसणें ह्या दोन्ही स्थिति मुळींच भासत नाहींत, अशी अवस्था होणें यालाच लिंगैक्य असें ह्मणतात, आणि त्याच स्थितीला भावाभावनाशक असें ह्मणतात. (५५) नेत्रोद्योतांत ह्मटलें आहे कीं, फक्त आपला आपलाच भाव बाकी राहतो त्यास केवलभाव असें ह्मणावें. तो भाव कल्पनाशक्तीच्या वाहेर आहे. ती वस्तुभावना ( कल्पना ) नाहीं, अशा स्थितीचें स्थान आहे. (५६) वासिष्ठ पुराणांत ह्मटलें आहे कीं, त्या केवलभावांत संयोग ( एकमेकाची भेट ) नाहीं, वियोग ( एकमेकाची तुटातूट ) नाहीं, जाणावयाचें असें कांहीं नाहीं, जाणणारा कोण? ह्याचीही कल्पना नाहीं, बंध नाहीं, मुक्ति नाहीं, देव नाहीं किंवा राक्षस नाहीं. (५७) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, ज्ञानादिक व्यवहारासाठीं ज्ञान कोठून मिळवावें? केवलभाव हा निर्विकार ( विकार रहित ) आहे. त्यास आकार नाहीं, तो नित्य असून त्यास मर्यादा नाहीं. (५८) योगजागमांत ह्मटलें आहे कीं, शिवज्ञानीलोक दूरवर विचार करून वागतात, ज्ञानामुळें त्यांचीं पापें जळून जातात, ते ज्ञानाचाही जेथें संबंध नाहीं अशा शिवाद्वैतसुखांत निमग्न असतात. (५९) निश्वासकारिकेंत ह्मटलें आहे कीं, जसा एखादा मनुष्य एखादी वस्तु शोधून काढावयास हातांत पेटविलेलें कोलित घेतो आणि ती वस्तु सांपडल्यावर तें पुन्हा फेंकून देतो, त्याप्रमाणें शिवज्ञानी मनुष्य शिवज्ञान शिकूनत्याच्या साधनानें शिवस्वरूप यथार्थरीतीनें समजून घेतो आणि मग तें ज्ञान टाकून देतो. ( ज्या करितां ज्ञान संपादन करावयाचें ती वस्तु मिळाल्यावर ज्ञानाचें कारण रहात नाहीं. (६०) नेत्रोद्योतांत ह्मटलें

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

प्रभयोः करकांभसोः ॥ कर्पूरगन्धयोर्वायुनभसोर्भागयोगवत् ॥६०॥ कामिकागमे ॥ यथा घृते घृतं न्यस्तं क्षीरे क्षीरं जले जलम् ॥ केवलत्वं यथा प्राप्तं न किंचिदपि तद्भवेत् ॥६१॥ वीरागमे ॥ शून्यशून्यं परं शून्यं प्राणशून्यं निरन्तरम् ॥ प्राणज्ञानमनोशून्यं देहं देवो निरंजनः ॥६२॥ परतत्वं स्वरूपेण निजाचारः प्रशस्यते ॥ सर्वशून्यं परं शून्यं प्राणशून्यं परं तथा ॥६३॥ वासिष्ठपुराणे ॥ पृष्ठं शून्यं मुखं शून्यं करपत्पार्श्वकं तथा ॥ शरीरनिरपेक्षण्यशक्त्या शून्यमिदं भवेत् ॥६४॥ शिवसूत्रे ॥ नान्तः किंचिद्बहिर्नोर्ध्वं न मध्यं नाप्यधः क्वचित् ॥ सर्वाकारं निराकारं स्वसंवेद्यं विजृंभते ॥६५॥ कामिकागमे ॥ शून्यं शून्यं पुनः शून्यं त्रिशून्यं पश्यति क्षणात् ॥ सर्वशून्यनिराभासं सामरस्यं तथा भवेत् ॥ ६६॥

---

आहे कीं, स्फटिकाचा आणि निर्मळपणाचा जसा संबंध आहे, दीपाचा आणि प्रकाशाचा जसा संबंध आहे, पावसांतील गारा आणि पाणी ह्यांचा जसा संबंध आहे, कापराचा आणि त्याच्या सुवासाचा जसा संबंध आहे, वाऱ्याचा आणि आकाशाचा जसा संबंध आहे, तसाच भागाचा आणि योगाचा संबंध आहे. (६१) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं, जसें तुपांत तूप ओतलें, दुधांत दूध ओतलें, पाण्यांत पाणी ओतलें तर एक होतें, त्यांत निराळेपणा ह्मणून रहात नाहीं, त्याप्रमाणें केवलपणाची स्थिति आल्यावर मग बाकी कांहीं रहात नाहीं. (६२) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, देव हा निरंजन ( निर्मळ ) आहे, तो शून्याहून शून्य आहे, तो श्रेष्ठ आहे, तो शून्य आहे, तो प्राणशून्य असून निरंतर आहे, त्याला प्राण, ज्ञान आणि मन हीं नाहींत, तो देहाकारही होतो. (६३) परतत्वस्वरूपामुळें आपला सदाचार चांगला वाटावयास लागतो. परब्रह्मस्वरूप हें सर्वशून्य आहे, श्रेष्ठ असून शून्य आहे, प्राणशून्य असून तसेंच श्रेष्ठ आहे.(६४) वासिष्ठपुराणांत ह्मटलें आहे कीं, त्या परब्रह्मस्वरूपास पाठ नाहीं, तोंड नाहीं, हातपाय आणि दोन्ही बाजू नाहींत, शरीराविषयीं औदासिन्यदशा असल्यामुळें हें सर्व शून्य होतें. (६५) शिवसूत्रांत ह्मटलें आहे कीं, त्या परब्रह्मस्वरूपाला आंत नाहीं, बाहेर नाहीं, वर नाहीं, मध्यें नाहीं आणि खालींही कोठें नाहीं, तें सर्वत्र व्यापलेलें आहे तरी निराकार आहे. तें आपलें आपण जाणावें लागतें, तेव्हां तें समजतें. (६६) कामिकागमांत ह्मटलें आहे कीं, परब्रह्मस्वरूप हें शून्य शून्य आहे पुनः शून्य आहे आणि त्रिशून्य आहे असें जेव्हां एकदम पाहतां त्यावेळीं हें सर्व शून्य आणि निराभास आहे असें समजून तसा समरसीभाव होईल.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

वृत्तम् ॥ श्रीमद्वेदपुराणनाटकमहाकाव्येतिहासागमानालोक्य स्मृतितर्क-भाष्यभरताद्यानेकशास्त्राण्यपि ॥ श्रीसंपादनसिद्धवीरणमहायोगीश्वरः शाश्वतं सर्वानादिसुवीरशैवचरितं चक्रे बुधः सादरम् ॥६७॥ श्रीमद्वेदोपवेदागमनिगमशिरःसत्पुराणेतिहासौघाब्धेः संगृह्य सम्यङ्मणिगणामिव तत्रत्यकं ग्रन्थजालम् ॥ कांतिः स्फीतं शिवोद्यद्गुणपरिमलितं सिद्धवीराख्यदेवः कृत्वासौ षट्स्थलांकाभरणमरचयद्वीरशैवाब्धि-चन्द्रः ॥६८॥ संग्रहा बहवः संति शैवार्थप्रतिपादकाः ॥ संग्रहोऽयं वीरशैवसंग्रहणां शिरोमणिः ॥६९॥ वृत्तम् ॥ जयति विमलभावः स्फारकीर्तिप्रभावः प्रशमितभवदावः पालिताशेषजीवः ॥ सदुदितबहुशैवः षट्स्थलस्वानुभावः प्रणवजनिजरावः सिद्धवीराख्यदेवः ॥७०॥ मध्वाध्वध्वान्तविध्वंसनखरकिरणः पांचरात्रद्विपांचत्पंचास्यो बद्धबौध्दांबुद-

---

(६७) सिद्धवीर नांवाचा मोठा विद्वान् शिवयोगीश्वर होऊन गेला, त्यानें वेद, पुराणें, नाटकें, महाकाव्यें, इतिहास, आगम वगैरे सर्व वाचले होते, तसेंच स्मृति, तर्क, भाष्य आणि नाट्यशास्त्र वगैरे अनेक शास्त्रेंही वाचलेलीं होतीं. त्यानें पूर्वी पैसेही पुष्कळ मिळविले होते त्यानें हें अनेक काळपर्यंत राहणारें अनादिवीरशैवचरित्र मोठ्या उत्सुकतेनें केलें. (६८) त्या सिद्धवीरनांवाच्या शिवयोगीश्वरानें वेद, उपवेद, आगम निगम, मुख्य मुख्य चांगलीं पुराणें आणि इतिहास वाचून त्यांतील चांगलीं चांगलीं वाक्यें मोत्यांच्या दाण्यासारखीं निवडून काढिलीं आणि हें सुंदरसें शिवगुणांचें वर्णन असल्यामुळें ज्यास्त शोभणारें षट्स्थलालंकारभूत असें शास्त्र तयार केलें, तो शिवयोगी वीरशैवरूप समुद्रास चंद्रासारखा संतोष देणारा होता. (६९) शैवधर्मांच्या अर्थाचें प्रतिपादन करणारे संग्रह पुष्कळ आहेत; तरी त्या सर्व वीरशैवसंग्रहांतील हा अनादिवीरशैवसारसंग्रहनांवाचा ग्रंथ मुख्य आहे. (७०) त्या सिद्धवीरनांवाच्या शिवयोगीश्वराचा विजय असो. त्याचा स्वभाव कपटी नव्हता, त्याची लोकांत मोठी प्रसिद्धि होती, त्यानें संसाररूप दावानल शांत केला होता ( त्यास जन्ममरणाचें भय नव्हतें ), तो सर्व प्राणिमात्रांचें रक्षण करण्यास समर्थ होता. त्यानें अनेक शैवलोकांस चांगला उपदेश केला होता. षट्स्थलांचा त्याला अनुभव आलेला होता, व तो सहजरीतीनें प्रणवजप करणारा होता. (७१) तो सिद्धवीर नांवाचा शिवयोगी मध्वमतरूप अंधारास सूर्यासारखा भासत होता पांचरात्रमतरूपी हत्तीस सिंहासारखा भासत होता, बौद्धमतरूप मेघांस वाऱ्यासारखा भासत होता, त्यानें नास्तिकांचा गर्व पुरा जिरविला होता, तो राजेलोकांचे मर्जीप्रमाणें वागणारा नव्हता, दिवसेंदिवस वृद्धिंगत होणाऱ्या जैनमतरूप अरण्यास वणव्यासारखा होता, द्वैतमतरूप समुद्राला

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

षड्गुपवनोध्वस्तचार्वाकगर्वः ॥ क्ष्माभृद्दम्भोलिरुद्यज्जिनमतवनदावानलो द्वैतवार्धिः श्रीमत्कुम्भोद्भवोऽयं जयति यतिवरः सिद्धवीराख्य-देवः ॥७१॥

इतिश्रीमद्वीरमाहेश्वराचार्यवर्यवीरशैवषट्स्थलमार्गस्थापनाग्रगण्य श्रीसंपादनसिध्दवीराख्य शिवयोगींद्रविरचिते अनादिवीरशैवसार-संग्रहे ऐक्यस्थलं नाम सप्तविंशतितमं प्रकरणम् ॥

---

अगस्त्य ऋषीसारखा होता. सर्व सन्यासीलोकांत तो श्रेष्ठ आहे त्याचा जय असो.

ह्याप्रमाणें वीरशैवमाहेश्वरांत मुख्य आचार्य म्हणविणाऱ्या वीरशैवांच्या षट्स्थल मार्गांची स्थापना करण्यांत पुढारीपण घेणाऱ्या ऐश्वर्य मिळवून देणाऱ्या सिद्धवीर-नांवाच्या शिवयोगीश्वरानें केलेल्या अनादिवीरशैवसारसंग्रहांतील ऐक्यस्थलनांवाचें सत्ताविसावें प्रकरण संपलें.




CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

# विक्रीस तयार.

## वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमालेंतील मराठी भाषांतरासह असलेल्या संस्कृत ग्रंथांची यादी.

| | रु. आ. पै. |
|---|---|
| १. वीरशैवसदाचारसंग्रह | ०-१२-० |
| २. सिद्धांतशिखामणि भाग १ | १- ८-० |
| ३. सिद्धांतशिखामणि भाग २ | १- ८-० |
| ४. बसवेश्वरपुराण व्यासोक्त | १- ८-० |
| ५, वीरशैवाचारप्रदीपिका | २- ० ० |
| ६. हरिहरतारतम्य | ०- ४-० |
| ७. पादोदकविचार | ०- ३-० |
| ८. रामायणसारसंग्रह | ०- ६-० |
| ९. उपयुक्त वेंचे | ०- ७-० |
| १०. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण | ०- ४-० |
| ११. पारमेश्वरागम भाग १ | १- ०-० |
| १२. पारमेश्वरागम भाग २ | १- ०-० |
| १३. प्रभुलिंगलीला भाग १ | १- ८-० |
| १४. प्रभुलिंगलीला भाग २ | १- ४-० |
| १५. प्रभुलिंगलीला भाग ३ | १- ०-० |
| १६. पंचाचार्यपंचमोत्पत्ति-प्रकरणम् | ०- ६-० |
| १७. वीरमाहेश्वरप्रकरणम् | ०- ८-० |
| १८. दीक्षादिकथनम् | ०- २-० |
| १९. सूक्ष्मागम | ०-१०-० |
| २०. संक्षिप्त लिंगपूजाविधि. | ०- ०-९ |
| २१. वीरशैवलिंगिब्राह्मण वंशावलिपट. | ०- १-० |
| २२. व्यापारसाम्राज्य पूर्वार्ध. | १- ०-० |
| २३. शिवपरअभंग | ०- ७-० |
| २४. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी भाग १ | ०- ५-० |
| २५. भाग २ | ०- ५-० |
| २६. भाग ३ | ०- ४-० |
| २७. मराठी सिद्धरामेश्वर चरित्र | ०- ७-० |
| २८. वीरशैवदीक्षाविधि वीरमाहेश्वरदीक्षाविधी | ०- १-० |
| २९. शिष्यवर्गसंप्रदायनिरूपण | ०- १-० |
| ३०. शिवपुराण वायवीयसंहिता पूर्वभाग. | २- ०-० |
| ३१. शिवपुराण वायवीयसंहिता उत्तरभाग | २- ० ० |
| ३२. भारतसारसंग्रह | ०- ६-० |
| ३३. खानेसुमारींतील वीरशैव-शास्त्रास विरुध्द असलेल्या ८ विषयांवर म्हैसूर महाराजा कालेज पण्डित वे. मू. करिबसव शास्त्री यांनी दिलेलें उत्तर | ०- ०-६ |

## छापत असलेले ग्रन्थ.

१. दशकर्मपध्दति. २. बसवेश्वरपुराण भाग २ रा. ३. विरक्तोत्पत्तिक्रियालक्षण.

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

सोलापूर येथें रावसाहेब मलप्पा बसप्पा वारद यांचें दुकानीं व याशिवाय मुंबई विजापूर व कलबुर्गा येथें रावसाहेब वारद यांचें दुकानी विकत मिळतील,

आम्ही छापलेले धर्मग्रन्थांपैकीं कोणच्याही ग्रन्थाची पुनरावृत्ती काढण्याची कोणाची मर्जी असल्यास त्यांस आमची परवानगी आहे कारण धर्मग्रन्थांचा जितका प्रसार होईल तितका व्हावा अशी आमची इच्छा आहे.

प्रसिद्धिकर्ता.

CC-0. Jangamwadi Math Collection. Digitized by eGangotri

